# वैकुंठवासी महाराज विष्णुबुवा जोग.



जन्म,
भाद्रपद व॥ १ शके १७८९.

प्रयाण,
माघ व॥ १ शके १८४१

# अर्पणपत्रिका

ज्यांच्या कृपेनें आम्हांस ज्ञानेश्वरी, वारकरी कथां,

निरूपण व भजनाची आवड उत्पन्न झाली त्या

वै० श्रीगुरुमहाराज

## विष्णुबुवा जोग

यांच्या चरणीं सप्रेम व सादर समर्पण

संपादक

श्रीज्ञानेश्वरी अध्याय बारावा

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

कीं टिटिभू चांचूवरी । माप सूये सागरीं ।
मी नेणतु त्यापरी । प्रवर्तें येथ ॥ ज्ञा. १–६८

श्रीज्ञानेश्वरीच्या ज्या थोड्याबहुत 'सार्थ' प्रती आज उपलब्ध आहेत त्यां· पैकीं वाचकांस समजण्यास सुलभ अशी प्रत, आमच्या मतें ह. भ. प. बंकटस्वामी यांची होय. ह्या प्रतीच्या शेवटीं ज्ञानेश्वरींतील कठीण शब्दांचा विस्तृत कोश दिलेला आहे व त्यामुळें वाचकांस ओवींतील कठीण शब्दांचा अर्थ समजून घेणें सुलभ झालेलें आहे. परंतु या प्रतींत दुर्बोध स्थळीं अर्थ-विवरणात्मक टीपा मुळींच दिलेल्या नसल्यामुळें सामान्य वाचकांस ह्या प्रती-वरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रत्येक ओवींत अर्थगांभीर्य किती आहे ह्याची कल्पना येत नाहीं. त्याचप्रमाणें अलीकडे मुंबई विद्यापीठांत वरच्या परीक्षांना ज्ञानेश्वरींतील कांहीं अध्याय मराठी भाषेच्या अभ्यासाकरितां नेमण्यांत येऊं लागले आहेत. त्या अध्यायांवर विद्यार्थ्यांना परीक्षेकरितां उपयुक्त होतील अशा तऱ्हेनें टीपा देऊन ते अध्याय कॉलेजांतील प्राध्यापकांकडून प्रसिद्धहि होऊं लागले आहेत. परंतु मराठी भाषेच्या अभ्यासक्रमांत 'तत्त्वज्ञान' हा विषय येत नसल्यामुळें ह्या अध्यायांवर ज्या टिपणी प्रसिद्ध होत आहेत त्यांत ज्ञाने-श्वरींतील तत्त्वज्ञानाला फारसें स्थान दिलेलें आढळत नाहीं. एवंच सांप्र· दायिकांकडून प्रसिद्ध होणाऱ्या श्रीज्ञानेश्वरीच्या 'सार्थ प्रती' व असांप्रदायिक मराठी भाषेच्या प्राध्यापकांकडून प्रसिद्ध होणारे श्रीज्ञानेश्वरीचे सार्थ अध्याय हे दोन्हीहि श्रीज्ञानेश्वरीच्या सर्वांगपूर्ण अभ्यासाच्या दृष्टीनें एकांगी व अपूर्णच ठरतात. आमच्या मतें सांप्रदायिकरीत्या वेदांताचा व श्रीज्ञानेश्वरीचा अभ्यास करून ज्यांनीं तत्त्वज्ञानविषयांत प्रावीण्य मिळविलें आहे असे सांप्रदा-यिक व साहित्यिक आणि मराठी भाषेचे प्राध्यापक एकत्र येऊन श्रीज्ञाने-श्वरीचे एक एक सार्थ अध्याय विस्तृत टीपा व निरूपणासह प्रसिद्ध करतील तरच या ग्रंथाचें सर्वांग पूर्णत्वानें विवेचन होईल.

## श्रीज्ञानेश्वरी अध्याय बारावा

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

कीं टिटिभू चांचूवरी । माप सूये सागरीं ।
मी नेणतु त्यापरी । प्रवर्तें येथ ॥ ज्ञा. १–६८

श्रीज्ञानेश्वरीच्या ज्या थोड्याबहुत 'सार्थ' प्रती आज उपलब्ध आहेत त्यांपैकीं वाचकांस समजण्यास सुलभ अशी प्रत, आमच्या मतें ह. भ. प. बंकटस्वामी यांची होय. ह्या प्रतीच्या शेवटीं ज्ञानेश्वरींतील कठीण शब्दांचा विस्तृत कोश दिलेला आहे व त्यामुळें वाचकांस ओवींतील कठीण शब्दांचा अर्थ समजून घेणें सुलभ झालेलें आहे. परंतु या प्रतींत दुर्बोध स्थळीं अर्थविवरणात्मक टीपा मुळींच दिलेल्या नसल्यामुळें सामान्य वाचकांस ह्या प्रतीवरून श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या प्रत्येक ओवींत अर्थगांभीर्य किती आहे ह्याची कल्पना येत नाहीं. त्याचप्रमाणें अलीकडे मुंबई विद्यापीठांत वरच्या परीक्षांना ज्ञानेश्वरींतील कांहीं अध्याय मराठी भाषेच्या अभ्यासाकरितां नेमण्यांत येऊं लागले आहेत. त्या अध्यायांवर विद्यार्थ्यांना परीक्षेकरितां उपयुक्त होतील अशा तऱ्हेनें टीपा देऊन ते अध्याय कॉलेजांतील प्राध्यापकांकडून प्रसिद्धहि होऊं लागले आहेत. परंतु मराठी भाषेच्या अभ्यासक्रमांत 'तत्त्वज्ञान' हा विषय येत नसल्यामुळें ह्या अध्यायांवर ज्या टिपणी प्रसिद्ध होत आहेत त्यांत ज्ञानेश्वरींतील तत्त्वज्ञानाला फारसें स्थान दिलेलें आढळत नाहीं. एवच सांप्रदायिकांकडून प्रसिद्ध होणाऱ्या श्रीज्ञानेश्वरीच्या 'सार्थ प्रती' व असांप्रदायिक मराठी भाषेच्या प्राध्यापकांकडून प्रसिद्ध होणारे श्रीज्ञानेश्वरीचे सार्थ अध्याय हे दोन्हीहि श्रीज्ञानेश्वरीच्या सर्वांगपूर्ण अभ्यासाच्या दृष्टीनें एकांगी व अपूर्णच ठरतात. आमच्या मतें सांप्रदायिकरीत्या वेदांताचा व श्रीज्ञानेश्वरीचा अभ्यास करून ज्यांनीं तत्त्वज्ञानविषयांत प्रावीण्य मिळविलें आहे असे सांप्रदायिक व साहित्यिक आणि मराठी भाषेचे प्राध्यापक एकत्र येऊन श्रीज्ञानेश्वरीचे एक एक सार्थ अध्याय विस्तृत टीपा व निरूपणासह प्रसिद्ध करतील तरच या ग्रंथाचें सर्वांग पूर्णत्वानें विवेचन होईल.

प्रस्तुत पुस्तकांत ज्ञानेश्वरींतील अध्यात्म विद्येला योग्य स्थान देऊन त्याच्याच जोडीला प्रत्येक ओवीचा व्याकरणशुद्ध अर्थ देण्याचा प्रयत्न केला आहे. सामान्यतः मॅट्रिकच्या परीक्षेस १२ वा अध्याय नेमला असतां विद्यार्थ्यास जितकी माहिती आवश्यक वाटल तितकी माहिती आम्हीं या पुस्तकांत ग्रथित केली आहे. ह्याशिवाय ज्यांना सांप्रदायिकरीत्या श्रीज्ञानेश्वरीचा अभ्यास करावा अशी इच्छा आहे त्यांच्याकरितां आम्हीं प्रत्येक ओवीवर विस्तृत निरूपण दिलेलें आहे. प्रस्तुत पुस्तक मुंबई विद्यापीठाच्या विवक्षित परीक्षे-करितां आम्हीं लिहिलेलें नसल्यामुळें ह्या पुस्तकांत श्रीज्ञानेश्वरांचें संपूर्ण चरित्र, श्रीज्ञानेश्वरकालीन धार्मिक परिस्थिति, श्रीज्ञानेश्वर व नाथपंथ, वारकरी सांप्रदाय, श्रीज्ञानेश्वर एक कां दोन, श्रीज्ञानेश्वरांची ग्रंथरचना इत्यादिकां-विषयी माहिती दिलेली नाहीं. आमच्यामतें ही सर्व माहिती खंडशः संपूर्ण ज्ञानेश्वरी 'सार्थ' प्रसिद्ध झाल्यानंतर तिच्या शेवटच्या खंडांत देणें अधिक योग्य होईल. प्रस्तुत माहिती प्रि. शं. वा. दांडेकर एम्. ए. यांनीं लिहिलेल्या 'श्रीज्ञानदेव-चरित्र, ग्रंथ व तत्त्वज्ञान' ह्या पुस्तकांत, प्रा. पारसनीस व मोडक यांनीं प्रसिद्ध केलेला 'श्रीज्ञानेश्वरी सोळावा अध्याय' या पुस्तकाच्या उपो-द्घातांत व मराठीचे प्राध्यापक दत्तात्रेय सीताराम पंगु यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'श्रीज्ञानेश्वरी अध्याय बारावा' यांतील प्रास्ताविकांत संपूर्ण दिलेली आहे. ही माहिती श्रीज्ञानेश्वरीच्या अभ्यासूंनीं अवश्य वाचावी अशी आमची त्यांना विनंति आहे.

## प्रस्तुत पुस्तक–विशेष

**( १ ) श्रीज्ञानेश्वरी अध्याय बारावा मूळः**—प्रस्तुत प्रत तयार करतांना आम्हीं ह. भ. प. वेंकटस्वामी यांच्या 'सार्थ ज्ञानेश्वरी'चा उपयोग केलेला आहे. त्यांच्या पाठांत प्रायः बदल न करतां या पुस्तकांत मूळ ओव्या बहुशः वेंकटस्वामींच्या प्रतीप्रमाणेंच छापलेल्या आहेत. परंतु हे पाठ सर्वस्वीं शुद्ध आहेत असें म्हणतां येणार नाहीं. त्यांतील कांहीं अशुद्ध पाठांचीं उदाहरणें खालीलप्रमाणें आहेतः—

| ओवी | वेंकटस्वामी पाठ | शुद्ध पाठ |
|---|---|---|
| ५९ | तया | तेया |
| ११४ | जया | जेया |
| १३२ | आत्मजेच्या | आत्मजेचां |
| १६९ | माझ्या | माझा |

श्रीज्ञानेश्वरमहाराज यांची भाषा व्याकरणदृष्ट्या अत्यंत शुद्ध असल्यामुळें असे थोडे आढळणारे अशुद्ध पाठ शुद्ध करून, श्रीज्ञानेश्वरीची शुद्ध प्रत छापणें आवश्यक ठरते.

( २ ) **अन्वय व अर्थः**—प्रत्येक ओवीचा गोळाबेरीज अर्थ न देतां, ओवीचा व्याकरणाला धरून अन्वय दिला आहे व त्या अन्वयाला अनुसरून व्याकरणशुद्ध अर्थ दिला आहे. यामुळे ओवींतील प्रत्येक शब्दाचा अर्थ समजण्यास सुलभ झालें आहे. संगीतांतील गाणे, रागाचे आरोह व अवरोह माहीत नसतांना ऐकले असतां जो आनंद प्राप्त होतो, त्यापेक्षां त्या रागाचे आरोह व अवरोह समजून घेऊन तेंच गाणें पुन्हां ऐकलें असतां अधिक आनंद प्राप्त होतो; ही गोष्ट संगीताचा अभ्यास करणाऱ्यांच्या नित्य अनुभवाची आहे. तसाच अधिक आनंद शब्दांचें व्याकरण समजून घेऊन नंतर व्याकरणशुद्ध अर्थ वाचला असतां होत असतो. याशिवाय व्याकरणशुद्ध अर्थ लिहिल्यानें अर्थास नियमबद्धता प्राप्त होते. एवढ्याकरितां प्रत्येक ओवीचा व्याकरणशुद्ध अन्वय व अर्थ लोकांच्या पुढें ठेवावा ह्या हेतूने आम्ही व्याकरणतज्ज्ञ गुरुवर्य रा. रा. गो. कृ. मोडक, सेवानिवृत्त संस्कृत शिक्षक पुणें, यांजकडे गेलों व त्यांच्या मुखांतून प्रत्येक ओवीचा अन्वय व अर्थ ऐकला व तो टिपून घेतला व असा टिपून घेतलेला अन्वय व अर्थ ह्या प्रतींत आम्हीं छापलेला आहे. अर्थ टिपून घेतल्यानंतर तो अर्थ पुन्हां आम्हीं रा. मोडक यांना दाखविलेला नाहीं. यामुळें अर्थ ऐकत असतांना व टिपून घेतांना जे दोष झाले असतील ते दोष प्रस्तुत छापलेल्या अन्वयांत व अर्थांत येण्याचा कांहींसा संभव आहे, ही गोष्ट वाचकांनीं ध्यानांत ठेवावी.

( ३ ) **श्रीज्ञानेश्वरींतील नामांची व धातूंची संक्षिप्त रूपावलीः**—ओवींत आलेल्या प्रत्येक नामाची, सर्वनामाची व विशेषणाची विभक्ति

कोणची आहे, क्रियापदाचें रूप कोणच्या काळाचें आहे व अविकारी आलेले शब्द कोणच्या जातीचे आहेत हें ओळखण्याकरितां आम्ही गुरुवर्य रा. रा. गो. कृ. मोडक यांजकडून श्रीज्ञानेश्वरींतील नामांची व धातूंची संक्षिप्त रूपावली तयार करून घेतली व तीच ह्या प्रतींत छापलेली आहे. ही रूपावली प्रत्येक ज्ञानेश्वरीभक्तानें अवश्य जवळ बाळगावी व तद्द्वारा ज्ञानेश्वरींतील प्रत्येक शब्दाचें व्याकरण समजून घ्यावें अशी आमची वाचकांस सविनय प्रार्थना आहे. ही रूपावली वाचल्यानें श्रीज्ञानेश्वरमहाराज हे किती व्याकरणशुद्ध भाषा लिहितात हें कळून येईल व श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या बद्दल असलेला आदर द्विगुणित होईल. आमच्यापासून कांहींहि अपेक्षा न करतां व आम्हांला व्याकरणाचें ज्ञान नसतांना आमची उपेक्षा न करतां, गुरुवर्य रा. रा. गो. कृ. मोडक यांनीं त्यांच्या उतार वयांत व स्वतः कष्ट सोसून ही रूपावली तयार करून आम्हांस दिली ह्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहोंत. निरपेक्षता व समोरचा मनुष्य जितक्या प्रमाणांत अज्ञानी तितक्या प्रमाणांत त्याच्याबद्दल अधिक कळकळ हे दोन संतांच्या ठिकाणीं असलेले उत्कृष्ट गुण प्रयत्न केला असतां व्यवहारांतहि आपल्या अंगीं बाणूं शकतात ही गोष्ट रा. मोडक यांच्या सान्निध्यांत आमच्या प्रत्ययास आली. अशा प्रकारची रूपावली तयार करून त्यांनीं वाचकांचीहि मोठी सोय करून दिली असें म्हटल्यास त्यांत अतिशयोक्ति मुळींच होणार नाहीं.

( ४ ) **टीपा व विस्तृत निरूपण**--गुरुवर्य प्राचार्य ह. भ. प. शंकर वामन ऊर्फ सोनोपंत दांडेकर एम्. ए. यांचीं श्रीज्ञानेश्वरीवर अथपासून इतिपर्यंत प्रगट प्रवचनें पुण्यांत सन १९२८ ते १९४० या वर्षांतून झालीं. तीं सर्व प्रवचनें ऐकण्याचा सुयोग आम्हांस प्राप्त झाला. या प्रवचनांतून मुख्यतः खालील गोष्टी येत असत–( १ ) श्रीशंकराचार्य, वामनपंडित व लोकमान्य टिळक यांनीं केलेला गीतेंतील श्लोकांच्या पदांचा अर्थ व श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं त्याच पदांचा केलेला अर्थ यांची तुलनात्मक चर्चा ( २ ) श्रीज्ञानेश्वरींत ग्रथित केलेलें तत्त्वज्ञान व पाश्चात्य तत्त्वज्ञानी प्लेटो, कान्ट, निश्शे, स्पॅनोझा इत्यादिकांचें तत्त्वज्ञान यांतील साधर्म्य व विरोध. ( ३ ) मन,

बुद्धि, वेदांतशास्त्रांतील उपादान कारण, स्वरूप लक्षण, तटस्थ लक्षण इत्यादि पारिभाषिक शब्द यांबद्दल आपल्या ग्रंथांतून दिलेल्या व्याख्या व पाश्चात्य ग्रंथांतून दिलेल्या व्याख्या यांची तुलनात्मक चर्चा करून आपल्या वेदांतशास्त्रांतील व्याख्या व श्रीज्ञानेश्वरांनीं ह्यापैकीं कांहींच्या केलेल्या व्याख्या या किती सरस व तर्कशुद्ध आहेत यांचें तात्त्विक विवेचन. ( ४ ) श्रीज्ञानेश्वरींतील काव्य ( ५ ) श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे दृष्टांत हे एकापेक्षां एक चढते असून ते मुख्य सिद्धांताची कल्पना, पायरीपायरीनें व समर्पक रीतीनें कशी आणून देतात याचें विवरण. ( ६ ) ज्ञानेश्वरींतील विषय समजून देण्याकरिता प्रसंगविशेषीं पुराणांतून आलेल्या किंवा कल्पिलेल्या गोष्टी. ( ७ ) ज्ञानेश्वरींतील प्रत्येक ओंवीचा सरळ अर्थ व त्यांतील प्रत्येक शब्दावर श्रीतुकाराममहाराज, श्रीएकनाथमहाराज इत्यादि संतांचीं समर्पक वचनें देऊन विस्तृत विवरण.

वरील दिलेल्या विभागांपैकीं पहिले चार विभाग हे आमच्या बुद्धीच्या कक्षेच्या पलीकडचे असल्यामुळें हीं प्रवचनें चालू असतां त्याबद्दलची माहिती आम्हीं आपल्याजवळ कांहींहि लिहून ठेवलेली नाहीं. फक्त ओंवींचें जें विस्तृत विवरण होत असे त्यांतील कांहीं मुद्दे व कांहीं समर्पक म्हणून दिलेलीं संतांचीं वचनें आम्हीं लिहून ठेवलीं आहेत व अशा लिहिलेल्या त्रोटक टिपणांवरूनच प्रस्तुत अध्यायावरचें विस्तृत निरूपण आम्हीं लिहून काढलें व तेंच या पुस्तकात छापलें आहे. ह्यावरून छापलेलें निरूपण हें गुरुवर्य प्राचार्य सोनोपंत दांडेकर यांच्या निरूपणाचा यथातथ्य अनुवाद नव्हे हें वाचकाच्या ध्यानात येईलच. येवढेंच नव्हे तर आम्हीं दिलेलें निरूपण हें त्यांच्या निरूपणाचा सारांशहि होणार नाहीं याची आम्हांस पूर्ण जाणीव आहे. असें जरी असले तरी या निरूपणांत जो कांहीं थोडाबहुत ज्ञानाचा प्रकाश असेल तो त्याचा आहे व त्यांतील दोष व विसंगतपणा हे आमचे आहेत ही गोष्ट या ठिकाणीं सांगणें अवश्य आहे. त्यांच्यासारख्या अधिकारयुक्त वाणींतून श्रीज्ञानेश्वरीचें निरूपण ऐकावयास न मिळतं, तर प्रस्तुत निरूपण लिहितां आलें असतें कीं नाहीं यांची वानवाच असल्यानें. त्यांचे

उपकार जितके मानावे तितके थोडेच आहेत. गुरुवर्य प्राचार्य सोनोपंत दांडेकर यांच्या प्रवचनांतून आलेल्या वरील सात गोष्टींचा निर्देश करण्याचें मुख्य कारण म्हणजे ज्यांना श्रीज्ञानेश्वरीचा अभ्यास सांगोपांग करावयाचा असेल त्यांनीं वरील सात विभागांबद्दलची माहिती आत्मसात् करणें आवश्यक आहे. वरील विभागानुसार माहिती ग्रथित करून श्रीज्ञानेश्वरीचे सार्थ अध्याय प्रसिद्ध होणें इष्ट आहे.

श्रीज्ञानेश्वरींतील ओव्यांचा शब्दशः अर्थ वाचीत गेलें असता या ओव्यांतून कितीतरी अर्थ भरलेला आहे ह्याची कल्पना वाचकांस येत नाहीं, व त्यामुळें ज्ञानेश्वरीविषयीं खरी गोडीहि उत्पन्न होत नाहीं. खुद्द श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या ओव्यांचें वर्णन 'जैसें बिंब तरी बचकें एवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें । शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी' ज्ञा. ४–२१५ असें केलेलें आहे. तेव्हां प्रत्येक ओवींतील शब्दांच्या अर्थाची व्याप्ति समजण्याकरितां त्यांतील प्रत्येक शब्दावर मुद्देसूद व्याख्यान देणें अवश्य आहे. याशिवाय श्रीज्ञानेश्वरीचा अभ्यास केवळ त्यांतील काव्य व व्याकरण यांची माहिती झाल्याने संपूर्ण होणारा नाहीं. श्रीज्ञानेश्वरींत साहित्य व शांतरस हे दोन्हीहि आलेले आहेत. 'जेथ साहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बोलती ।' ज्ञा. ४–२–२१८. तेव्हां संपूर्ण अभ्यास होण्याकरितां काव्याबरोबर त्यांतील शांतरसाचें पान करणें अत्यंत आवश्यक आहे. लोकांनीं शांतरसाकडे प्रवृत्त व्हावें व त्याचें पान करावें एवढ्याकरितांच श्रीज्ञानेश्वरांनीं ज्ञानेश्वरी हा ग्रंथ रसाळ भाषेंत व नादमधुर शब्दांत लिहिला आहे. लोकांनीं केवळ त्यांतील काव्यावरच भुलून राहूं नये, तर त्याच्या आंत शिरून त्यांतील ब्रह्मरसाचें सेवन करावें एवढ्याकरितां श्रीज्ञानेश्वरांनीं ठिकठिकाणीं ह्या ग्रंथांत 'मी शांतरसाची मेजवानी केली आहे' असें सांगून वाचकांचें लक्ष या शांतरसाकडे वेधलेलें आहे. ( 'तो शांतुचि अभिनवेल । ते परियसा मऱ्हाठे बोल ।' ज्ञा. ४–२१४ 'आतां शांतरसाचें भरितें । सांडीत आहे पात्रातें ।' ज्ञा. ५–६४. 'सहजें ब्रह्मरसाचें पारणें ।' ज्ञा. ६–२. 'जेथ शांतिचिया घरा । अद्‌भुत आला आहे पाहुणेरा ।' ज्ञा. ११–२. 'नुसधीचि शांतिकथा ।

आणिजेल कीर वाक्पथा । जे शृंगाराच्या माथां । पाय ठेविती ।' ज्ञा. १३–११५५ ). श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं ब्रह्मविद्येला फार मोठें प्राधान्य दिलें आहे. १३ व्या अध्यायांत अज्ञानी पुरुषाचीं लक्षणें सांगतांना, जो उपनिषदें वाचीत नाहीं तो अज्ञानी समजावा असें श्रीज्ञानेश्वरांनीं म्हटलें आहे, ( 'उपनिषदांकडे न वचे । योगशास्त्र न रुचे । अध्यात्मज्ञानीं जयाचें । मनचि नाहीं॥' ज्ञा. १३–८२६ ). व ओंकाररूपी गणपतीच्या मुगुटावरील फुलांच्या ठिकाणीं त्यांनीं उपनिषदांची स्थापना केली आहे. ( 'उपरि दशोपनिषदें । जियें उदारें ज्ञानमकरंदें । तियें कुसुमें मुगुटीं सुगंधें । शोभती भलीं । ' ज्ञा. १–१८ ). वेदांताला त्यांनीं 'महारसु मोदक' म्हटलें आहे व १३ व्या अध्यायांत अनेक विद्यांची एक मोठी यादी देऊन या सर्व विद्या अवगत केल्या पण अध्यात्मविद्येसंबंधीं जो जात्यंधु असेल त्याचें तें सर्व अध्ययन म्हणजे 'विटंबु गा' असें त्यांनीं म्हटलें आहे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा ब्रह्मविद्येबद्दल एवढा आग्रह असण्याचें कारण असें आहे कीं त्यांच्यामतें जीवांना अखंड व अविनाशी सुख प्राप्त करून घेण्याचा मार्ग, आत्मा हस्तगत करून घेणें हाच होय व त्याचें साधन अध्यात्मज्ञानच आहे. अशा प्रकारची जी अध्यात्मविद्या ती श्रीज्ञानेश्वरांच्या ओव्यांतून कशी ओतप्रोत भरलेली आहे याची स्पष्ट कल्पना येण्याकरितां १२ व्या अध्यायांतील प्रत्येक ओवीवर विस्तृत निरूपण, आम्हीं या पुस्तकांत दिलेलें आहे. ह्याचा उपयोग प्रवचनकारांसहि होणारा आहे.

( ५ ) **वेदांन्तपरिशिष्टः**—वेदांत हें एक शास्त्र आहे. ज्याप्रमाणें पदार्थविज्ञानशास्त्र किंवा रसायनशास्त्र नीट समजण्याकरितां त्यांतील विशिष्ट पारिभाषिक शब्द व मूलतत्त्वें यांच्या व्याख्या व त्यांच्याविषयीं माहिती प्रथमतः असणें आवश्यक असतें, त्याचप्रमाणें वेदांतशास्त्र समजण्याकरितां त्यांतील तत्त्वें व पारिभाषिक शब्द यांच्या व्याख्या व त्यांचें स्वरूप माहीत असणें आवश्यक आहे. उदाहरणार्थ वेदांतशास्त्रांत ब्रह्म, आत्मा, माया, ईश्वर, अज्ञान, जीव व जगत् यांचीं लक्षणें काय आहेत; पंचकोश, तीन देह, तीन अवस्था कोणत्या आहेत; उपादान कारण, उपाधि, उपहित, विशेषण व विशिष्ट इत्यादि पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या काय आहेत ही माहिती असणें अवश्य आहे. अशा

प्रकारची जेवढी माहिती १२ व्या अध्यायांतील ओव्या समजण्यास आवश्यक आहे तेवढी माहिती या परिशिष्टांत दिली आहे. ही माहिती श्रीज्ञानेश्वरीच्या अभ्यासूंनीं वारंवार मननपूर्वक वाचावी.

( ६ ) **प्रश्न व उत्तरें**:—या परिशिष्टांत श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या जीवनवृत्तांतील कांहीं ठळक गोष्टी, श्रीज्ञानेश्वरींतील काव्य व तत्कालीन समाजाची माहिती व १२ व्या अध्यायांत आलेल्या मुख्य विषयांची प्रश्नोत्तररूपानें सूची दिली आहे.

( ७ ) **ओव्या व अभंगांची सूची**:—१२ व्या अध्यायांतील ओव्यांच्या निरूपणांत श्रीज्ञानेश्वरमहाराज, श्रीतुकाराममहाराज इत्यादि संतांच्या अभंगांतील कडवीं व श्रीज्ञानेश्वरी व एकनाथी भागवतांतील ओव्या, प्रमाणें म्हणून ज्या दिल्या आहेत त्या सर्वांची सूची या परिशिष्टांत दिली आहे. प्रस्तुत कडवीं व ओव्या ही त्या त्या ग्रंथांतील निवडक वेचेंच आहेत व तीं पाठ केल्यास प्रवचनास त्यांचा चांगलाच उपयोग होईल. यांत अभंगांचीं कडवीं सुमारें ३६० व ओव्या जवळ जवळ ४०० पर्यंत दिलेल्या आहेत.

वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल कीं प्रस्तुत 'आबालसुबोध' पुस्तक लिहिण्यांत आमचा मुख्यतः हेतु, आज महाराष्ट्रांत जे पुष्कळ सांप्रदायिक व भाविक लोक आहेत त्यांना १२ व्या अध्यायाच्या ओव्यांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ सुलभतेनें कळावा हा होय. याच्या जोडीला श्रीज्ञानेश्वरींतील काव्य, व्याकरण, तत्कालीन समाज, श्रीज्ञानेश्वरांचें जीवनवृत्त, अर्थविवरणात्मक टीपा व या अध्यायांत आलेल्या मुख्य विषयांची प्रश्नोत्तररूपानें सूची देऊन प्रस्तुत पुस्तक शालोपयोगी होईल असें केलें आहे. याशिवाय प्रत्येक ओवीवर विस्तृत निरूपण दिलें असून तें वाचीत असतांना प्रत्येकाला ज्ञानेश्वरांचा मुख्य विषय आत्मनिरूपण हाच आहे ह्याची खात्री पटेल. हें निरूपण प्रत्येकास आत्मसुखाच्या माजघरांत नेऊन सोडील अशी आम्हांस आशा आहे. तात्पर्य, कोणीहि कोणच्याहि बुद्धीनें प्रस्तुत पुस्तकाचें वाचन केल्यास त्यांत त्याला पुनः पुन्हा अवगाहन करावें असेंच वाटावें व श्रीज्ञानेश्वरी हा ग्रंथ त्याच्या नित्य जीवनाचा विषय व्हावा अशा रीतीनें प्रस्तुत पुस्तकाची रचना करण्याचा प्रयत्न केला आहे.

श्रीज्ञानेश्वरी हा इतका अलौकिक व प्रासादिक ग्रंथ आहे कीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं भगवद्गीतेबद्दल जें वर्णन केलें आहे 'म्हणौनि जाणतया सवा। गीताचि येकी सेवा। काय करल आघवां। शास्त्रीं येरीं। ज्ञा. १८–१६९५ तेंच वर्णन श्रीज्ञानेश्वरीसहि पूर्णपणें लागू पडतें. असें असल्यामुळें महाराष्ट्रांतील सांप्रदायिक व असांप्रदायिक विद्वान् लेखकांनीं एकत्र येऊन, मूढापासून तों विद्वानापर्यंत, भाविकापासून तों चिकित्सकापर्यंत, पामरापासून तों मुक्तापर्यंत व बालापासून तों वृद्धापर्यंत अशा सर्वांना उपयुक्त होईल अशा प्रकारचा श्रीज्ञानेश्वरीच्या प्रत्येक अध्यायावर, सार्थ व विस्तृत विवरणात्मक ग्रंथ त्यांनीं लिहावा व आमच्यासारखे जे अनधिकारी लोक आहेत त्यांची अशा ग्रंथद्वारा घरबसल्या साहित्य व शांतरसाच्या मेजवानीची सोय करावी एवढीच विनंति आम्हांस, आज प्रस्तुत पुस्तक प्रकाशित करून त्यांना करावयाची आहे. अशा प्रकारची स्फूर्ति श्रीज्ञानेश्वरमहाराज त्यांना देवोत येवढी प्रार्थना श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या चरणीं करून हें प्रास्ताविक पुरें करतों.

प्रस्तुत पुस्तकांतील निरूपण लिहिण्यास ह. भ. प. विश्वनाथबुवा पाटील यांनीं मदत केली व विशेषतः आम्हीं दिलेल्या संत–प्रमाणांत त्यांनीं बऱ्याच समर्पक प्रमाणांची आणखी भर टाकली याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. तसेच रा. रा. गंगाधर पुरुषोत्तम रिसबूड यांनीं प्रस्तुत पुस्तकाची मुद्रणप्रत तयार करण्यांत आम्हांस मदत केली व बऱ्याच उपयुक्त व मार्मिक सूचना केल्या त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत.

त्याचप्रमाणें प्रस्तुत पुस्तक तयार होत असतांना रा. रा. सदाशिव केशव नेऊरगांवकर बी. ई. म्युनिसिपल इंजीनियर, पुणें, यानीं जें सहाय्य केलें त्याबद्दल त्यांचेहि आभार मानणें जरूर आहे. सरते शेवटीं, सध्यां कागदांची उणीव असतांना श्रीयुत पाध्ये, व्हीनस बुकस्टॉल यानीं प्रस्तुत पुस्तक प्रकाशनाचें कार्य अल्प अवधींत करून दिलें व रा. रा. गंगाधर शंकर दाते, मुद्रक, कलागृह प्रेस यांनीं हें काम काळजीनें व शक्य तेवढें लवकर छापून दिलें याबद्दल त्या उभयतांचे आम्ही आभारी आहोंत.

पुणें, आषाढ शुद्ध ११
शके १८६९ ता. २९-६-१९४७

लक्ष्मण विश्वनाथ कर्वे
गोपाळ पुरुषोत्तम रिसबूड

# श्रीज्ञानेश्वरी १२ व्या अध्यायांतील विषयांची अनुक्रमणिका

# विशेष खुलासा

( अन्वय व अर्थ यांतील आंकड्यांचा खुलासा )

प्रस्तुत अध्यायाच्या ओव्यांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ समजण्याकरितां अन्वयांत ज्या अनुक्रमानें शब्द आलेले आहेत त्याच अनुक्रमानें अर्थामध्यें त्या शब्दांचा अर्थ दिला आहे. जेथें अन्वयांतील एका शब्दाचा अर्थ, अर्थामध्यें दोन शब्दांनीं व्यक्त केलेला आहे; त्या ठिकाणीं अन्वयांतील शब्दावर जो आंकडा दिलेला आहे तोच आंकडा अर्थामध्यें त्या शब्दाचा अर्थ व्यक्त करणाऱ्या दोन शब्दांवर दिलेला आहे. अन्वयांतील एका शब्दाचा अर्थ दोनपेक्षां अधिक शब्दांनीं अर्थामध्यें व्यक्त केलेला असेल, तर त्या अन्वयांतील शब्दांवर जो आंकडा दिला आहे तोच आंकडा त्याच्या अर्थाच्या शब्दांच्या दोन्ही बाजूंला दोन रेघा मारून, त्यांतील कोणत्याहि एका शब्दावर दिला आहे. याशिवाय पद्यांतील अर्थ गद्यांत देतांना जे शब्द अध्याहृत घ्यावे लागतात ते शब्द अर्थामध्यें कंसांत दिलेले आहेत. यामुळें अन्वयांतील प्रत्येक शब्दाचा अर्थ काय केला आहे हें वाचकांस सहज कळून येईल.

ओवीचा शब्दशः अर्थ जरी समजला तरी कित्येक वेळां त्या ओवीचें स्वारस्य व अर्थगांभीर्य समजत नाहीं, एवढ्याकरितां प्रकरण १ मध्यें प्रत्येक ओवींतील कठीण शब्दाचा अर्थ दिला आहे व त्यांच्यापुढें रेघ देऊन विस्तृत निरूपण दिलेलें आहे. हें निरूपण प्रत्येक ओवीचा अर्थ वाचल्याबरोबर लगेच वाचावें. वास्तविक हें निरूपण प्रत्येक ओवीच्या खालींच द्यावयास पाहिजे होतें, परतु ज्यांना १२ व्या अध्यायांतील फक्त ओव्यांचें वारंवार पारायण करावयाचें आहे त्यांना तें करण्यास सुलभ जावें म्हणून निरूपण स्वतंत्र प्रकरणांत दिलें आहे.

अन्वयामध्यें ' न ' हें नकारार्थी अव्यय क्रियापदाच्या पूर्वीं अनेक वेळां या अध्यायांत आलेलें आहे. त्याचा अर्थ, अर्थामध्यें ' नाहीं ' या शब्दानें क्रियापदाच्या पूर्वीं व्यक्त न करतां प्रत्येक वेळीं तो क्रियापदानंतर ( धातुसाधित अव्ययानंतर ) व्यक्त केलेला आहे. जसें—ओ. ८ अन्वय—न संडीं अर्थ—सोडीत नाहीं.

# ग्रंथसंक्षेप सूचि

| संक्षेप.— | ग्रंथनाम | संपादक, प्रकाशक इ० आंकड्यांचा खुलासा. |
|---|---|---|
| ज्ञा.— | सार्थ ज्ञानेश्वरी- | ह. भ. प. बंकटस्वामी–अध्याय, ओवी. |
| ज्ञा. गा.— | ज्ञानदेवाची गाथा- | ह. भ. प. विष्णु नरसिंह जोग–अभंग आंकडा. |
| तुका. / तु. गा. | —तुकारामाची गाथा- | रा. पांडुरंग जावजी, मुंबई–अभंग आंकडा. |
| अमृ.— | अमृतानुभव- | ह. भ. प. विष्णु नरसिंह जोग–प्रकरण, ओवी. |
| ए. भा.— | एकनाथी भागवत- | रा. माधव कृष्ण देशमुख–अध्याय, ओवी. |
| एक. चिरं.— | एकनाथकृत चिरंजिवपद- | रा. मा. कृ. देशमुख–ओवी. |
| निवृत्ति— | निवृत्तिनाथांची गाथा- | ह. भ. प. वि. न. जोग–अभंग आंकडा. |
| भानु.— | भानुदासमहाराज–गाथापंचक- | रा. त्र्यंबक हरी आवटे–अभंग आंकडा. |
| नामा.— | नामदेवमहाराज–गाथापंचक- | रा. त्र्यंबक हरी आवटे–अभंग आंकडा. |
| नाथ.— | एकनाथमहाराज–गाथापंचक- | रा. त्र्यंबक हरी आवटे–अभंग आंकडा. |
| निळा.— | निळोबाची गाथा- | ह. भ. प. विष्णु नरसिंह जोग–अभंग आंकडा. |
| चतुभा.— | चतुःश्लोकी भागवत–एकनाथी भागवत- | रा. मा. कृ. देशमुख–ओवी. |
| ना. भ.— | नारद भक्तिसूत्रें- | रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए. सूत्र. |
| गीता.— | भगवद्गीता-गीताप्रेस, गोरखपूर— | अध्याय, श्लोक. |

| | | |
|---|---|---|
| ईश. उ.—ईशावास्योपनिषत्- | | सार्थ उपनिषत्संग्रह |
| कठ. उ.—कठोपनिषत्— | अध्याय, वल्ली, मंत्र. | |
| केन. उ.—केनोपनिषत्— | खंड, मंत्र | संपादक— |
| तै. उ.—तैत्तिरीय उपनिषत्- | वल्ली, अनुवाक, मंत्र. | |
| बृह. उ.—बृहदारण्यकोपनिषत्- | अध्याय, ब्राह्मण, मंत्र. | रा. हरि रघुनाथ भागवत |

# संक्षेपांची सूचि

**संक्षेप.** **स्पष्टीकरण.**

अ. स्प. प्र. २ पहा—अधिक स्पष्टीकरण प्रकरण २ पहाणें.

उ.—उत्तर. प्र.—प्रश्न. म्ह.—म्हणजे.

‘ पैं गुरुशिष्यांचिया एकांतीं । जे अक्षरा एकाची वदंती ।
ते मेघाचियापरी त्रिजगतीं । गर्जती सैंघ ’ ॥ ज्ञानेश्वरी.



गुरुवर्य प्रि. ह. भ. प. शंकर वामन दांडेकर. एम्. ए.

॥ ॐ ॥

# ज्ञानेश्वरी.

## ॥ अध्याय बारावा ॥

[ टीप—प्रत्येक ओवीचा अर्थ वाचल्यानंतर लगेच त्या ओवविर प्रकरण १ मध्यें दिलेलें विस्तृत निरूपण वाचावें ]

जयजय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ॥
अनवरत आनंदे । वर्षतिये ॥ १ ॥

अन्वय—वो ( गुरुकृपादृष्टि ) शुद्धे, उदारे प्रसिद्धे अनवरत आनंदे वर्षतिये;[१] ( तूं ) जयजय.[२]

अर्थ—हे ( श्रीगुरुकृपादृष्टिमाउली ) निर्मळ, उदार, प्रख्यात, अखंड आनंदाचा वर्षाव[१] करणारी[१] ( अशा तुझा ) जयजयकार[२] असो.[२]

विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताठी ॥
ते तुझेनि गुरुकृपादृष्टी । निर्विष होय ॥ २ ॥

अन्वय—( हे ) गुरुकृपादृष्टी विषयव्याळें[१] मिठी दिधलिया[२] ताठी नुठी[३]. ते ( मिठी ) तुझेनि निर्विष होय.

अर्थ—( हे ) श्रीगुरुकृपादृष्टिमाउली, विषयरूपी[१] सर्पानें[१] दंश केला[२] असतांना[२] ( येणारी ) मूर्च्छा–नाहींशी[३] होत नाहीं — तो ( मूर्च्छा आणणारा दंश ) तुझ्यामुळें विषरहित होतो.

तरि कवणातें तापु पोळी । कैसेनि वो शोकु जाळी ॥
जरि प्रसादरस कल्लोळीं । पुरें येसि तूं ॥ ३ ॥

अन्वय—वो जरि तूं प्रसादरस[१] कल्लोळीं पूरें येसि तरि कवणातें ताप पोळी, शोकु कैसेनि जाळी.

सतरावियेचें स्तन्यदेसी । अनुहताचा हल्लरु गासी ॥
समाधिबोधें निजविसी । बुझाऊनि ॥ ७ ॥

अन्वय—( तूं ) सतराविये चें स्तन्य देसी, अनुहताचा हल्लरु गासी, समाधिबोधें[१] बुझाऊनि[२] निजविसी.

अर्थ—( तूं साधकाला ) जीवनकलेचें दूध देतेस, अनाहतध्वनीचें अंगाईगीत गातेस, ( व ) समाधीचा[१] बोध[१] अनुभवास[२] आणून[२] ( तूं साधकाला स्वरूपीं ) निजावितेस.

म्हणोनि साधकां तूं माउली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं ॥
या कारणें मी साउली । न संडीं, तुझी ॥ ८ ॥

अन्वय—म्हणोनि साधकां तूं माउली, सारस्वत[१] तुझिया पाऊलीं[२] पिके[३], या[४] कारणें[४] तुझी साउली मी न संडीं.

अर्थ—म्हणून साधकांना तूं आई ( सारखी आहेस ) सर्व[१] विद्या[१] तुझ्या चरणमुद्रेच्या[२] ठिकाणीं[२] उत्पन्न[३] होतात,[३] एवढ्याकरितां[४] तुझें सान्निध्य मी सोडीत नाहीं.

अहो सद्गुरूचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ॥
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥ ९ ॥

अन्वय—अहो सद्गुरुचिये कृपादृष्टी, तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी, तो सकळ विद्यांचिये सृष्टी धात्रा होय.

अर्थ—हे सद्गुरूचे कृपादृष्टि, तुझी कृपा ज्यांच्यावर बसेल ( होईल ) तो सर्व विद्यारूपी सृष्टीचा ( उत्पादक ) ब्रह्मदेव होतो.

म्हणोनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते ॥
आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं ॥ १० ॥

अन्वय—म्हणोनि निजजनकल्पलते[१] श्रीमंते अंबे ग्रंथनिरूपणीं[२] मातें आज्ञापीं.[३]

अर्थ—म्हणून-आपल्या भक्तांची[१] ( इच्छा पुरविणारी ) कल्पलता-वैभवसंपन्न ( अशा तूं ) माते-ग्रंथाचें व्याख्यान[२] करण्यास-मला अनुज्ञा[३] दे.[३]

**अर्थ**—हे ( गुरुकृपादृष्टि ) जर तूं अनुग्रहरूपी[१] पाण्याच्या[१] लाटांनीं ( युक्त अशा ) पुरानें येशील तर कोणाला ताप जाळील? ( किंवा ) शोक कसा जाळील? ( म्ह० तुझा अनुग्रह ज्याच्यावर होईल त्याला त्रिविध ताप व शोक बाधूं शकणार नाहींत ).

योगसुखाचे सोहळे । सेवकां तुझेनि स्नेहाळे ॥
सोहंसिद्धीचे लळे । पाळिसी तूं ॥ ४ ॥

**अन्वय**—( हे ) स्नेहाळे, तुझेनि सेवकां योगसुखाचे[१] सोहळे, तूं सोहं-सिद्धीचे[२] लळे पाळिसी.

**अर्थ**—( हे ) प्रेमळ ( गुरुकृपादृष्टि ) तुझ्यामुळें भक्तांनां अष्टांगयोगाच्या[१] सुखाचे[१] उपभोग ( प्राप्त होतात ); तूं—'तें ब्रह्म[२] मी आहें' ह्या अनुभवाचे-( भक्तांचे ) लाड पुरवितेस. ( म्ह. तुझ्यामुळें भक्तांनां समाधिसुख व ब्रह्मानुभव प्राप्त होतो ).

आधारशक्तीचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं ॥
हृदयाकाशपल्लकीं । परिये देसी निजे ॥ ५ ॥

**अन्वय**—आधारशक्तीचिया[१] अंकीं ( तूं ) कौतुकीं वाढविसी, हृदयाकाश-पल्लकीं[२] निजे परिये देसी.

**अर्थ**—मूलाधारचक्रावर[१] अधिष्ठित असलेल्या कुंडलिनीच्या--मांडीवर ( तूं ) प्रेमानें (साधकास) वाढवितेस ( व ) हृदयाकाशरूपी[२] पाळण्यांत[२] (घालून) झोंपेसाठीं झोके देतेस.

प्रत्यक्ज्योतीची वोवाळणी । करिसी मनपवनांचीं खेळणीं ॥
आत्मसुखाचीं बाळलेणीं । लेवविसी ॥ ६ ॥

**अन्वय**—( तूं ) प्रत्यक्ज्योतीची वोवाळणी करिसी, मनपवनांचीं[१] खेळणीं ( करिसी ) ( व ) आत्मसुखाचीं बाळलेणीं[२] लेववविसी.

**अर्थ**—( तूं साधकरूपी बालकास ) आत्मज्योतीच्या निरांजनानें ओवाळतेस; मनाचीं[१] ( व ) प्राणाचीं[२] खेळणीं ( देतेस ) ( व ) स्वरूपानंदरूपी—लहान मुलाचे[२] दागिने-( अंगावर ) चढवितेस.

सतराविंयेचें स्तन्यदेसी । अनुहताचा हल्लरु गासी ॥
समाधिबोधें निजविसी । बुझाऊनि ॥ ७ ॥

**अन्वय**—( तूं ) सतरावियेचें स्तन्य देसी, अनुहताचा हल्लरु गासी, समाधिबोधें[1] बुझाऊनि[2] निजविसी.

**अर्थ**—( तूं साधकाला ) जीवनकलेचें दूध देतेस, अनाहतध्वनीचें अंगाईगीत गातेस, ( व ) समाधीचा[1] बोध[1] अनुभवास[2] आणून[2] ( तूं साधकाला स्वरूपीं ) निजावितेस.

म्हणोनि साधकां तूं माउली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं ॥
या कारणें मी साउली । न संडीं, तुझी ॥ ८ ॥

**अन्वय**—म्हणोनि साधकां तूं माउली, सारस्वत[1] तुझिया पाऊलीं[2] पिके[3], या[4] कारणें[4] तुझी साउली मी न संडीं.

**अर्थ**—म्हणून साधकांना तूं आई ( सारखी आहेस ) सर्व[1] विद्या[1] तुझ्या चरणमुद्रेच्या[2] ठिकाणीं[2] उत्पन्न[3] होतात,[3] एवढ्याकरितां[4] तुझें सान्निध्य मी सोडीत नाहीं.

अहो सद्‌गुरूचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ॥
तो सकळ विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥ ९ ॥

**अन्वय**—अहो सद्‌गुरुचिये कृपादृष्टी, तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी, तो सकळ विद्यांचिये सृष्टी धात्रा होय.

**अर्थ**—हे सद्‌गुरूचे कृपादृष्टि, तुझी कृपा ज्याच्यावर बसेल ( होईल ) तो सर्व विद्यारूपी सृष्टीचा ( उत्पादक ) ब्रह्मदेव होतो.

म्हणोनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते ॥
आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं ॥ १० ॥

**अन्वय**—म्हणोनि निजजनकल्पलते[1] श्रीमंते अंबे ग्रंथनिरूपणीं[2] मातें आज्ञापीं.[3]

**अर्थ**—म्हणून-आपल्या भक्तांची[1] ( इच्छा पुरविणारी ) कल्पलता-वैभवसंपन्न ( अशा तूं ) माते-ग्रंथाचें व्याख्यान[2] करण्यास-मला अनुज्ञा[3] दे.[3]

नवरसीं भरवीं सागर । करवीं उचित रत्नांचे आगर ॥
भावार्थाचे गिरिवर । निफजवीं माये ॥ ११ ॥

**अन्वय**—(हे) माये, नवरसीं सागर भरवीं,[१] उचित रत्नांचे आगर करवीं[२] भावार्थाचे गिरिवर[३] निफजवीं.[४]

**अर्थ**—(हे) आई, (मला या ग्रंथांत) नवरसांचे सागर-भरविण्यास समर्थ[१] कर;-योग्य शब्दरत्नांच्या खाणी (मजकडून) तयार[२] करीव[२] (व) तात्पर्यार्थांचे मोठाले[३] पर्वत[३] निर्माण[४] करीव.[४]

साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवीं देशियेचिया क्षोणी ॥
विवेकवेलीची लावणी । हों देईं सैंघ ॥ १२ ॥

**अन्वय**—देशियेचिया क्षोणीं साहित्यसोनियाचिया[१] खाणी उघडवीं,[२] विवेकवेलीची[३] लावणी सैंघ हों देईं.

**अर्थ**—मराठीभाषारूपी भूमीमध्यें अलंकारशास्त्ररूपी[१] सोन्याच्या[१] खाणी -खोदण्यास (मला) समर्थ[२] कर-(आणि) विचाररूपी[३] लतांची[३] लागवड पुष्कळ होऊं दे.

संवादफळनिधानें । प्रमेयाचीं उद्यानें ॥
लावीं म्हणें गहनें । निरंतर ॥ १३ ॥

**अन्वय**—संवादफळानिधानें[१] प्रमेयाचीं गहनें उद्यानें निरंतर लावीं म्हणें.

**अर्थ**—(सर्व शास्त्रांची) एकवाक्यतारूपी[१] फळांनीं[१] भरलेलीं[१],-सिद्धांतरूपी (झाडांचीं) दाट उपवनें .एकसारखी लाव, (असें मी) म्हणतों. (म्ह० विनंती करतों).

पाखांडाचे दरकुटे । मोडीं वाग्वाद अव्हांटे ॥
कुतर्कांचीं दुष्टें । सावजें फेडीं ॥ १४ ॥

**अन्वय**—पाखांडाचे दरकुटे मोडीं,[१] वाग्वादअव्हांटे[२] (मोडीं[२]) कुतर्कांचीं दुष्टें सावजें फेडीं.[४]

**अर्थ**—नास्तिकमतरूपी दऱ्या फोडून[१] टाक[१], वितंडवादरूपी[२] आडमार्ग[२] (म्ह० आडमार्गांतील लपावयाच्या जागा) (नष्ट[२] कर[२]) (व अशा रीतीनें) कुतर्करूपी हिंस्र श्वापदें हुसकून[४] लाव.[४]

श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करीं वो सरतें ॥
राणिव बैसवीं श्रोते । श्रवणाचिये ॥ १५ ॥

**अन्वय**—वो ( गुरुकृपादृष्टि ) श्रीकृष्णगुणीं[1] मातें सर्वत्र सरतें करीं, श्रोते श्रवणाचिये राणिवे बैसवी.

**अर्थ**—हे ( गुरुरुकृपादृष्टि, तूं ) श्रीकृष्णगुणांच्या[1] वर्णनांत[1] मला सर्वत्र समर्थ कर; ( आणि ) श्रोत्यांना श्रवणाच्या राज्यावर बसव.

ये मऱ्हाठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं ॥
घेणें देणें सुखचिवरी । हों देईं या जगा ॥ १६ ॥

**अन्वय**—ये मऱ्हाठियेचिया[1] नगरीं ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं, या जगा सुखाचिवरी[2] घेणें[3] देणें[3] हों देई.

**अर्थ**—या मराठी[1] भाषेच्या[1] नगरींत आत्मज्ञानाची समृद्धि कर, या जगांत ( म्हणजे जगांतील लोकांमध्यें ) केवळ[2] सुखाचीच[2] देवघेव[3] होऊं दे.

तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सदैवे ॥
तरि आतांचि हें आघवें । निर्मीन माये ॥ १७ ॥

**अन्वय**—( हे ) सदैवे माये, तूं आपुलेनि स्नेहपल्लवें[1] मातें पांघुरविशील[2] तरि हें आघवें आतांचि निर्मीन.[3]

**अर्थ**—( हे ) भाग्यशाली माते ( गुरुकृपादृष्टि ) तूं आपल्या प्रेमरूपी[1] पदराचें[1] ( जर ) मला पांघरूण[2] घालशील[2] तर हें सर्व ( ह्या वरील सर्व गोष्टी ) आतांच ( मी ) उत्पन्न[3] करीन.[3]

इये विनवणीयेसाठीं । अवलोकिलें गुरु कृपादृष्टी ॥
म्हणे गीतार्थेसीं उठीं । न बोलें बहु ॥ १८ ॥

**अन्वय**—इये विनवणीयेसाठीं गुरु कृपादृष्टी अवलोकिलें ( आणि ) म्हणे गीतार्थेसीं[1] उठीं[2] बहु न बोलें.

**अर्थ**—या विनवणीबरोबर गुरूंनीं कृपादृष्टीनें ( ज्ञानेश्वरांच्याकडे ) पाहिलें आणि म्हटलें, ‘ गीतार्थ[1] सांगण्यास[1] प्रवृत्त[2] हो;[2] फार बोलूं नकोस. ’ ( म्ह. पाल्हाळ करूं नकोस. )

तेथ जी जी महाप्रसादु । म्हणोनि साविया जाहला आनंदु ॥
आतां निरोपीन प्रबंधु । अवधान दीजे ॥ १९ ॥

**अन्वयं**—तेथ जी[१] जी[१] महाप्रसादु[१] म्हणोनि साविया आनंदु जाहला, **आतां** प्रबंधु निरोपीन[२] अवधान दीजे.

**अर्थ**—( असें गुरु म्हणालें ) तेव्हां-"(जशी जापली[१]) आज्ञा-( ही आपली मजवर ) मोठी[२] कृपा[२] ( झाली )" ( असें ज्ञानेश्वरमहाराज म्हणाले ); अशाप्रकारें सहजच ( ज्ञानदेवांनां मोठा ) आनंद झाला ( व ते म्हणाले ) " आतां ( मी ) ग्रंथाचें व्याख्यान[२] करतों[२] ( आपण ) लक्ष द्यावें. "

**अर्जुन उवाच**—अर्जुन ( भगवंतास ) म्हणाला--

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

**अन्वय**—एवं सततयुक्ताः[१] ये भक्ताः त्वां पर्युपासते अपि[२] च[२] ये अव्यक्तं अक्षरं ( पर्युपासते )[३] तेषां योगवित्तमाः[४] के ? ॥

**अर्थ**—याप्रमाणें निरंतर[१] ( व्यक्त स्वरूपाचें ठिकाणीं ) युक्त[१] असलेले[१] ( म्ह॰ भजनांत व ध्यानांत रत असलेले ) जे भक्त तुला भजतात आणि[२] जे ( भक्त ) अव्यक्त अक्षराची ( म्हणजे निर्गुणाची ) उपासना[३] करतात[३] त्यांपैकीं अति[४] उत्तम[४] योगवेत्ते[४] कोण ?

तरी सकळवीराधिराजु । जो सोमवंशीं विजयध्वजु ॥
तो बोलता जाहला आत्मजु । पांडुनृपाचा ॥ २० ॥

**अन्वय**—तरी जो सकळवीराधिराजु[१] सोमवंशीं विजयध्वजु[२] पांडुनृपाचा आत्मजु तो बोलता[३] जाहला.[३]

**अर्थ**—नंतर जो सर्ववीरांचा[१] मुख्यनायक[१] चंद्रवंशांतील जयाची[२] पताका[२] ( व ) पांडुराजाचा मुलगा तो ( अर्जुन ) म्हणाला.[३]

कृष्णातें म्हणे अवधारिलें । आपण विश्वरूप मज दाविलें ॥
तंव नवल म्हणोनि बिहालें । चित्त माझें ॥ २१ ॥

अन्वय—कृष्णातें म्हणे अवधारिलें,[१] आपण विश्वरूप मज दाविलें, तव) ( तें ) नवल म्हणोनि माझें चित्त बिहालें.[२]

अर्थ—कृष्णाला म्हणाला, ऐकलें[१] कां ?[१] आपण ( जेव्हां ) विश्वरूप मला दाखविलें, तेव्हां ( तें ) अद्भुत म्हणून माझें चित्त भयभीत[२] झालें.[२]

आणि इये कृष्णमूर्तीची सवे । यालागीं सोय धरिली जीवें ॥
तंव नको म्हणोनि देवें । वारिलें माते ॥ २२ ॥

अन्वय—आणि ( मज ) इये कृष्णमूर्तीची सवे ( आहे ) यालागीं ( हिची ) सोय जीवें धरिली, तंव देवें नको म्हणोनि माते वारिलें.[१]

अर्थ--आणखी ( मला ) ह्या कृष्णमूर्तीची संवय ( आहे ) म्हणून ( हिचा आश्रय मनानें इच्छिला, तेव्हां देवांनीं नको म्हणून मला परावृत्त[१] केलें.[१]

तरि व्यक्त आणि अव्यक्त । हें तूचि एक निभ्रांत ॥
भक्तीं पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ २३ ॥

अन्वय—तरि व्यक्त आणि अव्यक्त हें तूंचि एक निभ्रांत ( अससी ) व्यक्त भक्तीं पाविजे[१] ( व ) अव्यक्त योगें ( पाविजे )[२]

अर्थ--तरि साकार व निराकार ह्या ( दोन्हीं रूपानें ) तूंच एक निःसंशय ( आहेस ), सगुणाची भक्तीनें प्राप्ति[१] होते[१] (व) निर्गुणाची योगानें (प्राप्ति[२] होते.[२])

या दोनी जी वाटा । तूतें पावावया वैकुंठा ॥
व्यक्ताव्यक्त दारवंठां । रिगिजे येथ ॥ २४ ॥

अन्वय--जी वैकुंठा तूतें पावावया या दोनी वाटा ( असती ) येथ[१] व्यक्ताव्यक्त[२] दारवंठां रिगिजे[३].

अर्थ—महाराज श्रीकृष्णा तुम्हांला पोहचण्याकरितां या दोन वाटा (आहेत); या[१] ठिकाणीं[१] ( म्हणजे या दोन वाटांच्या शेवटीं ) व्यक्त[२] आणि[२] अव्यक्त[२] ( यांच्या ) उंबरठ्यांत शिरतां[३] येतें.[३] ( म्ह० भक्ति व योग या दोन मार्गांच्या अंतीं अनुक्रमें सगुणाची व निर्गुणाची प्राप्ति होते. )

पैं जे वानी श्यातुका । तेचि वेगळिया वाला येका ॥
म्हणोनि एकदेशीया व्यापका । सरिसा पाडू ॥ २५ ॥

**अन्वय**—जे वानी श्यातुका[१] ( असे ) तेचि ( वानी ) वेगळिया येका वाला ( असे ) म्हणोनि एकदेशीया ( आणि ) व्यापका पाडू सरिसा ( असे )

**अर्थ**—जो कस शंभर[१] भार[१] ( सोन्याच्या लगडीचा असतो ) तोच ( कस ) वेगळ्या एका वालभर ( सोन्याला असतो ) म्हणून अंशव्यापी ( आणि ) सर्व-व्यापी ( अशा दोन्ही रूपांची ) योग्यता सारखीच ( ठरते ).

अमृताचिया सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी ॥
तेचि दे अमृतलहरी । चुळीं घेतलिया ॥ २६ ॥

**अन्वय**—अमृताचिया सागरीं जे सामर्थ्याची थोरी लाभे[१] तेचि अमृतलहरी[२] चुळीं[३] घेतलिया[४] दे.

**अर्थ**—अमृताच्या समुद्रामध्यें जो प्रभावाचा उत्कर्ष प्राप्त[१] होतो[१] तोच ( उत्कर्ष ) अमृताच्या[२] लाटेंतून[२] चुळका[३] भरून[३] घेतला[४] असतां[४] मिळतो.

हे कीर माझ्या चित्तीं । प्रतीति आथि जी निरुती ॥
परि पुसणें योगपती । तें याचिलागीं ॥ २७ ॥

**अन्वय**—जी योगपती, माझ्या चित्तीं हे कीर प्रतीति निरुती आथि परि पुसणें तें याचिलागीं.[१]

**अर्थ**—महाराज योगेश्वरा, ( श्रीकृष्णा ) माझ्या मनामध्यें हीच खरोखर प्रतीति (अनुभव) निश्चयेंकरून आहे, परंतु (मी) विचारतों तें अशाचसाठीं[१] कीं[१]—

जें देवा तुम्हीं नावेक । अंगिकारिलें व्यापक ॥
तें साचचि कीं कवतिक । हें जाणावया ॥ २८ ॥

**अन्वय**—देवा जें व्यापक ( रूप ) तुम्हीं नावेक[१] अंगिकारिलें[२] तें साचचि कीं कवतिक ( होतें ) हें जाणावया.[३]

**अर्थ**—श्रीकृष्णा जें विश्वव्यापकरूप तुम्हीं कांहीं[१] काळ[१] धारण[२] केलें[२] तें ( रूप ) खरेंच कीं गमतीनें ( घेतलें होतें ) हें जाणावें[३] म्हणून[३] (मी आपणांस प्रश्न विचारीत आहें )

तरि तुजलागीं कर्म । तूंचि जयांचें परम ॥
भक्तीसी मनोधर्म । विकोनि घातला ॥ २९ ॥

अन्वय—तरि ( जयांचें ) कर्म तुजलागीं ( घडे ) तूंचि जयांचें परम (होसी) ( जिहीं ) मनोधर्म[१] भक्तीसी विकोनि घातला.

अर्थ—तरि ( ज्यांचें ) कर्म तुझ्याकरितां ( होतें ) तूंच ज्यांचें सर्वोत्कृष्ट ( ध्येय किंवा प्राप्य आहेस ) ( व ज्यांनीं आपल्या ) - मनाचा सर्व[१] व्यापार-भक्तीचे स्वाधीन केला ( म्हणजे भक्तीला अर्पण केला ).

इत्यादि सर्वापरी । जे भक्त तूतें श्रीहरी ॥
बांधोनियां जिव्हारीं । उपासिती ॥ ३० ॥

अन्वय--( हे ) श्रीहरी, इत्यादि सर्वापरी[१] जे भक्त तूतें जिव्हारीं बांधोनियां[२] उपासिती.

अर्थ--( हे ) श्रीकृष्णा, इत्यादि सर्व[१] प्रकारांनीं[१] जे भक्त तुला अंतःकरणांत दृढ[२] धरून[२] भजतात.

आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीयेसि जें कानडें ॥
कायिसयाहि सांगडें । नव्हे जें वस्तु ॥ ३१ ॥

अन्वय—आणि जें ( ब्रह्म ) प्रणवापैलीकडे[१] ( असें ) वैखरीयेसि[२] जें कानडें[२] ( असें ) ( आणि ) जें कायिसयाहि सांगडें नव्हे.

अर्थ—आणि जी ( वस्तु ) ओंकारा[१] पलीकडे[१] (आहे) व्यवहारीक[२] वाणीला[२] जिचें-वर्णन करतां[२] येत नाहीं-( आणि ) जी ( वस्तु ) कशाही सारखी ( आहे असें सांगतां येत ) नाहीं.

तें अक्षर जें अव्यक्त । निर्देशदेशरहित ॥
सोहंभावें उपासित । ज्ञानिये जें ॥ ३२ ॥

अन्वय—जी तें अक्षर अव्यक्त निर्देश[१]देशराहित[२] (वस्तु) जे ज्ञानिये[३] सोहंभावें[४] उपासित.

अर्थ--महाराज ( श्रीकृष्णा ) ती अविनाशी, निराकार,-जी दाखवितां[१] येत नाहीं; ( व ) जिचें-स्थान सांगतां[२] येत नाहीं-( अशी वस्तु ) जे ज्ञानी[३] लोक[३] -'ती ( वस्तु ) मीच[४] आहें ' अशा भावनेनें-उपासितात.

तयां आणि जी भक्तां । येरयेरांमाजीं अनंता ॥
कवणें योगु तत्त्वता । जाणितला सांगा ॥ ३३ ॥

**अन्वय**—जी अनंता तयां[१] आणि भक्तां येरयेरांमाजीं[१] कवणें तत्वता योगु (सम्यक्) जाणितला सांगा.

**अर्थ**—महाराज श्रीकृष्णा असे[१] ज्ञानी[१] आणि भक्त-या[१] दोहोंमध्यें[१]-कोणी खरोखर योग (बरोबर) जाणला (तें) सांगा.

इया किरीटीचिया बोला । तो जगद्बंधु संतोषला ॥
म्हणे हो प्रश्नु भला । जाणसी करूं ॥ ३४ ॥

**अन्वय**--इया किरीटीचिया बोला तो जगद्बंधु संतोषला[१] म्हणे हो प्रश्नु करूं[२] भला जाणसी.

**अर्थ**--या अर्जुनाच्या बोलण्यानें तो श्रीकृष्ण संतुष्ट[१] झाला[१] (आणि) म्हणाला "अरे (अर्जुना) प्रश्न कसा[२] करावा[२] (हें तूं) चांगलें जाणतोस."

**श्रीभगवान् उवाच**—श्रीभगवान् कृष्ण म्हणाले—

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

**अन्वय**--मयि[१] मनः आवेश्य नित्ययुक्ताः[२] परया श्रद्धया उपेताः[३] ये मां उपासते ते मे युक्ततमाः[४] मताः ॥

**अर्थ**—माझ्या[१] ठिकाणीं[१] मन ठेवून नेहमीं[२] युक्त[२] (स्थिरचित्त) होत्साते[२] अत्यंत श्रद्धेनें युक्त[३] होऊन[३] जे मला भजतात ते मला अतिशय[४] उत्तम[४] युक्त[४] (म्हणजे योगी) वाटतात.

तरि अस्तुगिरिचिया उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं ॥
रश्मी जैसे किरिटी । संचरती ॥ ३५ ॥

**अन्वय**—किरीटी तरि अस्तुगिरिचिया उपकंठीं रिगालिया रविबिंबापाठीं[१] जैसे रश्मी संचरती.

**अर्थ**—अर्जुना तरि अस्ताचलाच्या जवळ शिरलेल्या ( म्ह. प्राप्त झालेल्या ) सूर्यबिंबाच्या[१] मागून[१] ज्याप्रमाणें किरणें जातात.

कां वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागें पांडुसुता ॥
तैसी नीच नवी भजतां । श्रद्धा दिसे ॥ ३६ ॥

**अन्वय**—पांडुसुता कां जैसी वर्षाकाळीं सरिता चढों लागें तैसी भजतां[१] श्रद्धा नीचि नवी दिसे.

**अर्थ**—अर्जुना अथवा ज्याप्रमाणें पावसाळयांत नदी वाढूं लागते त्याप्रमाणें (माझें) भजन[१] करतांना[१] (भक्तांची) श्रद्धा प्रतिदिनीं नवीनवी दिसते.

परि ठाकिलियाहि सागरु । जैसा मागीलही यावा अनिवारु ॥
तिये गंगेचिये ऐसा पडिभरु । प्रेमभावा ॥ ३७ ॥

**अन्वय**--परि सागरु ठाकिलियाहि मागीलहि[१] यावा जैसा अनिवारु ( असे ) तिये गंगेचिये ऐसा प्रेमभावा पडिभरु ( असे ).

**अर्थ**—आणि समुद्राला पोहचल्यावरसुद्धां ( गंगेचा ) मागून[१] येणारा[१] ( पाण्याचा ) लोंढा जसा अलोट ( असतो ) ( तसा ) त्या गंगेच्या ( लोंढ्या ) प्रमाणें ( ज्यांच्या ) प्रेमभावाला भर ( असतो ).

तैसें सर्वेंद्रियांसहित । मजमाजीं सूनि चित्त ॥
जे रात्र दिवस न म्हणत । उपासिती ॥ ३८ ॥

**अन्वय**—तैसें सर्वेंद्रियांसहित[१] मजमाजीं[२] चित्त सूनि जे रात्र दिवस न म्हणत उपासिती.[३]

**अर्थ**—त्याप्रमाणें सर्व[१] इंद्रियासह[१] माझ्या[२] ठिकाणीं[२] मन लावून जे (भक्त) रात्र ( आहे कां ) दिवस ( आहे ) ( ह्याचा विचार ) न करतां ( माझी ) उपासना[३] करतात.[३]

इयापरी जे भक्त । आपणपें मज देत ॥
तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥ ३९ ॥

**अन्वय**—इयापरी जे भक्त मज आपणपें देत तेचि परम योगयुक्त मी मानीं.

**अर्थ**—अशाप्रकारें जे भक्त मला आत्मार्पण करतात तेच श्रेष्ठ योगी (असें) मी समजतों.

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥

**अन्वय**—तु ये अनिर्देश्यं अव्यक्तं सर्वत्रगं अचिन्त्यं च कुटस्थं अचलं ध्रुवं अक्षरं पर्युपासते. ॥

**अर्थ**—पण जे अनिर्देश्य ( म्ह० प्रत्यक्ष दाखवितां न येणारें ) अव्यक्त ( म्ह० निराकार ) सर्वव्यापी, अचिंत्य ( म्ह० मन बुद्धीच्या पलीकडचें ) आणि अविकारी अचल नित्य ( अशा ) अक्षराची ( म्ह० ब्रह्माची ) उपासना-( करतात ).

सन्नियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

**अन्वय**—इन्द्रियग्रामं संनियम्य[१] सर्वत्र[२] समबुद्धयः[३] सर्वभूतहिते[४] रताः[५] ( पर्युपासते[६] ) ते मां[७] एव[७] प्राप्नुवन्ति.[८]

**अर्थ**—इंद्रियसमूहाचें ( म्ह. सर्व इंद्रियांचें ) चांगलें[१] संयमन[१] करून[१] सर्व[२] ठिकाणीं[२] समानबुद्धि[३] ( म्ह. ब्रह्मबुद्धि ) होत्साते[३] ( व )-सर्व प्राण्यांच्या[४] हिता-मध्यें-रत[५] असलेले[५] ( जे वर वर्णिलेल्या अक्षराची उपासना करितात[६] ) ते मलाच[७] प्राप्त[८] होतात.[८]

आणि येर तेही पांडवा । जे आरुढोनि सोहंभावा ॥
झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥ ४० ॥

**अन्वय**—पांडवा, आणि येर तेहि जे सोहंभावा[१] आरूढोनि[२] निरवयवा अक्षरासी झोंबती.

**अर्थ**—अर्जुना आणि दुसरे तेसुद्धां जे ( योगी )-'तें ब्रह्म' मी आहे अशा भावनेचा-स्वीकार[२] करून[२] अवयवरहित ( व ) अविनाशी ( अशा ब्रह्माला ) बिलगतात.

मनाचीं नखीं न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे ॥
इंद्रियां कीर जोगें । कायि होईल ॥ ४१ ॥

**अन्वय**—जेथ[१] मनाची नखी न लगे, बुद्धीची दृष्टी न रिगे (तें) कीर इंद्रिया जोगें होईल कायि ?

**अर्थ**—ज्या[१] ठिकाणीं[१] मनाचें नख रुपत नाहीं, बुद्धीची जाणीव शिरत नाहीं; ( मग ती वस्तु ) खरोखर इंद्रियांना गोचर होईल काय ?

परि ध्यानाही कुवाडें । म्हणोनि एके ठायीं न संपडे ॥
व्यक्तीसि माजिवडें । कवणेंही नोहे ॥ ४२ ॥

**अन्वय**—परि ( तें ) ध्यानाही कुवाडें (असें) म्हणोनि एके ठायीं न संपडे, कवणेंही व्यक्तीसि माजिवडें नोहे.[१]

**अर्थ**—परंतु ( तें ) ध्यानालाही अगम्य ( असतें ) कारण ( तें ) एका ठिकाणीं सांपडत नाहीं ( आणि ) कोणत्याही आविष्कारांत अंतर्गत होत[१] नाहीं[१] ( म्हणजे कोणत्याही प्रकारें चर्मचक्षूंस गम्य होत नाहीं.)

जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळीं असणें ॥
जें पावूनि चिंतवणें । हिंपुटी जाहलें ॥ ४३ ॥

**अन्वय**—जया सर्वत्र[१] सर्वांही काळीं सर्वपणें असणें जें पावूनि[२] चिंतवणें हिंपुटी जाहलें.

**अर्थ**—ज्या ( वस्तूचें ) सर्व[१] ठिकाणीं[१] सर्व काळीं, सर्वरूपानें अस्तित्व ( असतें ) ज्याचा-विचार[२] करूं जातां-चिंतनसामर्थ्य ( आपल्या असामर्थ्या-बद्दल ) लज्जित झालें.

जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे ॥
ऐसें म्हणोनि उपाये । उपजतीचिना ॥ ४४ ॥

**अन्वय**—जें होय[१] ना नोहे[२] ( ना ) जें नाहीं ना,[३] आहे ( ना[४] ) ऐसें म्हणोनि उपाये उपजतीचिना.[५]

**अर्थ**—जें उत्पन्न[१] होत[१] नाहीं ( व ) नाशही[२] पावत[२] नाहीं; जें नाहीं असेंही[३] नाहीं[३] ( व ) आहे ( असेंही[४] नाहीं;[४] ) असें ( आहे ) म्हणून ( त्याला पोहचविणारीं ) साधनें संभवतच[५] नाहींत.[५]

जें चळे ना ढळे । सरे ना मैळे ॥
तें आपुलेनीचि बळें । आंगविलें जिहीं ॥ ४५ ॥

**अन्वय**—जें ढळे (ना) चळे ना; सरे ना मैळे (ना) तें जिहीं आपुलेनीचि बळें आंगविलें.[१]

**अर्थ**—जें सरतही नाहीं, (व) हालतही नाहीं, संपतही नाहीं, (व) मळतही नाहीं तें ज्यांनीं आपुल्याच सामर्थ्यानें आत्मसात्[१] (म्हणजे स्वाधीन) करून[१] घेतलें.[१]

पैं वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें ॥
अधपलीं तवकें । इंद्रियें धरिलीं ॥ ४६ ॥

**अन्वय**—(जिहीं) वैराग्यमहापावकें[१] विषयांचीं कटकें जाळूनि अधपलीं इंद्रियें तवकें धरिलीं.

**अर्थ**—(ज्यांनीं)—वैराग्यरूप मोठ्या[१] अग्नीनें-विषयांचीं सैन्यें जाळून (ज्यांनीं) होरपळलेलीं इंद्रियें धैर्यानें पकडलीं.

मग संयमाची धाटी । सूनि मुरडिलीं उफराटीं ॥
इंद्रियें कोंडिलीं कपाटीं । हृदयाचिया ॥ ४७ ॥

**अन्वय**—मग इंद्रियें संयमाची धाटी सूनि उफराटीं मुरडिलीं, हृदयाचिया कपाटीं कोंडिलीं.

**अर्थ**—नंतर इंद्रियांवर निग्रहाची धाड घालून (म्हणजे इंद्रियांचा निग्रह करून) (त्यांना) मागें वळविलीं (आणि) हृदयाच्या गुहेंत कोंडलीं (म्ह० दाबून ठेविलीं).

अपानींचिया कवाडा । लावोनि आसनमुद्रा सुहाडा ॥
मूळबंधाचा हुडा । पन्नासिला ॥ ४८ ॥

**अन्वय**—(हे) सुहाडा, अपानींचिया कवाडा आसनमुद्रा[१] लावोनि मूळबंधाचा हुडा पन्नासिला.[२]

**अर्थ**—(हे) सुज्ञा (अर्जुना) अपानवायूच्या मार्गाला (म्हणजे गुदद्वाराला) आसनरूपी[१] फळी[१] (किंवा खिटी) लावून मूळबंधाचा बुरुज सज्ज[१] केला.[२]

आशेचे लाग तोडिले । अधैर्याचे कडे झाडिले ॥
निद्रेचें शोधिले । काळवखें ॥ ४९ ॥

**अन्वय**—आशेचे लाग तोडिले, अधैर्याचे कडे झाडिले[१] निद्रेचे काळवखें शोधिलें.[२]

**अर्थ**—आशेचे संबंध तोडले, भित्रेपणाचे कडे साफ[१] केले,[१] ( म्ह० ढासळून टाकले ) झोपेचा अंधार नष्ट[२] केला.[२]

वज्राग्नीचिया ज्वाळीं । करूनि सप्तधातूंची होळी ॥
व्याधींच्या सिसाळीं । पूजिलीं यंत्रें ॥ ५० ॥

**अन्वय**—वज्राग्नीचिया ज्वाळीं सप्तधातूंची होळी करूनि व्याधींच्या सिसाळीं यंत्रें पूजिलीं.

**अर्थ**—वज्राग्नीच्या (म्हणजे वज्रासनानें उत्पन्न केलेल्या उष्णतेच्या) ज्वाळांनीं सप्तधातूंचा होम करून रोगरूपी मुंडक्यांनीं ( प्राणायामरूपी ) तोफा पूजिल्या.

मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा ॥
तया चोजवले प्रभा । निमथावरी ॥ ५१ ॥

**अन्वय**—मगे आधारीं कुंडलिनियेचा टेंभा उभा केला, तया प्रभा निमथावरी चोजविले.

**अर्थ**—नंतर आधारचक्रावर कुंडलिनीची मशाल उभी केली ( व ) तिच्या प्रकाशाला ब्रह्मरंध्रापर्यंत पोहचविलें ( म्हणजे तिचा प्रकाश पाडला ).

नवद्वारांचिया चौचकीं । बाणूनि संयतीची आडवंकी ॥
उघडली खिडकी । ककारांतींची ॥ ५२ ॥

**अन्वय**—नवद्वारांचिया चौचकीं संयतीची आडवंकी बाणूनि ककारांतींची खिडकी उघडली.[१]

**अर्थ**—( शरीरांतील ) नऊ प्रवेशांच्या द्वारांना निग्रहाचा आडसर घालून सुषुम्नानाडीचें मुख उघडण्यांत[२] आलें.[१]

प्राणशक्तिचामुंडे । प्रहारुनि संकल्पमेंढे ॥
मनोमहिषाचेनि मुंडें । दिधलीं बळी ॥ ९३ ॥

**अन्वय**—प्राणशक्तिचामुंडे[१] संकल्पमेंढे[२] प्रहारुनि, ( तेयांचीं मुंडें ) मनोमहिषाचेनि[२] मुंडें बळी दिधलीं.

**अर्थ**—प्राणशक्तिरूप[१] चामुंडा[१] देवीला[१] संकल्परूपीं[२] मेंढे[२] मारून ( त्यांचीं मुंडकीं ) मनोरूपी[३] रेड्याचें[३] मुंडक्यासह बळी दिलीं ( म्ह० अर्पिलीं ).

चंद्रसूर्यां बुझावणी । करूनि अनुहताची सुडावणी ॥
सतरावियेचें पाणी । जिंतिलें वेगीं ॥ ९४ ॥

**अन्वय**—चंद्रसूर्यां[१] बुझावणी ( आणि ) अनुहताची सुडावणी करूनि, सतरावियेचें पाणी वेगीं जिंतिलें.

**अर्थ**—इडा[१] ( व ) पिंगला[१] ( यांतील वाहणाऱ्या वायूंचे, सुषुम्नेंत ) ऐक्य ( करून ); अनाहताचा गजर करून जीवनकलेचें अमृत त्वरेनें जिंकलें.

मग मध्यमामध्यविवरें । तेणें कोरिवें दादरें ॥
ठाकिलें चवरें । ब्रह्मरंध्रींचें ॥ ९५ ॥

**अन्वय**—मग मध्यमामध्यविवरें,[१] तेणें कोरिवें दादरें ब्रह्मरंध्रींचें चवरें ठाकिलें.

**अर्थ**—मग सुषुम्नानाडीच्या[१] मध्यांतील पोकळीनें–( म्हणजेंच ) त्या कोरीव जिन्यानें ब्रह्मरंध्राचें शिखर गांठलें.

वरी मकारांत सोपान । ते सांडोनियां गहन ॥
काखे सूनियां गगन । भरले ब्रह्मीं ॥ ९६ ॥

**अन्वय**—वरी ते मकारांत गहन सोपान सांडोनियां, गगन काखे सूनियां ब्रह्मीं भरले.[२]

**अर्थ**—नंतर ते ( योगी ) ( ओंकारध्वनीची जी तिसरी मात्रा मकार त्या ) मकारान्तरूपानें ( असलेला ) कठीण जिना ओलांडून, मूर्ध्न्याकाशाला बगलेंत मारून, ब्रह्मामध्यें प्रवेश[२] करतात.[२]

ऐसेन जे समबुद्धि । गिळावया मोहंसिद्धी ॥
आंगवितातिं निरवधी । योगदुर्गें ॥ ५७ ॥

अन्वय--ऐसेन जे समबुद्धि,[१] सोहंसिद्धि[१] गिळावया, निरवधी योहदुर्गें[२] आंगवितातिं.[४]

अर्थ--अशाप्रकारें जे ब्रह्मैक्यबुद्धिधारणकरणारे[१] ब्रह्मैक्यभावनेचा[२] प्रत्यय[१] येण्याकरितां अमर्याद योगरूपीं[२] किल्ले[३]-स्वाधीन[४] करून घेतात.—

आपुलिया साटोवाटीं । शून्य घेती उठाउठी ॥
तेही मातेंचि किरीटी । पावती गा ॥ ५८ ॥

अन्वय--गा किरीटी ( जे ) उठाउठी आपुलिया साटोवाटीं शून्य घेती तेही मातेंचि पावती.

अर्थ—अरे अर्जुना ( जे ) त्वरेनें आपल्या मोबदल्यानें ( म्ह० आपुलें जीवत्व देऊन ) अव्यक्त घेतात तेसुद्धां मलाच मिळतात.

वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे ॥
ऐसें नाहीं आगळें । कष्टचि तयां ॥ ५९ ॥

अन्वय—वांचूनि योगाचेनि बळें कांहीं आधिक मिळे ऐसें नाहीं, तयां आगळें कष्टचि[१] ( होती).

अर्थ--येऱ्हवी योगाच्या सामर्थ्यानें कांहीं जास्त मिळतें असें नाहीं, त्यांना अधिक कष्ट[१] मात्र[१] ( पडतात ).

**क्लेशोऽधिकरस्तेषामव्यक्तासक्तचेनसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥**

अव्यक्तासक्तचेतसां[१] तेषां क्लेशः अधिकतरः[२] हि देहवाद्भिः[३] अव्यक्ता गतिः दुःखं अवाप्यते.[४]

अर्थ--( पण )-अव्यक्ताचें[१] ( म्ह० ब्रह्माचें ) ठिकाणीं आसक्त चित्त असले-ल्यानां— त्यांना क्लेश अधिक[२] पडतात[२] कारण देहधारी[३] मनुष्यांना[३] अव्यक्तो-पासनेचा मार्ग कष्टानें साध्य[४] होतो.[४]

जिहीं सकळभूतांचिया हितीं । निरालंबीं अव्यक्तीं ॥
पसरलिया आसक्ती । भक्तीवीण ॥ ६० ॥

**अन्वय**--जिहीं सकळभूतांचिया[१] हितीं[१] निरालंबीं अव्यक्तीं[२] भक्तीवीण आसक्ती पसरलिया.

**अर्थ**--ज्यांनीं सर्व[१] प्राण्यांचें[१] हित[१] असणाऱ्या,[१] निराधार (व) अव्यक्ताचें[२] (ब्रह्माचें) ठिकाणीं[२] भक्तीशिवाय आवडी धरली.

तया महेंद्रादि पदें । करिताति वाटवधें ॥
आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ॥ ६१ ॥

**अन्वय**—महेंद्रादि पदें तयां वाटवधें करिताति आणि ऋद्धिसिद्धींचीं[१] द्वंद्वें पडोनि ठाती.

**अर्थ**--इंद्रादिकांचे अधिकार त्यांना वाटमारेपणा करतात (म्ह. त्यांची वाट अडवितात व त्यांना भुरळ घालतात) आणि (पार्थिव) ऐश्वर्यें[१] (व) सिद्धि[१] (यांचीं) द्वंद्वें (म्ह० त्यांच्यापासून उत्पन्न होणारे सुखदुःखादि विरुद्ध भाव त्यांना अडविण्यासाठीं वाटेंत) पडून राहतात.

कामक्रोधांचे विलग । उठावती अनेग ॥
आणि शून्येंसीं आंग । झुंझवावें कीं ॥ ६२ ॥

**अन्वय**—कामक्रोधांचे अनेग विलग उठावती[१] आणि शून्येंसीं आंग झुंझवावें[२] कीं[२]

**अर्थ**—कामक्रोधांचे पुष्कळ उपद्रव उत्पन्न[१] होतात[१] व निराकाराबरोबर शरीराकडून निश्चयानें[२]-सामना[२] द्यावा लागतो.-(म्ह० ब्रह्मप्राप्तिसाठीं लढण्याइतके शरीरानें कष्ट करावे लागतात.)

ताहानें ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी ॥
अहोरात्र वावीं । मवावा वारा ॥ ६३ ॥

**अन्वय**—ताहानें ताहानचि पियावी (लागते) भुकेलिया[१] भूकचि खावी (लागते); अहोरात्र वावीं वारा मवावा (लागतो.)

**अर्थ**--ताह्नेला ताहनच प्यावी ( लागते )-भूक लागली[१] असतां-भूकच खावी ( लागते ) रात्रंदिवस वावांनी वारा मोजावा ( लागतो ) ( म्ह० कवळीं-मध्यें वारा पकडावा लागतो. )

उन्निद्रेयाचें पहुडणें । निरोधाचें वेल्हावणें ॥
झाडासी साजणें । चालावें गा ॥ ६४ ॥

**अन्वय**--गा ( अर्जुना ) पहुडणें उन्निद्रेयाचें;[१] वेल्हावणें[२] विरोध झाडासी चालावें[३].

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) ( तेथील ) निजणें (म्हणजे) जागया[१] मनुष्याचें[१] प्रेम[२] करणें[२] म्ह० निग्रहाचेंच, (व तेथील) मैत्री वृक्षाबरोबरच करावी[३] लागते.[३]

शीत वेढावें । उष्ण पांघुरावें ॥
वृष्टीचिया असावें । घराआंतु ॥ ६५ ॥

**अन्वय**--शीत वेढावें, उष्ण पांघुरावें,[१] वृष्टीचिया घराआंतु असावें.

**अर्थ**--थंडीच नेसावी, उन्हाचेंच पांघरूण[१] घ्यावें[१] ( आणि ) पावसाच्याच घरांत राहावें.

किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नीच नवा ॥
भातारेंवीण करावा । तो हा योगु ॥ ६६ ॥

**अन्वय**--पांडवा, किंबहुना[१] ( जो ) हा भातारेंवीण नीच नवा अग्निप्रवेशु करावा तो हा योगु ( असे )

**अर्थ**—अर्जुना,-फार काय[१] सांगावे,-( जो )हा पतीवाचून प्रतिदिनीं नव्यानें अग्निप्रवेश करणें ( म्हणजे सती जाणें ) तो हा योग ( होय. )

एथ स्वामीचें काज । ना बापिकें व्याज ॥
परि मरणेंसीं जुंझ । नित्य नवें ॥ ६७ ॥

**अन्वय**—एथ स्वामीचें काज ना, बापिकें[१] व्याज ना, परि नित्य नवें मरणेंसीं जुंझ ( असे )

**अर्थ**—या-ठिकाणीं ( म्हणजे या योगामध्यें ) धन्याची कामगिरी ( बजवावयाची ) नसते; वंशपरंपरा[१] आलेल्या[१] ( वैराच्या सूडाचें ) निमित्त नसतें तरी-पण प्रतिदिवशीं नव्यानें मरणाबरोबर लढाई ( खेळावी लागते. )

ऐसें मृत्युहूनि तिख । कां घोंटे कढत विख ।।
डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ।। ६८ ।।

**अन्वय**--ऐसें मृत्यूहूनि तिख कढत विख घोंटे[१] कां डोंगर गिळितां[२] मुख फाटे न काई.

**अर्थ**--याप्रमाणें मृत्यूपेक्षां जहाल रसरसीत विष गिळवतें[१] काय[१] किंवा पर्वत गिळत[२] असतांनां[२] तोंड फाटणार नाहीं का ?

म्हणोनि योगाचियां वाटा । जे निगाले गा सुभटा ।।
तयां दुःखाचाचि वांटा । भागा आला ।। ६९ ।।

**अन्वय**—गा सुभटा म्हणोनि जे योगाचियां वाटा निगाले तयां भागा दुःखाचाचि वांटा आला.

**अर्थ**—अरे अर्जुना, म्हणून जे योगाच्या मार्गाला लागले त्यांच्या वाट्याला दुःखाचाच अंश आला.

पाहें पां लोहाचे चणे । जैं बोचरिया पडती खाणें ।।
तैं पोट भरणें कीं प्राणें । शुद्धी म्हणों ।। ७० ।।

**अन्वय**—पाहें[१] पां जैं लोहाचे चणे बोचरिया[२] खाणें पडती तैं ( तें ) पोट भरणें म्हणों कीं प्राणें[३] शुद्धी ( म्हणों ).

**अर्थ**—विचार[१] कर[१] बरें; जर लोखंडाचे फुटाणे दंतहीन[२] माणसाला[२] खावें लागले तर ( त्या कृत्याला ) पोट भरणें म्हणावें किंवा-प्राण खर्ची[३] घालून-सुटका ( करून घेणें म्हणावें ).

म्हणोनि समुद्र बाहीं । तरणें आथि केंही ।।
कां गगनामाजीं पाईं । खोलिजतु असे ।। ७१ ।।

**अन्वय**—म्हणोनि बाहीं समुद्र तरणें[१] केंही आथि;[२] कां पाईं गगनामाजीं खोलिजतु असे ( कां ).

**अर्थ**—म्हणून बाहूंनीं सागर तरून[१] जाणें[१] कोठें ( शक्य ) आहे[२] का[२] ? अथवा पायानें आकाशामध्यें चालणें होईल. ( काय ? )

वळघलिया रणाची थाटी । आंगीं न लगतां काठी ॥
सूर्याची पाउटी । कां होय गा ॥ ७२ ॥

**अन्वय**—गा रणाची थाटी वळघलिया[१] आंगीं काठी[२] न लगतां सूर्याची पाउटी होय कां.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) युद्धाच्या गर्दीत शिरले[१] असतां[२] अंगावर कांठीचा[३] प्रहार[४] न बसतां सूर्याची ( म्हणजे सूर्यबिंब ही ) पायरी होईल काय ?

यालागीं पांगुळा हेवा । नव्हे वायूसि पांडवा ॥
तेवीं देहवंता जीवां । अव्यक्तीं गति ॥ ७३ ॥

**अन्वय**—पांडवा यालागीं ( जेवीं ) पांगुळा वायूसि हेवा नव्हे[१] तेवीं देहवंता जीवां अव्यक्तीं[२] गति ( नोहे.)

**अर्थ**—अर्जुना म्हणून ( ज्याप्रमाणें ) पांगळ्याची वायूबरोबर स्पर्धा संभवत[१] नाहीं[२] त्याचप्रमाणें शरीरधारी प्राण्याला अव्यक्ताच्या[१] ठिकाणीं[२] प्रवेश ( होत नाहीं ).

ऐसाही जरी धिंवसा । बांधोनियां आकाशा ॥
झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥ ७४ ॥

**अन्वय**—ऐसाही[१] जरी धिंवसा बांधोनियां आकाशा झोंबती[२] तरी क्लेशा पात्र होती.

**अर्थ**—असें[१] असतांहीं[१] जर ( कोणी ) उत्साह धरून आकाशाला बिलगूं[२] पाहतील[२] तर ( ते केवळ ) कष्टालाच पात्र ( योग्य ) होतील.

म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा ॥
जे कां भक्तिपंथा । वोटंगले ॥ ७५ ॥

**अन्वय**—पार्था, म्हणोनि जे कां भक्तिपंथा वोटंगले[१] ते येर हे व्यथा नेणतीचि.[२]

**अर्थ**—अर्जुना म्हणून जे कोणी भक्तिमार्गाचा आश्रय[१] करतात;[१] ते दुसरे ( भक्त ) हें दुःख जाणत[२] नाहींत[२] ( म्हणजे त्यांना दुःख भोगावें लागत नाहीं.)

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥

**अन्वय**—तु ये मयि[१] सर्वाणि कर्माणि संन्यस्य[२] मत्पराः[३] अनन्येन योगेन मां[४] एव[४] ध्यायन्तः[५] उपासते.[६]

**अर्थ**—पण जे माझे[१] ठिकाणीं[१] सर्व कर्मे अर्पण[२] करून[२] मत्परायण[३] होत्सातें[३] अनन्य-योगानें ( भक्तीनें ) माझेंच[४] ध्यान[५] करणारे[५] ( असे जे भक्त माझी ) उपासना[६] करतात.[६]

कर्मेंद्रियें सुखें । करितीं कर्मे अशेखें ॥
जियें कां वर्ण विशेखें । भागा आलीं ॥ ७६ ॥

**अन्वय**—जियें कां कर्मे वर्णविशेखें भागा आलीं ( तियें ) अशेखें ( कर्मे ) कर्मेंद्रियें सुखें करितीं.

**अर्थ**—जी कां कर्मे ( आपआपल्या ) जातीनुसार ( भक्तांच्या ) वाट्याला येतात ( तीं ) सगळीं ( कर्मे ) ( त्यांचीं ) कर्मेंद्रियें आनंदानें करतात.

विधीतें पाळित । निषेधातें गाळित ॥
मज देऊनि जाळित । कर्म फळें ॥ ७७ ॥

**अन्वय**—विधीतें[१] पाळित निषेधातें गाळित मज कर्मफळें[२] देऊनि ( कर्म ) जाळित.[३]

**अर्थ**—शास्त्रांनीं सांगितलेलीं[१] कर्मे[१]-करतात; निषिधलेलीं ( म्ह० मनाई केलेलीं ) ( कर्मे ) टाकतात, (आणि) मला कर्मांचीं[२] फळें[२] देऊन (कर्मे) जाळून[३] टाकतात.[३] ( म्ह० भोग द्यावयास शिल्लक ठेवीत नाहींत. )

ययापरी पाहीं । अर्जुना माझे ठाईं ॥
संन्यासूनि नाहीं । करिती कर्मे ॥ ७८ ॥

**अन्वय**—अर्जुना पाहीं,[१] ययापरी माझे ठाईं ( कर्मफळें ) संन्यासूनि[२] कर्मे नाहीं करिती.

**अर्थ**- अर्जुना, विचार[१] कर;[१] याप्रमाणें माझ्या ठिकाणीं ( कर्मफळें ) अर्पण[२] करून[२] ( तीं ) कर्मे नष्ट करतात.

आणिकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव ॥
तयां मीवांचूनि धांव । आनौती नाहीं ॥ ७९ ॥

**अन्वय**—आणिकही जे जे सर्व कायिक वाचिक मानसिक भाव तयां मी[१]-वांचुनि आनौती धांव नाहीं.

**अर्थ**—आणिकही जे जे सर्व शरीराचे वाणीचे (व) मनाचे व्यापार (आहेत) त्यांना मी[१] सोडून[१] निराळा आश्रय नसतो.

ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर ॥
ध्यानमिषें घर । माझें झाले ॥ ८० ॥

**अन्वय**—ऐसे जे मत्पर[१] निरंतर (मज) उपासिती[२] (ते) ध्यानमिषें[३] माझें घर झाले.

**अर्थ**—अशाप्रकारचे जे-मलाच[१] वाहिलेले[१] असतात[१]—(व) अखंड (माझी) उपासना[२] करतात[२] (ते) ध्यानाच्या[३] साधनानें[३] माझें (राहण्याचें) ठिकाण होतात.

जयांचिया आवडी । केली मजशीं कुळवाडी ॥
भोग मोक्ष बापुडीं । त्याजिलीं कुळें ॥ ८१ ॥

**अन्वय**—जयांचिया आवडी, मजशीं कुळवाडी केली भोग[१] मोक्ष बापुडीं कुळें त्याजिलीं.[२]

**अर्थ**—ज्यांचें प्रेम माझ्याशीं व्यवहार करतें (व) ऐहिक[१] सुखें[१] (आणि) मोक्ष (ही) गरीब (शेत कसणारीं) कुळें टांकून[२] देतें.[२]

ऐसे अनन्ययोगें । विकले जीवें मनें आंगें ॥
तयांचें कायि एक सांगें । जें सर्व मी करीं ॥ ८२ ॥

**अन्वय**—ऐसें अनन्ययोगें जीवें मनें आंगें (जे मज) विकले तयांचें कायि एक सांगें जें सर्व[१] मी करीं.

**अर्थ**—याप्रमाणें अनन्यभक्तीनें जीवानें मनानें (व) शरीरानें (जे स्वतःस मला) विकतात; त्यांची कोणती एक (गोष्ट मी करतों म्हणून) सांगू; कारण (त्यांचें) प्रत्येक[१] कार्य[१] मी करतों.

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

**अन्वय**—( हे ) पार्थ, तेषां मयि[१] आवेशितचेतसाम्[२] अहं न[३] चिरात् मृत्युसंसारसागरात्[४] समुद्धर्ता[५] भवामि ॥

**अर्थ**—( हे ) अर्जुना त्या माझ्या[१] ठिकाणीं[१] चित्त[२] ठेवलेल्यांचा[२] मी अगदीं[३] लवकर[३]-मृत्युरूप संसार[४] समुद्रांतून-उत्तम प्रकारें उद्धार[५] करणारा-होतो.

किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा ॥
तो मातेचा सोयरा । केतुला पां ॥ ८३ ॥

**अन्वय**—धनुर्धरा किंबहुना[१] जो मातेचिया उदरा ये तो मातेचा केतुला पां सोयरा. ( असे )

**अर्थ**—अर्जुना-फार काय[१] सांगावे-जो आईच्या पोटीं जन्मतो तो आईला किती बरें आत्मीय ( वाटतो ) ?

तेवीं मी तयां । जैसे असती तैसियां ॥
कळिकाळ नोकोनियां । घेतला पटा ॥ ८४ ॥

**अन्वय**—तेवीं ( ते ) जैसे असती तैसियां तयां मी ( असे ) कळिकाळ नोकोनियां[१] ( मी ) पटा घेतला.

**अर्थ**—त्याप्रमाणें ( ते ) जसे असतील तशा त्यांना मी ( आईप्रमाणें असतों ). ( त्यांच्यावर येणारीं मृत्युसारखीं ) संकटें हरण[१] करून[१] ( त्यांचा रक्षणाचा ) ( मी आपणांवर ) भार घेतों.

एऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता ॥
काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ ८५ ॥

**अन्वय**—एऱ्हवीं[१] तरी[१] माझिया भक्तां आणि ( तयां ) संसाराची चिंता; समर्थाची कांता कोरान्न[२] मागे काय ?

**अर्थ**—एऱ्हवीसुद्धां[१] माझे भक्त ! आणि ( त्यांना ) संसाराची काळजी ? ( असें कधींच घडणार नाहीं ) श्रीमंताची बायको कोरडी[२] भिक्षा[२] मागेल काय ?

तैसे ते माझे । कलत्र हें जाणिजे ॥
कायिसेनिही न लाजे । तयांचेनि मी ॥ ८६ ॥

**अन्वय**—तैसे ते माझे कलत्र हें जाणिजे तयांचेनि कायिसेनिही[१] मी न लाजे.[२]

**अर्थ**—त्याप्रमाणें ते (मला) माझ्या स्त्री (सारखेच रक्षण पोषणार्ह आहेत) असें समज; त्यांच्यासाठीं-करावयाच्या कोणत्याही[१] कृत्याची-मला लाज[२] वाटत नाहीं—

जन्ममृत्यूचिया लाटीं । झळंबती इया सृष्टी ॥
ते देखोनियां पोटीं । ऐसें जाहलें ॥ ८७ ॥

**अन्वय**—इया सृष्टी जन्ममृत्यूचिया लाटीं झळंबती[१] ते देखोनियां पोटीं ऐसें जाहलें.[२]

**अर्थ**—हीं भुवनें जन्ममृत्यूच्या लाटांत-गटंगळ्या खात[१] आहेत—हें पाहून (माझ्या) मनांत असा विचार[२] आला.[३]

भवसिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे ॥
येथ जरी कीं माझे । बिहिती हन ॥ ८८ ॥

**अन्वय**—भवसिंधूचेनि माजें कवणासि धाकु नुपजे[१] येथ जरी कीं माझे बिहिती.

**अर्थ**—संसारसागराच्या पूरानें कोणाला भय-उत्पन्न होत[१] नाहीं ?—[२] ठिकाणी (म्ह० या पूराला) जर कदाचित माझे (भक्त) भितील (तर).

म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ॥
करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ॥ ८९ ॥

**अन्वय**—गा पांडवा म्हणोनि मूर्तीचा मेळावा करूनि त्यांचिया गांवा धांवतु आलों.

**अर्थ**—अरे अर्जुना, म्हणून शरीराचा संयोग करून (म्ह० मनुष्य देह धारण करून मी) त्यांच्या गांवाला (म्ह० मृत्यू लोकांला) धांवत आलों.

नामाचिया सहस्रवरी । नावा इया अवधारीं ॥
सजूनियां संसारीं । तारू जाहलों ॥ ९० ॥

**अन्वय**—( अर्जुना ) अवधारीं[१] इया सहस्रवरी नामाचिया नावा सजूनियां[२] संसारीं तारू जाहलों.

**अर्थ**—( अर्जुना ) लक्षांत[१] ठेव.[१] ह्या हजारों नामांच्या होड्या सिद्ध[२] करून[२] ( मी भक्तांनां ) संसारसागरांतून ( तारण्यासाठीं ) तारक झालों.

सडे जे देखिले । ते ध्यानकासे लाविले ॥
परिग्रही घातले । तरियावरी ॥ ९१ ॥

**अन्वय**—जे सडे देखिले ते ध्यानकासे[१] लाविले परिग्रही तरियावरी घातले.

**अर्थ**—जे ( भक्त ) एकटे ( अंतर्बाह्य परिग्रहरहित ) पाहिले त्यांना ध्यानरुपी[१] काचाला[१] ( ध्यानमार्गाला ) लावले ( व ) कुटुंबी ( परिग्रही ) ( नामरूपी ) नौकांवर घातले.

प्रेमाची पेटी । बांधली एकाचां पोटीं ॥
मग आणिले तटीं । सायुज्याचिया ॥ ९२ ॥

**अन्वय**—एकांचां[१] पोटीं प्रेमाची पेटी बांधली मग सायुज्याचि[illegible] आणिलें.

**अर्थ**—कांहीं[१] जणांच्यां[१] पोटाला प्रेमाची सांगड बांधली नंतर ( त्यांना ) मोक्षाच्या तीराला आणलें.

परि भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि आघवे ॥
वैकुंठींचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥

**अन्वय**—परि भक्तांचेनि नांवें चतुष्पदादि आघवे वैकुंठींचिये राणिवे योग्य केले.

**अर्थ**—परंतु भक्त म्हणून पश्वादि सर्व ( प्राण्यांना ) वैकुंठाच्या राज्यावर ( बसण्यास ) पात्र केलें.

म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता ॥
तयातें समुद्धर्ता । आर्था मी सदा ॥ ९४ ॥

**अन्वय**—गा मी सदा तयातें समुद्धर्ता[१] ( असें ) म्हणोनि भक्तां एकही चिंता नाहीं.

अर्थ—अरे (अर्जुना) मी नेहमींच त्यांचा उद्धार[१] करणारा[१] (असतो) म्हणून (त्या माझ्या) भक्तांनां एकही काळजी नसते.

आणि जेव्हांचि का भक्तीं। दिधली आपुली चित्तवृत्ती ॥
तेव्हांचि मज सूती। त्यांचिये नाटीं ॥ ९५ ॥

अन्वय—आणि जेव्हांचि भक्तीं आपुली चित्तवृत्ती दिधली तेव्हांचि मज त्यांचिये नाटीं सूती.

अर्थ—आणि ज्यावेळेसच भक्त आपुली चित्तवृत्ती (मला) देतात त्या-वेळेसच (ते) मला त्यांच्या छंदांत घालतात.

याकारणें गा भक्तराया। हा मंत्र तुवां धनंजया ॥
कीजे जे यया। मार्गा भजिजे ॥ ९६ ॥

अन्वय—गा भक्तराया धनंजया, याकारणें हा मंत्र तुवां कीजे, जे यया मार्गा भजिजे.[१]

अर्थ—अरे भक्तश्रेष्ठा अर्जुना, एवढ्याकरितां हें रहस्य तूं अनुसरावें कीं, "ह्या मार्गाचा आश्रय[१] करावा[१]."

**मय्येव मन आधत्स्व मयि बुध्दिं निवेशय।**
**निवसिष्यसि मय्येव अत उर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

अन्वय—मयि[१] एव मनः आधत्स्व; मयि[२] बुद्धिं निवेशय[३]; अतः उर्ध्वं मयि[४] एव[४] निवसिष्यसि[५] न संशयः ॥

अर्थ—(म्हणून) माझ्याच[१] ठिकाणीं[१] मन ठेव; माझ्या[२] ठायीं[२] बुद्धि स्थिर[३] कर[३] म्हणजे पुढें (म्ह० मेल्यावर) माझ्या[४] ठिकाणींच[४]-तूं निवास[५] करशील-(यांत) संशय नाहीं.

अगा मानस हें एक। माझ्या स्वरूपीं वृत्तिक ॥
करुनि घालीं निष्टंक। बुद्धि निश्चयेंसी ॥ ९७ ॥

अन्वय—अगा हें एक मानस माझ्या स्वरूपीं[१] निष्टंक वृत्तिक करूनि घालीं (आणि) बुद्धि निश्चयेंसी (माझ्या स्वरुपीं घालीं)

अर्थ—अरे ( अर्जुना ) हें ( केवळ ) एक मन माझ्या स्वरूपाच्या[१] ठिकाणीं[१] पूर्णपणें वतनदार करून ठेव ( तशीच ) बुद्धिही निश्चयानें (माझ्या ठिकाणीं लाव).

इयें दोनी सरिसीं । मजमाजीं प्रेमेसीं ॥
रिगालीं तरी पावसी । मातें तूं गा ॥ ९८ ॥

अन्वय—गा ( जरी ) इयें दोनी सरिसीं मजमाजीं[१] प्रेमेसीं रिगालीं[२] तरी तूं मातें पावसी.

अर्थ—अरे ( अर्जुना ) ( जरी ) हीं दोन्हीं जोडीनें माझ्या[१] ठिकाणीं[१] प्रेमानें प्रविष्ट[२] झालीं[२] तर तूं मला ( निश्चयानें ) पावशील.

जे मन बुद्धि इहीं । घर केलें माझ्या ठायीं ॥
तरि सांगें मग काई । मी तूं ऐसें उरे ॥ ९९ ॥

अन्वय—जे मन बुद्धि इहीं माझ्या ठायीं घर केलें तरि मग मी तूं ऐसें उरे काई सांगे.

अर्थ—कारण मन ( व ) बुद्धि यांनीं माझ्या ठिकाणीं ( जर ) वास्तव्य केलें तर मग "मी तूं असा ( भेद ) उरेल काय ?" बोल.

म्हणोनि दीप पालवे । सवेंचि तेज मालवे ॥
कां रविबिंबासवें । प्रकाशु जाय ॥ १०० ॥

अन्वय—म्हणोनि ( जैं ) दीप पालवे[१] ( तैं ) सवेंचि तेज मालवे[२] कां रविबिंबासवें प्रकाशु जाय.

अर्थ—म्हणून ( जेव्हां ) दिवा-पदराच्या वाऱ्यानें[१] जातो-( तेव्हां ) (त्या) बरोबरच प्रकाश नाहींसा[२] होतो[२] अथवा सूर्यबिंबाबरोबर प्रकाश जातो.

उचललेया प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं ॥
तैसा मनोबुद्धिपाशीं । अहंकारु ये ॥ १०१ ॥

अन्वय—उचललेया[१] प्राणासरिसीं जैसीं इंद्रियेंही निगती तैसा मनोबुद्धिपाशीं अहंकारु ये.

अर्थ—जावयास[१] निघालेल्या[१] प्राणाबरोबर ज्याप्रमाणें इंद्रियेंसुद्धां निघतात त्याप्रमाणें मनोबुद्धिबरोबर अहंकार जातो.

म्हणोनि माझिया स्वरूपीं । मनबुद्धि इयें निक्षेपीं ॥
येतुलेनि सर्वव्यापी । मीचि होसी ॥ १०२ ॥

**अन्वय**—म्हणोनि माझिया स्वरूपीं[1] इयें मनबुद्धि[2] निक्षेपीं येतुलेनि[3] सर्व-व्यापी मीचि होसी.

**अर्थ**—म्हणून माझ्या स्वरूपाच्या[1] ठिकाणीं[1] हा मन[2] (व) बुद्धि[2] ठेव, एवढ्यानें सर्वव्यापक (जो) मी (तोच तूं) होशील.

यया बोला कांहीं । अनारिसें नाहीं ॥
आपली आण पाहीं । वाहतु असें गा ॥ १०३ ॥

**अन्वय**—गा (अर्जुना) पाहीं,[1] यया बोला कांहीं अनारिसें नाहीं आपली आण वाहतु असें.

**अर्थ**—अरे (अर्जुना) विचार[1] कर[1] या बोलण्यांत कांहीं अन्यथा नाहीं. (या संबंधांत मी) स्वतःची शपथ वाहत आहे.

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥**

**अन्वय**—अथ, मयि[1] चित्तं स्थिरं समाधातुं न[2] शक्नोषि[2] ततः (हे) धनंजय अभ्यासयोगेन मां आप्तुं[3] इच्छ[4] ॥

**अर्थ**—आतां (म्ह० मी वर सांगितल्याप्रमाणें) माझ्या[1] ठिकाणीं[1] चित्त निश्चल ठेवण्यास तूं[2] समर्थ[2] नसशील[2] तर (हे) अर्जुना अभ्यासयोगानें (म्ह० पुनः पुनः प्रयत्न करून) मला प्राप्त[3] होण्याची[3] (तूं) इच्छा[4] कर.[4]

अथवा हें चित्त । मनबुद्धीसहीत ॥
माझ्या हातीं अचुंबित । न शकसी देवों ॥ १०४ ॥

**अन्वय**--अथवा मनबुद्धीसहीत हें चित्त माझ्या हातीं अचुंबित देवों शकसी न.

**अर्थ**—किंवा मनबुद्धीसह हें चित्त माझ्या ताब्यांत सर्वस्वीं देण्यास समर्थ नसलास (तर)—

तरि गा ऐसें करीं । ययां आठा पाहारां माझारीं ॥
मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥ १०५ ॥

**अन्वय**—गा ( अर्जुना ) तरि ऐसें करीं ययां आठां पाहारांमाझारीं मोटकें निमिषभरी देतु जाय.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) तर असें कर या आठ प्रहरांमध्यें ( चित्त माझ्या ठिकाणीं ) मोजकें क्षणभर देत जा.

मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख ॥
तेतुलें अरोचक । विषयीं घेईल ॥ १०६ ॥

**अन्वय**—मग जें जें निमिख माझें सुख देखेल तेतुलें विषयीं अरोचक घेईल.

**अर्थ**—मग जो जो क्षण माझें सुख पाहील तेवढ्या ( प्रमाणांत चित्ताला ) विषयांचा वीट येईल.

जैसें शरत्कालु रिगे । आणि सरिता वोहटूं लागे ॥
तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनी ॥ १०७ ॥

**अन्वय**—जैसें शरत्काळु रिगे[१] आणि सरिता वोहटु लागे तैसें चित्त प्रपंचौनी वेगें काढेल.

**अर्थ**—ज्या-प्रमाणें शरदृतूचा प्रादुर्भाव[१] झाला[१] म्हणजे नदी ( तात्काळ ) ओसरूं लागते त्याप्रमाणें चित्त प्रपंचांतून वेगानें निघेल.

मग पुनवेहूनि जैसें । शशिबिंब दिसेंदिसें ॥
हारपत अंवसे । नाहींचि होय ॥ १०८ ॥

**अन्वय**—मग जैसें शशिबिंब पुनवेहूनि दिसेंदिसें हारपत[१] अंवसे नाहींचि होय.

**अर्थ**—अथवा ज्याप्रमाणें चंद्रबिंब पौर्णिमेपासून दिवसेंदिवस-कमी कमी[१] होत-अमावास्येला ( पूर्णतः ) नाहिंसें होतें.

तैसें भोगाआंतूनि निगतां । चित्त मजमाजीं रिगतां ॥
हळू हळू पांडुसुता । मीचि होईल ॥ १०९ ॥

**अन्वय**—पांडुसुता तैसें चित्त भोगाआंतूनि निगतां[१] मजमाजीं रिगतां[२] हळू हळू मीचि[३] होईल.

**अर्थ**—अर्जुना, त्याप्रमाणें चित्त विषयांतून निघत[१] निघत [१] ( व ) माझ्या-मध्यें-प्रवेश करीत[१] करीत-( विषयांतून पूर्णतः नष्ट होईल आणि ) हळू हळू माझ्याशीं[२] ऐक्य[३] पावेल.

अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे ॥
येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥ ११० ॥

**अन्वय**--अगा ( जो ) अभ्यासयोगु म्हणिजे[१] तो हा एकु जाणिजे येणें कांहीं न निपजे[२] ऐसें नाहीं.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) ( जो ) अभ्यासमार्ग म्हटला[१] जातो[१] तो हाच एक समजावा; यानें कांहीं साधत[२] नाहीं असें नाहीं.

पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गति अंतराळें ॥
व्याघ्र सर्प प्रांजळे । केले एकीं ॥ १११ ॥

**अन्वय**—पैं अभ्यासाचेनि बळें एकां अंतराळें गति ( झाली ) एकीं व्याघ्र सर्प प्रांजळे केलें.

**अर्थ**—पहा, अभ्यासाच्या सामर्थ्यानें एकांना ( गोरखनाथा सारख्यांना ) आकाशांत गमनसामर्थ्य ( प्राप्त झालें ) कित्येकांनीं ( चांगदेवासारख्यांनीं ) वाघ साप नम्र केले.

विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे ॥
एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥ ११२ ॥

**अन्वय**—विष कीं आहारीं पडे, समुद्रीं पायवाट जोडे[१] एकीं अभ्यासें वाग्ब्रह्म थोकडें केलें.

**अर्थ**—विष सुद्धां पचनीं पडतें; समुद्रावरही पायवाट प्राप्त[१] होते;[१] कित्येकांनीं अभ्यासानें वेद अल्प ( म्ह० हस्तगत ) केले.

म्हणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं ॥
यालागीं माझ्या ठायीं । अभ्यासें मिळ ॥ ११३ ॥

**अन्वय**—म्हणोनि अभ्यासासि कांहीं[१] सर्वथा दुष्कर नाहीं. यालागीं माझ्या ठायीं अभ्यासें मिळ[२].

**अर्थ**--म्हणून अभ्यासाला कोणतीही[१] गोष्ट[१] मुळींच कठीण नाहीं. याकरितां माझ्या ठिकाणीं अभ्यासानें प्राप्त[२] हो[२].

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥**

**अन्वय**--अभ्यासे अपि असमर्थः आसि मत्कर्मपरम’: भव मदर्थं कर्माणि कुर्वन् अपि सिद्धिं अवाप्स्यसि ॥

**अर्थ**--( वर सांगितलेल्या ) अभ्यासाला सुद्धां ( तूं ) असमर्थ असशील ( तर )-सर्वस्वीं मजकरितां[२] कर्मे ( ज्ञान ध्यान भजनादि ) करणारा-हो; माझ्यास्तव कर्मे केल्यानें देखील ( तूं ) सिद्धि मिळविशील.

कां अभ्यासाही लागीं । कसु नाहीं तुझिया आंगीं ॥
तरी आहासी जया भंगीं । तैसाचि असें ॥ ११४ ॥

**अन्वय**—कां अभ्यासाही लागीं कसु तुझिया आंगीं नाहीं तरी जया भंगीं आहासी तैसाचि असें.

**अर्थ**—अथवा अभ्यासासाठीं सुद्धां ( लागणारें ) बळ तुझ्या अंगांत नसेल तर ज्या स्थितींत असशील त्याच ( स्थितींत ) रहा.

इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं ॥
अभिमानु न संडीं । स्वजातीचा ॥ ११५ ॥

**अन्वय**—इंद्रियें न कोंडी भोगातें न तोडीं स्वजातीचा[१] अभिमानु न संडीं.

**अर्थ**—इंद्रियें कोंडूं नकोस, विषयभोगांनां टाकूं नकोस ( आणि ) आपल्या[१] जातीचा[१] अभिमान सोडूं नकोस.

कुळधर्मु चाळीं । विधि निषेध पाळीं ।
मग सुखें तुज सरळी । दिधली आहे ॥ ११६ ॥

**अन्वय**—कुळधर्मु चाळीं, विधिनिषेध[१] पाळीं मग तुज सुखें सरळी दिधली आहे.

**अर्थ**—कुळाचार चालव-कर्माविषयीं शास्त्राची[१] आज्ञा व बंदी-पाळ नंतर ( असें तूं केल्यास ) ( मी ) तुला निःशंकपणें मोकळीक दिली आहे.

परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये ॥
तो मी करितु आहें । ऐसें न म्हणें ॥ ११७ ॥

**अन्वय**—परि मनें वाचा देहें जो व्यापारु जैसा होये तो (तैसा) मी करितु आहें ऐसें न म्हणें.

**अर्थ**—परंतु मनानें वाणीनें (व) देहानें जें कर्म जसें घडतें तें (तसें) "मी करीत आहे" असें म्हणूं नको.

करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे ॥
विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ ११८ ॥

**अन्वय**—करणें कां न करणें, हें आघवें, जेणें परमात्मेनि विश्व चळतसे तोचि जाणे.

**अर्थ**—(कर्म) करावें कां न करावें हें सर्व ज्या परमात्म्याकडून (म्ह० ज्याच्या सत्तेनें) (हें सर्व) जग चालतें तोच जाणतो.

उणयापुरेंयाचें कांहीं । उरों नेदीं आपुलिया ठायीं ॥
स्वजाती करूनि घेईं । जीवत्व आपुलें ॥ ११९ ॥

**अन्वय**—उणेयापुरेंयाचें[१] आपुलिया ठायीं कांहीं उरों नेदीं[२] आपुलें जीवत्व स्वजाती[३] करूनि घेईं.

**अर्थ**—(कर्म)-असांग होतें[१] कां सांग होतें-(याबद्दल) आपल्या ठिकाणीं कांहीं (खेद अथवा संतोष) उरूं देऊं[२] नकोस[२]. (तूं) आपुलें जीवित (आयुष्यक्रम) आपल्या[३] जातीशीं[३] योग्य[३] करून घे (म्ह० स्ववर्णाला योग्य अशीं कर्में कर).

माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांताचि गेलें ॥
तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥ १२० ॥

**अन्वय**—गा जेउतें (पाणी) माळियें नेलें[१] तेउतें निवांताचि गेलें, तया पाणिया[१] ऐसें[१] केलें होआवें.

**अर्थ**—अरे (अर्जुना) जिकडे (पाणी) माळ्याकडून नेलें[१] जातें[१] तिकडे शांतपणानें (तें) जातें त्या पाण्यासारखें[१] (अभिमानरहित आपलें) कर्म व्हावें.

एऱ्हवीं तरी सुभटा । उजू कां अव्हांटा ॥
रथु काई खटपटा । करितु असे ॥ १२१ ॥

**अन्वय**—सुभटा, एऱ्हवीं[१] तरी रथु उजू कां अव्हांटा खटपटा करितु असे काई.

**अर्थ**—अर्जुना,-इतर व्यवहारांत[१] पाहिलें-तरी रथ, ( हा ) सरळ ( मार्ग आहे ) किंवा आडमार्ग ( आहे, हें पाहण्याची ) खटपट ( कधीं ) करीत असतो काय ? ( तो रथ जिकडे सारथी नेईल तिकडे जातो ).

म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती । इयें वोझीं नेघें मती ॥
अखंड चित्तवृत्ती । आठवीं मातें ॥ १२२ ॥

**अन्वय**—म्हणोनि प्रवृत्ति[१] आणि निवृत्ति[२] इयें वोझीं मती नेघें[३] ( आणि ) मातें चित्तवृत्ती अखंड आठवीं.

**अर्थ**—म्हणून ( कर्म करण्यास ) प्रवृत्त[१] होणें[१] आणि ( कर्मापासून ) परावृत्त[२] होणें[२] हे ( दोन्ही ) भार मनानें घेऊं[३] नकोस[३] ( आणि ) मला मनानें निरंतर स्मर.

आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे ॥
निवांताचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥ १२३ ॥

**अन्वय**—आणि जें जें कर्म निपजे तें थोडें बहु न म्हणिजे[१] माझ्या ठायीं निवांताचि अर्पिजे[२].

**अर्थ**—आणि जें जें कर्म घडेल तें ( तें ) थोडें ( अथवा ) फार म्हणूं[१] नकोस (आणि तें तें कर्म ) माझ्या ठिकाणीं निमूटपणें अर्पण[२] कर[२].

ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना ॥
तूं सायुज्यसदना । माझिया येसी ॥ १२४ ॥

**अन्वय**—अर्जुना ऐसिया मद्भावना तनुत्यागीं[१] तूं माझिया सायुज्यसदना[२] येसी.

**अर्थ**—अर्जुना अशा मद्विषयकनिष्ठेनें- देह[१] टाकिला असतां-तूं माझ्या ऐक्यरूपीं[२] स्थानाला[२] ( म्ह० सायुज्यमोक्षाला ) येशील.

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥**

**अन्वय**—अथ एतत् अपि कर्तुं अशक्तः असि ततः मद्योगं[1] आश्रितः[2] यतात्मवान्[3] सर्वकर्मफलत्यागं[4] कुरु ॥

**अर्थ**—पण हें हि करण्यास (म्ह० मत्प्रीत्यर्थ कर्म करण्यास) (तूं) असमर्थ असशील तर माझ्या[1] योगाचा[1] आश्रय[2] करून[2] (म्ह० माझ्या ठिकाणीं चित्त ठेवून) नियतचित्त[3] होत्साता[3]-सर्व कर्मांच्या[4] फलांचा त्याग-कर.

ना तरी हेंही तुज । नेदवे कर्म मज ॥
तरी गा तूं भज । पांडुकुमरा ॥ १२५ ॥

**अन्वय**—गा पांडुकुमरा ना[1] तरी[1] हेंहि कर्म तुज मज नेदवे[1] तरी तूं (ऐसें) भज.[2]

**अर्थ**—अरे अर्जुना किंवा[1] हेंसुद्धां कर्म तुला मला देववत[1] नसेल[1] तर तूं (पुढें सांगितल्याप्रमाणें) आचरण[2] कर.[2]

बुद्धीचिये पाठीं पोटीं । कर्माआदि कां शेवटीं ॥
मातें बांधणें किरीटी । दुवाड जरी ॥ १२६ ॥

**अन्वय**—किरीटी, कर्माआदि[1] बुद्धीचिये पोटीं कां (कर्मा) शेवटीं (बुद्धीचिये) पाठीं मातें बांधणें जरी दुवाड.

**अर्थ**—अर्जुना कर्माच्या[1] आरंभीं[1] संकल्पाचे पूर्वी व (कर्माचे) अंतीं (संकल्पसिद्धी) नंतर मला स्मरणें (हें) जर (तुला) अवघड (ज्ञात असेल तर—).

तरि हेंही असो । सांडीं माझा आतिसो ॥
परि संयतिसीं वसो । बुद्धि तुझी ॥ १२७ ॥

**अन्वय**—तरि हेंहि असो[1] माझा आतिसो सांडीं[2] परि तुझी बुद्धि संयतिसीं[3] वसो.[4]

**अर्थ**—तर हेंसुद्धां ( म्ह० माझें स्मरण ठेवणें व कर्मफल मला अर्पण करणें ) असूं[१] दे,[१] माझा आग्रह सोडून[२] दे[२]. परंतु तुझी बुद्धि निग्रहाचे[३] ठिकाणीं[३] राहूं[४] दे[४] ( म्ह० तूं आपल्या बुद्धींत कर्तृत्त्वमद :व फलास्वाद घेऊं नकोस ).

आणि जेणें जेणें वेळे । घडतीं कर्म सकळें ॥
तयांचीं तियें फळें । त्यजितु जाय ॥ १२८ ॥

**अन्वय**—आणि जेणें जेणें वेळे ( जियें ) सकळें कर्में घडतीं ( तेणें तेणें वेळें ) तयांचीं तियें फळें त्यजितु जाय.

**अर्थ**—आणि ज्या ज्या वेळीं ( जीं जीं ) कांहीं कर्में घडतील ( त्या त्या वेळीं ) त्यांचीं तीं ( सर्व ) फळें टाकीत जा.

वृक्ष कां वेली । लोटती फळें आलीं ॥
तैसीं सांडीं निपजलीं । कर्में सिद्धें ॥ १२९ ॥

**अन्वय**—वृक्ष कां वेली आलीं फळें लोटती,[१] तैसीं सिद्धें निपजलीं कर्में सांडीं.[२]

**अर्थ**—( ज्याप्रमाणें ) झाडें अथवा वेली आलेलीं फळें टाकून[१] देतात[१] त्याप्रमाणें सफल ( म्ह० पूर्ण ) झालेलीं कर्में ( तूं ) टाकून[२] दे.[२]

परि मातें मनीं धरावें । कां मजउद्देशें करावें ॥
हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्यीं ॥ १३० ॥

**अन्वय**—परि मातें मनीं धरावें कां मजउद्देशें ( कर्म ) करावें हें कांहीं नको आघवें शून्यीं जाऊं दे.

**अर्थ**- परंतु मला मनांत स्मरावें अथवा मदर्थ ( कर्म ) करावें हें कांहींहि नको ( हें ) सर्व आकाशांत जाऊं दे. ( म्ह० निष्फल होऊं दे ).

खडकीं जैसें वर्षलें । कां आगीमाजीं पेरिलें ॥
कर्म मानीं देखिलें । स्वप्न जैसें ॥ १३१ ॥

**अन्वय**—जैसें खडकीं वर्षलें[१] कां आगीमाजीं पेरिलें ( कां ) जैसें स्वप्न देखिलें ( तैसें ) कर्म मानीं.

**अर्थ**—ज्याप्रमाणें खडकावर वृष्टी[१] झाली[१] अथवा अग्निमध्यें पेरलें (अथवा) ज्याप्रमाणें स्वप्न पाहिलें ( त्याप्रमाणें ) कर्म समज. ( म्ह० त्याप्रमाणें सर्व कर्म व्यर्थ समज ).

अगा आत्मजेच्या विषीं । जिवु जैसा निरभिलाषी ॥
तैसा कर्मी अशेषीं । निष्कामु होई ॥ १३२ ॥

**अन्वय**—अगा जैसा जिवु आत्मजेच्या विषीं निरभिलाषी तैसा अशेषीं कर्मी[१] निष्कामु होई.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) ज्याप्रमाणें ( बापाचा ) जीव ( म्ह० मन ) मुलीच्या संबंधानें कामनारहित ( असतो ) त्याप्रमाणें सर्व कर्मांच्या[१] ठिकाणीं[१] ( तूं ) निरिच्छ हो.

वन्हीची ज्वाळा जैशी । वायां जाय आकाशीं ॥
क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजीं ॥ १३३ ॥

**अन्वय**—जैशी वन्हीची ज्वाळा आकाशीं वायां जाय, तैसी क्रिया शून्यामाजीं जिरों[१] दे.

**अर्थ**—ज्याप्रमाणें अग्नीची ज्वाळा आकाशांत व्यर्थ जाते ( म्हणजे कांहींहि परिणाम न करतां नष्ट होते ) त्याप्रमाणें ( तुझें ) कर्म आकाशामध्यें नष्ट[१] होऊं[१] दे. ( म्ह. निष्फल होऊं दे. )

अर्जुना हा फलत्यागु । आवडे कीर असलगु ॥
परि योगामाजीं योगु । धुरेचा हा ॥ १३४ ॥

**अन्वय**—अर्जुना हा फलत्यागु असलगु कीर आवडे परि हा योगु योगामाजी धुरेचा.

**अर्थ**—अर्जुना हा फलत्याग सोपा खरोखर वाटतो, परंतु हा योग ( सर्व ) योगांमध्यें अग्रगण्य ( आहे. )

येणें फलत्यागें सांडे । तें तें कर्म न विरूढे ॥
एकचि वेळें वेळुझाडें । वांझें जैसीं ॥ १३५ ॥

**अन्वय**—येणें फलत्यागें ( जें जें ) कर्म सांडे[१] तें तें ( तैसें ) न विरूढे जैसीं वेळुझाडें[१] एकचि वेळें ( विऊनी ) वांझें ( होतीं )

**अर्थ**—या फलत्यागानें ( जें जें ) कर्म टाकलें[१] जातें[१] तें तें ( कर्म )( तसें ) निष्फळ होतें ( म्हणजे फलशून्य होतें ) जशीं वेळूचीं[१] झाडें[१] एकच वेळ ( व्याल्यानंतर कायमचीं ) फलशून्य ( होतात. )

तैसें येणेंचि शरीरें । शरीरा येणें सरे ।
किंबहुना येरझारे । चिरा पडे ॥ १३६ ॥

**अन्वय**—तैसें येणेंचि शरीरें शरीरा येणें सरे किंबहुना[१] येरझारे चिरा पडे.

**अर्थ**—त्याप्रमाणें याच शरीरानें शरीराला येणें संपतें-फार काय[१] सांगावें-जन्ममृत्यु ( कायमचे ) बंद पडतात.

पैं अभ्यासाचिया पाउटीं । ठाकिजे ज्ञान किरीटी ॥
ज्ञानें येइजे भेटी । ध्यानाचिये ॥ १३७ ॥

**अन्वय**—किरीटी अभ्यासाचिया पाउटीं ज्ञान ठाकिजे[१] ज्ञानें ध्यानाचिये भेटी येइजे.

**अर्थ**—अर्जुना अभ्यासाच्या पायरीनें ज्ञान प्राप्त[१] होतें[१] ( व ) ज्ञानानें ध्यानाची गांठ पडते ( म्ह. प्राप्ति होते )

मग ध्यानासि खेंव । देती आघवेचि भाव ॥
तेव्हां कर्मजात सर्व । दूरी ठाके ॥ १३८ ॥

**अन्वय**—मग ( जेव्हां ) आघवेचि भाव ध्यानासि खेंव देती तेव्हां सर्व कर्मजात[१] दूरी ठाके.

**अर्थ**—नंतर ( ज्यावेळीं ) सर्व मनोवृत्ति ध्यानाला आलिंगन देतात त्यावेळीं सगळया कर्मांचा[१] समुदाय[१] बाजूला राहतो ( म्ह. थांबतो. )

कर्म जेथ दुरावे । तेथ फलत्यागु संभवे ॥
त्यागास्तव आंगवे । शांति सगळी ॥ १३९ ॥

**अन्वय**—जेथ कर्म दुरावे तेथ फलत्यागु संभवे त्यागास्तव सगळी शांति आंगवे[१].

अर्थ—ज्याठिकाणीं कर्म थांबतें त्याठिकाणी फलत्याग संभवतो; फलत्यागामुळें संपूर्ण ब्रह्मस्थिति प्राप्त[१] होते.[१]

म्हणोनि यावया शांति । हाचि अनुक्रमु सुभद्रापती ॥
म्हणोनि अभ्यासुचि प्रस्तुतीं । करणें एथ ॥ १४० ॥

अन्वय—सुभद्रापती म्हणोनि शांति यावया[१] हाचि अनुक्रमु ( असे ) म्हणोनि एथ प्रस्तुतीं अभ्यासुचि करणें.

अर्थ—अर्जुना, म्हणून ब्रह्म प्राप्त[१] होण्याकरितां[१] हाच क्रम (आहे). एवढ्याकरितां याठिकाणीं सांप्रत अभ्यासच ( तूं ) करावा.

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ १२ ॥**

अन्वय—हि अभ्यासात् ज्ञानं श्रेयः; ज्ञानात् ध्यानं विशिष्यते[१], ध्यानात् कर्मफलत्यागः[२] ( विशिष्यते ) त्यागात् अनन्तरं[३] शान्तिः ॥

अर्थ—कारण अभ्यासापेक्षां ज्ञान ( परोक्षज्ञान ) श्रेष्ठ, ज्ञानापेक्षां ध्यान श्रेष्ठ[१] आहे[१] ध्यानाहूनहि-कर्माच्या फळांचा[२] त्याग-( श्रेष्ठ आहे ) त्यागापासून पुढें[३] लगेच[३] शांति ( म्ह. ब्रह्मसुखाचा अनुभव ) ( प्राप्त होते. )

अभ्यासाहूनि गहन । पार्था मग ज्ञान ॥
ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे ॥ १४१ ॥

अन्वय—पार्था, अभ्यासाहूनि ज्ञान गहन ( असें ), मग ज्ञानापासोनि ध्यान विशेषिजे[१].

अर्थ—अर्जुना, अभ्यासापेक्षां ज्ञान कठीण ( आहे. ) आणि ज्ञानापेक्षां ध्यान श्रेष्ठ[१] ठरतें.[१]

मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासोनि चांगु ॥
त्यागाहूनि भोगु । शांतिसुखाचा ॥ १४२ ॥

**अन्वय**—मग कर्मफलत्यागु तो ध्यानापासोनि चांगु ( असे ) त्यागाहूनि शांतिसुखाचा भोगु ( चांगु असे. )

**अर्थ**—मग कर्मफलत्याग तो ध्यानापेक्षां चांगला ( आहे ) कर्मफलत्यागापेक्षां ब्रह्मसुखाचा अनुभव ( श्रेष्ठ आहे ).

ऐसिया या वाटा । इहींचि पेणां सुभटा ॥
शांतिचा माजिवटा । ठाकिला जेणें ॥ १४३ ॥

**अन्वय**—सुभटा ऐसिया या वाटा इहींचि पेणां जेणें शांतिचा माजिवटा ठाकिला.

**अर्थ**—अर्जुना, अशा या मार्गानें, ( त्यांतील वर सांगितलेल्या ) ह्याच टप्प्यांनीं जो शांतीचा मध्य गांठतो.

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**

**अन्वय** – सर्वभूतानां[१] अद्वेष्टा मैत्रः[२] करुणः[४] एव[३] च[३], निर्ममः निरहंकारः समदुःखसुखः[५] क्षमी ॥

**अर्थ**—सर्व भूतांचे[१] ठिकाणीं–द्वेषभावरहित,–सर्वांशीं मित्रभावानें[२] वागणारा,–तसाच[३] कृपाळु[४] ममत्वरहित अहंकाररहित–सुखदुःखांला[५] सम मानणारा,–क्षमाशील—

जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेंचि कहीं ॥
आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ॥ १४४ ॥

**अन्वय**—जो सर्व भूतांच्या ठायीं द्वेषातें कहीं नेणेंचि[१] जैसा चैतन्या आपपरु[२] नाहीं ( तैसा जया नाहीं. )

**अर्थ**—जो सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं द्वेषाला कधींहि जाणत[१] नाहीं;[१] ज्याप्रमाणें चैतन्याला "–हा आपला[२] व हा दुसरा" असा भेद-नाहीं. ( त्याप्रमाणें ज्याला आपपरभाव नसतो. )

उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ॥
हें कांहींच नेणिजे । वसुधा जेवीं ॥ १४५ ॥

**अन्वय**—उत्तमातें धरिजे[१] अधमातें अव्हेरिजे[१] हें कांहींच जेवीं वसुधा नेणिजे[२] ( तेवीं जो नेणिजे )

**अर्थ**—चांगल्याचा आदर[१] करावा[१] ( व ) नीचाचा त्याग[२] करावा[२] हें मुळींच ज्याप्रमाणें पृथ्वी जाणत[१] नाहीं[२] ( त्याप्रमाणें जो जाणत नाहीं. )

कां रायाचे देह चाळूं । रंका परौतें गाळूं ॥
हें न म्हणेचि कृपाळु । प्राणु पैं गा ॥ १४६ ॥

**अन्वय**—गा ( अर्जुना ) कां रायाचे देह चाळूं ( आणि ) रंका परौतें गाळूं हें कृपाळू प्राणु न म्हणेचि.[१]

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) अथवा राजाचें शरीर वागवावें ( आणि ) गरिबाचें ( शरीर ) बाजूस टाकावें असें दयाळू प्राण म्हणतच[१] नाहीं.

गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं ॥
ऐसें नेणेंचि करूं । तोय जैसें ॥ १४७ ॥

**अन्वय**—गाईची तृषा हरूं[१] कां व्याघ्रा विष होऊनि मारूं ऐसें करूं तोय जैसें नेणेंचि.[१]

**अर्थ**—गाईची तहान नाहींशी[१] करावी[१] किंवा वाघाला विष होऊन मारावें असें करणें पाणी ज्याप्रमाणें जाणतच[१] नाहीं.[२]

तैसी आघवियांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री ॥
कृपेशीं धात्री । आपणचि जो ॥ १४८ ॥

**अन्वय**—तैसी आघवियांचि भूतमात्रीं[१] जया एकपणें मैत्री ( असे ) जो आपणाचि कृपेशीं धात्री ( असे ).

**अर्थ**—त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांचें[१] ठिकाणीं[१] ज्याचा सारखा स्नेह (असतो) जो स्वतःच कृपेची जन्मभूमि ( उत्पत्तिस्थान ) ( असतो ).

आणि मी तू हे भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे ॥
सुख दुःख जाणणें । नाहीं जया ॥ १४९ ॥

**अन्वय**—आणि मी तूं हे भाष नेणे[१] ( जो ) कांहींचि माझें न म्हणे[२] जया सुख दुःख जाणणें नाहीं.

**अर्थ**—आणि ( जो ) मी तूं ही भाषा जाणत[१] नाहीं;[१] ( जो ) कोणतीहि ( वस्तु ) "माझी" ( असें ) म्हणत[२] नाहीं. ज्याला सुखाची ( व ) दुःखाची जाणीव नसते.

तेवींची क्षमेलागीं । पृथ्वीसि पवाडु आंगीं ॥
संतोषा उत्संगीं । दिधलें घर ॥ १९० ॥

**अन्वय**—तेवींचि क्षमेलागीं ( जया ) आंगीं[१] पृथ्वीसि पवाडु ( असे ) संतोषा ( जेणें ) उत्संगीं घर दिधलें.

**अर्थ**—त्याचप्रमाणें सहनशीलतेसंबंधीं ( ज्याच्या ) स्वतःचें[१] ठिकाणीं[१] पृथ्वीचा थोरपणा ( म्ह० योग्यता ) ( असतो ) ( आणि ) संतोषाला ( जो आपल्या ) मांडीवर स्थान देतो.

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥**

**अन्वय**—सततं संतुष्टः योगी यतात्मा दृढनिश्चयः, मयि[१] अर्पितमनोबुद्धिः[१] यः मद्भक्त[२] सः मे प्रियः ॥

**अर्थ**—सदा संतुष्ट, योगी ( म्ह० जीवपरमात्मैक्य अनुभवी ), नियतचित्त, ( माझ्या ठिकाणीं ) दृढनिश्चयी, माझ्या[१] ठिकाणीं[१]-मन व बुद्धि[१] अर्पण केलेला-( असा ) जो माझा[२] भक्त[२] तो मला प्रिय ( आहे ).

वार्षियेवीण सागरु । जैसा जळें नित्य निर्भरु ॥
तैसा निरुपचारु । संतोषी जो ॥ १९१ ॥

**अन्वय**—जैसा वार्षियेवीण सागरु जळें नित्य निर्भरु[१] ( असे ) तैसा जो निरुपचारु[१] संतोषी ( असे ).

**अर्थ**—ज्याप्रमाणें पावसाळ्याविना समुद्र पाण्यानें नेहमीं पूर्ण[१] भरलेला[१] ( असतो ) त्याप्रमाणें जो ( परकृत ) सेवेच्या[१] अभावींहि[१] ( म्ह० निर्निमित्त ) आनंदी ( असतो ).

वाहूनि आपुली आण । धरी जो अंतःकरण ॥
निश्चया साचपण । जयाचेनि ॥ १९२ ॥

**अन्वय**—जो आपुली आण वाहूनि अंतःकरण धरी[१], जयाचेनि **निश्चया** साचपण ( असे ).

**अर्थ**—जो आपली शपथ घालून अंतःकरण ताब्यांत[१] ठेवतो[१] **( आणि )** ज्याच्यामुळें निश्चयाला **खरे**पणा ( असतो ).

जीवु परमात्मा दोन्ही । बैसले ऐक्यासनीं ॥
जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ॥ १९३ ॥

**अन्वय**—जयाचिया हृदयभुवनीं[१] जीवु परमात्मा दोन्ही ऐक्यासनीं[२] **बैसले** विराजती.[३]

**अर्थ**—ज्याच्या अंतःकरणरूपीं[१] घरांत[१] जीवात्मा ( व ) परमात्मा **( असे )** दोघे ऐक्यरूपी[२] आसनावर[२] बसलेले शोभत[३] आहेत.[३] ( म्ह. ज्याच्या **ठिकाणीं** जीवशिवाचें ऐक्य झालेलें आहे. )

ऐसा योगसमृद्धि । होऊनि जो निरवधि ॥
अर्पी मनोबुद्धि । माझ्या ठायीं ॥ १९४ ॥

**अन्वय**—योगसमृद्धि[१] ऐसा होऊनि जो मनोबुद्धि[२] माझ्या ठायीं **निरवधि** अर्पी[३].

**अर्थ**—ऐक्यरूपी[१] योगाच्या[१] उत्कटतेनें[१] अशाप्रकारचा होऊन **जो-मन**[२] व बुद्धि-माझ्या ठिकाणीं अखंड अर्पण[३] करतो.[३]

आंतु बाहेरि योगु । निर्वाळलेयाही चांगु ॥
तरि माझा अनुरागु । सप्रेम जया ॥ १९५ ॥

**अन्वय**—( जरि ) आंतु बाहेरि योगु चांगु[१] निर्वाळलेयाहि[१] **तरि** जय माझा सप्रेम अनुरागु ( असे )

**अर्थ**—( जरी ) आंत ( व ) बाहेर योग चांगल्या[१] प्रकारें[१]-शुद्ध **बाणला**[१] असला-तरी ज्याला माझी प्रेमपूर्वक निष्ठा ( असते. )

अर्जुना गा तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु ॥
तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये ॥ १९६ ॥

**अन्वय**—गा अर्जुना, तो भक्तु तोचि योगी तोचि मुक्तु तो वल्लभा मी कांतु ऐसा पढिये[१].

[१] **अर्थ**—अरे अर्जुना तो भक्त, तोच योगी ( व ) तोच मुक्त ( होय ) " तो पत्नी ( व ) मी पति " अशाप्रकारें ( तो मला ) आवडता[१] असतो,[१]

हें ना तो आवडे । मज जीवाचेनि पाडें ॥
हेंही एथ थोकडें । रूप करणें ॥ १९७ ॥

**अन्वय**—हें ना तो मज जीवाचेनि पाडें आवडे, हेंहि रूप करणें एथ थोकडें ( असे )

[१] **अर्थ**—एवढेंच नाहीं तो मला जीवाच्या बरोबरीनें आवडतो हेंसुद्धां वर्णन करणें याठिकाणीं कोतें ( पडतें ).

तरि पढियतेयाची कहाणी । हे भुलीची भारणी ॥
इये तंव न बोलणीं । परि बोलवी श्रद्धा ॥ १९८ ॥

**अन्वय**—तरि पढियंतेयाची कहाणी हे भुलीची[१] भारणीं ( असे ) इये तंव न[२] बोलणीं[२] परि श्रद्धा बोलवी[३].

**अर्थ**—तथापि लाडक्याची कथा ही भुरळ[१] पाडणारी[१] मोहनी ( आहे ) ह्या तर-बोलण्यासारख्या[२] गोष्टी नाहींत-परंतु ( तुझें ) प्रेम ( मला या गोष्टी ) बोलावयास[३] लावतें[३].

म्हणोनि गा आम्हां । वेगा आली उपमा ॥
एऱ्हवीं काय प्रेमा । अनुवादु असे ॥ १९९ ॥

**अन्वय**—गा ( अर्जुना ) म्हणोनि आम्हां उपमा वेगा आली एऱ्हवीं प्रेमा काय अनुवादु असे.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) म्हणून आम्हांला ( हा ) दृष्टान्त चटकन सुचला; नाहींतर ( या ) प्रेमाला काय उपमा असते ?

आतां असो हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी ॥
दुणा थांव उठी । आवडी गा ॥ १६० ॥

**अन्वय**—गा किरीटी आतां हें असो[1] प्रियाचिया गोष्टी आवडी दुणा थांव उठी.

**अर्थ**—अरे अर्जुना, आतां हें असूं[1] दे[1]; प्रियकराच्या गोष्टीनें प्रेमाला दुप्पट बळ चढतें.

तयाही वरी विपायें । प्रेमळु संवादिया होये ॥
तिये गोडीसी आहे । कांटाळें मग ॥ १६१ ॥

**अन्वय**—तयाही वरी विपायें प्रेमळु संवादिया[1] होये मग तिये गोडीसी कांटाळें आहे.

**अर्थ**—त्यांतही अधिक, कदाचित् प्रेमळ चर्चा[1] करणारा[1] ( एखादा ) मिळाला म्हणजे त्या गोडीला माप आहे ( काय ) ?

म्हणोनि गा पांडुसुता । तूंचि प्रियु आणि तूंचि श्रोता ॥
वरि प्रियाची वार्ता । प्रसंगें आली ॥ १६२ ॥

**अन्वय**—गा पांडुसुता म्हणोनि तूंचि प्रियु आणि तूंचि श्रोता वरि प्रसंगें प्रियाची वार्ता आली.

**अर्थ**—अरे अर्जुना, म्हणून तूंच आवडता आणि तूंच श्रोता, आणखी (या) प्रसंगानें प्रेमळाचीच गोष्ट ( बोलण्याचा विषय झाली ) आहे.

तरि आतां बोलों । भलेंया सुखा मीनलों ॥
ऐसें म्हणतखेंवीं डोलों । लागले देवो ॥ १६३ ॥

**अन्वय**—तरि आतां बोलों, भलेंया सुखा मीनलों,[1] ऐसें म्हणतखेंवीं देवो डोलों लागले.

**अर्थ**—तर आतां ( आम्हीं ) बोलतों; “ मोठ्या सुखाला ( आम्ही ) प्राप्त झालों[1] ” असें म्हणतां-क्षणींच देव डोलूं लागले.

मग म्हणे जाण । तया भक्ताचें लक्षण ॥
जया मी अंतःकरण । बैसों घालीं ॥ १६४ ॥

**अन्वय**—मग म्हणे जया मी (आपुलें) अंतःकरण बैसों घालीं तया भक्ताचें लक्षण जाण.[१]

**अर्थ**—मग म्हणाले "ज्याला मी (आपलें) हृदय बैसावयास घालतों त्या भक्ताचें चिन्ह समजून[१] घे.'

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

**अन्वय**—यस्मात् लोकः न[१] उद्विजते[१] च यः लोकात् न[२] उद्विजते[२] च-यः हर्ष-अमर्ष-भय-उद्वेगैः मुक्तः सः मे प्रियः ॥

**अर्थ**—ज्याच्यापासून लोक उद्विग्न[१] होत[१] नाहींत[१] आणि जो लोकांपासून उद्वेग[२] पावत[२] नाहीं[२] आणि जो हर्ष-क्रोध-भय-खेद (यांपासून) मुक्त (असतो) तो मला प्रिय (होय).

तरि सिंधूचेनि माजें । जळचरां भय नुपजे ॥
आणि जळचरीं नुबुजे । समुद्र जैसा ॥ १६५ ॥

**अन्वय**—तरि जैसा सिंधूचेनि माजें जळचरां[१] भय नुपजे[१] आणि जळचरीं समुद्र नुबुजे.[२]

**अर्थ**—तरि ज्याप्रमाणें समुद्राच्या भरतीनें पाण्यांतील[१] प्राण्यांना[१] भय उत्पन्न[१] होत[१] नाहीं[१] आणि जळचरांमुळें समुद्र घाबरत[२] नाहीं.[२]

तेविं उन्मत्तें जगें । जयासि खंती न लगे ॥
आणि जयाचेनि आंगें । न शिणे लोकु ॥ १६६ ॥

**अन्वय**—तेविं जयासि उन्मत्तें जगें खंती न लगे आणि जयाचेनि[१] आंगें[१] लोकु न[२] शिणे.[२]

**अर्थ**—त्याप्रमाणें ज्याला मस्त जगामुळें खेद होत नाहीं आणि ज्याच्यामुळें[१] लोकांना-त्रास होत[१] नाहीं—

किंबहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां ॥
तैसा नुबगे जीवां । जीवपणें जो ॥ १६७ ॥

**अन्वय—**पांडवा, किंबहुना[१] जैसे शरीर अवयवां नुबगे[१] तैसा जो जीवपणें जीवां ( नुबगे[२] ).

**अर्थ—**अर्जुना,-फार काय[१] सांगावें,-ज्याप्रमाणें शरीर ( आपल्या ) अवयवांना कंटाळत[२] नाहीं[२] त्याप्रमाणें जो जीवपणानें ( म्ह० आपणच सर्वांचा प्राण असल्यामुळें ) प्राण्यांना ( कंटाळत[२] नाहीं[२] ).

जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें ॥
हर्षामर्ष ठेले । दुजेनविण ॥ १६८ ॥

**अन्वय—**जगचि देह जाहलें म्हणोनि प्रियाप्रिय[१] गेलें ( आणि ) दुजेनविण हर्षामर्ष[२] ठेले.

**अर्थ—**( ज्याचा ) जगच देह झालें म्हणून आवडतें[१] ( व ) नावडतें[१] गेलें ( आणि ) दुसऱ्यावांचून ( म्ह० द्वैताभावामुळें ) आनंद[२] ( व ) क्रोध[२] ( हेहि ) ( ज्याच्या ठिकाणीं ) लोपले. ( म्ह० नष्ट झाले ).

ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु । भयोद्वेगरहितु ॥
याही वरि भक्तु । माझ्या ठायीं ॥ १६९ ॥

**अन्वय—**ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु[१] भयोद्वेगरहितु[२] याहि वरि माझ्या ठायीं भक्तु[३] ( असे ).

**अर्थ—**असा ( सुखदुःखादि ) द्वंद्वांपलीकडे[१] असलेला[१] ( व )-भय आणि खिन्नता[२] यानें मुक्त-( आणि ) यांच्या भरतीला माझ्या ठिकाणीं ( जो ) भक्ति[३] करणारा[३] ( असतो ).

तरि तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो ॥
हें असो जीवें जीवो । माझेनि तो ॥ १७० ॥

**अन्वय—**गा तरि मज तयाचा मोहो ( असे ) तो पढियावो काय सांगों, हें असो,[१] तो माझेनि जीवें जीवो.

**अर्थ** अरे ( अर्जुना ) म्हणून मला त्याची माया ( असते ), ती आवड काय सांगूं ? हें राहूं[१] दे,[१] तो माझ्या प्राणानेंच जीवंत ( असतो ) ( म्ह० मी आहें म्हणून तो जगतो ).

जो निजानंदें धाला । परिणामु आयुष्या आला ॥
पूर्णते जाहला । वल्लभु जो ॥ १७१ ॥

**अन्वय—**जो निजानंदें धाला,[१] परिणामु आयुष्या आला, (जो) पूर्णते वल्लभु जाहला.

**अर्थ—**जो आत्मानंदानें तृप्त[१] झाला,[२] ब्रह्मच (ज्याच्या रूपानें) जन्मास आलें (आहे) जो पूर्णावस्थेचा प्रियपति झाला.

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥**

**अन्वय—**अनपेक्षः, शुचिः, दक्षः,[१] उदासीनः, गतव्यथः, सर्वारंभपरित्यागी[२] यः मद्भक्तः[३] सः मे प्रियः ॥

**अर्थ—**निरपेक्ष, शुचिर्भूत (अंतर्बाह्य), तत्त्वार्थांचा[१] देखणा,[१] उदासीन (रागद्वेषरहित), (संसार) दुःखविरहित,–सर्व आरंभांचा[२] त्यागी–(म्ह० सर्व कर्माला कारण जो अहंकार तद्विरहित)–(असा) जो माझा[३] भक्त[३] तो मला प्रिय (होय).

जयाचिया ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिगावा ॥
सुखासि चढावा । जयाचें असणें ॥ १७२ ॥

**अन्वय—**पांडवा जयाचिया ठायीं अपेक्षे रिगावा नाहीं, जयाचें असणें सुखासि चढावा (असे).

**अर्थ—**अर्जुना, ज्याच्या ठिकाणीं इच्छेचा प्रवेश नसतो, ज्याचें अस्तित्व (म्हणजे) सुखाची वाढ (होय).

मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर ॥
परि वेंचणें लागे शरीर । तिये गांवीं ॥ १७३ ॥

**अन्वय—**काशी मोक्ष देऊनि[१] उदार होय कीर परि तिये गांवीं शरीर वेंचणे लागे.

**अर्थ**—काशी मोक्ष देण्यां[१] इतकी[१] उदार असते खरी, परंतु त्या गांवांत (म्ह० काशींत) शरीर वेचावें लागतें (म्ह० मरावें लागतें).

हिमवंतु दोष खाये । परि जीविताची हानि होये ॥
तैसें शुचित्व नोहे । सज्जनाचें ॥ १७४ ॥

**अन्वय**—हिमवंतु दोष खाये[१] परि जीविताची हानि होये, तैसें, सज्जनाचें शुचित्व नोहे.

**अर्थ**—हिमालय पाप नाहींसें[१] करतो[१] परंतु (त्यांत) प्राणाचाहि नाश होतो, त्याप्रकारचा साधूंचा पवित्रपणा नसतो.

शुचित्वें शुचि गांग होये । आणि पाप तापही जाये ॥
परि तेथें आहे । बुडणें एक ॥ १७५ ॥

**अन्वय**—गांग[१] शुचित्वें शुचि होये, आणि (तया) पाप तापही जाये[२] परि तेथें[३] बुडणें[४] एक आहे.

**अर्थ**—गंगेचें[१] पाणी[१] (आंगच्या) पवित्रपणामुळें पवित्र असतें आणि (म्हणून) (त्याचे योगानें) पाप (व त्रिविध) तापसुद्धां नाहींसे[२] होतात;[२] परंतु त्या[३] ठिकाणीं[३] देह[४] टाकणें[४] (ही) एक (गोष्ट आवश्यक) असते.

खोलिये पारु नेणिजे । तरी भक्तीं न बुडिजे ॥
रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्षु ॥ १७६ ॥

**अन्वय**—भक्तीं[१] खोलिये पारु नेणिजे[२] तरी न बुडिजे न मरतां मोक्षु रोकडाचि लाहिजे.[३]

**अर्थ**—भक्ताच्या[१] ठिकाणीं[१] खोलीचा अंत समजत[२] नाहीं,[२] तरी (त्याचा उपासक) बुडत नाहीं (आणि त्याला) न मरतां मोक्ष प्रत्यक्ष प्राप्त[३] होतो.[३]

संताचेनि अंगलगें । पापातें जिणणें गंगें ॥
तेणें संतसंगें । शुचित्व कैसें ॥ १७७ ॥

**अन्वय**—संताचेनि अंगलगें गंगें पापातें जिणणें[१] तेणें संतसंगें शुचित्व कैसें.[२]

**अर्थ**—संताच्या अंगस्पर्शानें गंगेकडून पापांना जिंकलें[१] जातें[१] त्या संत-संगतीनें ( येणारें ) पावित्र्य कशा[२] ( उच्च ) प्रतीचें[२] ( असेल ) ?

म्हणोनि असो जो ऐसा । शुचित्वें तीर्थां कुवासा ॥
जेणें उल्लंघविले दिशा । मनोमळ ॥ १७८ ॥

**अन्वय**—म्हणोनि असो[१] जो ऐसा शुचित्वें तीर्थां कुवासा ( असे ) जेणें मनोमळ[२] दिशा उल्लंघविले.[३]

**अर्थ**—म्हणून राहूं[१] दे[१] जो अशाप्रकारचा, पावित्र्यानें तीर्थांना आश्रय ( असतो ) ( आणि ) ज्यानें मनांतील[२] पातकांना[२] दिशांच्या-पलीकडे[३] पळवून लाविलें असतें-

आंतु बाहेरि चोखाळु । सूर्य जैसा निर्मळु ॥
आणि तत्त्वार्थांचा पायाळु । देखणा जो ॥ १७९ ॥

**अन्वय**—जैसा सूर्य आंतु बाहेरि निर्मळु ( तैसा जो आंतु बाहेरि ) चोखाळू ( असे ) आणि जो तत्वार्थांचा[१] पायाळु देखणा ( असे )

**अर्थ**—जसा सूर्य आंत बाहेर शुद्ध ( असतो ) ( त्याप्रमाणें जो मनानें ( व ) शरीरानें ) शुद्ध ( असतो ) आणि जो ब्रह्मरूपी[१] ( भूमिगत ) धनाचा[१] पायाळु ( मनुष्याप्रमाणें ) पाहणारा ( असतो ).

व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश ॥
तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥ १८० ॥

**अन्वय**—गा ( अर्जुना ) आकाश जैसें व्यापक आणि उदास तैसें जयाचें मानस सर्वत्र ( व्यापक आणि उदास असे. )

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) आकाश ज्याप्रमाणें ( सर्वत्र ) व्यापक असूनहि अलिप्त ( असतें ) त्याप्रमाणें ज्याचें मन सर्वत्र ( आत्मभाव बाळगूनहि निरपेक्ष असतें.)

संसारव्यथे फिटला । जो नैराश्यें विनटला ॥
व्याधाहातोनि सुटला । विहंगु जैसा ॥ १८१ ॥

**अन्वय**—जो नैराश्यें विनटला[1] ( म्हणून ) संसारव्यथें फिटला[2] जैसा व्याधाहातोनि[3] सुटला विहंगु--

**अर्थ**—जो निरिच्छतेनें सिद्ध[1] झाला[1] ( म्हणून ) संसारक्लेशांतून मुक्त[2] झाला;[2] ज्याप्रमाणें पारध्याच्या[3] हातून[3] सुटलेला पक्षी-( आनंदी होतो तसा तो झाला. )

तैसा सतत जो सुखे । कोणीही टवंच न देखे ॥
नेणिजे गतायुषें । लज्जा जेवीं ॥ १८२ ॥

**अन्वय**—तैसा सतत जो सुखे[1]; जेवीं गतायुषें[2] लज्जा नेणिजे[3] ( तेवीं जो ) कोणीहि टवंच[4] न देखे.

**अर्थ**—त्याप्रमाणें नेहमी जो सुखी[1] असतो;[1] ज्याप्रमाणें मेलेला[2] मनुष्य[2] लाज जाणत[3] नाहीं[3] (त्याप्रमाणें जो ) कसलेही मानसिक[4] दुःख[4] जाणत नाहीं.

आणि कर्मारंभालागीं । जया अहंकृती नाहीं आंगीं ॥
जैसा निरिंधन आगी । विझोनि जाय ॥ १८३ ॥

**अन्वय**—आणि जया आंगीं कर्मारंभालागीं[1] अहंकृती नाहीं जैसा निरिंधन आगी विझोनि जाय.

**अर्थ**—आणि जयाच्या ठिकाणीं कर्म[1] करण्याविषयीं[1] अहंकार नसतो; ज्याप्रमाणें काष्ठरहित अग्नि विझून जातो—

तैसा उपशमुचि भागा । जयासि आला पैं गा ॥
जो मोक्षाचिया आंगा । लिहिला असे ॥ १८४ ॥

**अन्वय**—गा ( अर्जुना ) तैसा उपशमुचि[1] जयासि भागा आला;[2] जो ( उपशमु ) मोक्षाचिया आंगा लिहिला असे.

**अर्थ**—अरे ( अर्जुना ) त्याप्रमाणें मनाची[1] शांतीच[1] ज्याच्या वांट्याला आलेली[2] असते;[2] जी ( शांति ) मोक्षाच्यां खात्याला लिहिलेली असते. ( म्ह. जिनें मोक्ष निश्चित मिळतो. )

अर्जुना हा ठावोवरी । सोहंभावो सरोभरी ॥
द्वैताच्या पैलतीरीं । निगों सरला ॥ १८५ ॥

**अन्वय**—अर्जुना हा ठावोवरी सोहंभावो सरोभरी[1] द्वैताच्या पैलतीरीं[2] निघों सरला.[3]

**अर्थ**—अर्जुना या प्रमाणांत ( म्ह. इतका ) सोहंभाव ( अंगांत ) पूर्ण[1] भरल्यामुळें[1] ( तो ) द्वैताच्या पैल[2] कांठाला[2] जाण्यास समर्थ[3] होतो.[3]

कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोही भागीं ॥
वांटूनिया आंगीं । सेवकै बाणी ॥ १८६ ॥

**अन्वय**—कीं भक्तिसुखालागीं आपणपेंचि दोहीं भागीं वांटूनिया आंगीं[1] सेवकै बाणी ॥

**अर्थ**—तथापि भक्तिसुखाकरितां आपणालाच दोन ( देव व भक्त अशा ) भागांत वांटून आपल्या[1] ( भागाचे ) ठिकाणीं[1] सेवकपणा घेतो.

येरा नाम मी ठेवी । मग भजती वोज बरवी ॥
न भजतया दावी । योगिया जो ॥ १८७ ॥

**अन्वय**—येरा ( भागा ) मी नाम ठेवी, ( आणि ) मग जो न[1] भजतया[1] योगिया बरवी भजती वोज दावी.

**अर्थ**—दुसऱ्या ( भागाला ) मी ( कृष्ण असें ) नांव ठेवतो ( आणि ) नंतर जो भक्ति[1] न[1] करणाऱ्या[1] योग्यांना चांगली भजनाची रीत दाखवितो.

तयाचें आम्हां व्यसन । आमुचें तो निजध्यान ॥
किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ १८८ ॥

**अन्वय**—आम्हां तयाचें व्यसन, तो आमुचें निजध्यान,[1] किंबहुना[2] ( जैं ) तो मिळे तैं समाधान ( असे. )

**अर्थ**—आम्हांला त्याचा छंद ( असतो ) तो आमच्या-नित्य ध्यानाचा[1] विषय असतो-फार काय[2] सांगावें-जेव्हां तो भेटतो तेव्हांच ( आमच्या मनाला ) समाधान ( होतें. )

तयालागीं मज रूपा येणें । तयाचेनि मज एथें असणें ॥
तया लोण कीजे जीवें प्राणें । ऐसा पढिये ॥ १८९ ॥

**अन्वय—**मज तयालागीं रूपा[१] येणें,[१] तयाचेनि मज एथें[२] असणे[३] तया जीवें प्राणें लोण कीजे ऐसा पढिये.[४]

**अर्थ—**मी त्याच्याकरितां (सगुण) रूप[१] धारण[१] करतों,[१] त्याच्यामुळें मला या[२] ठिकाणीं[२] (म्ह. पृथ्वीवर) राहावें[३] लागतें;[३] त्याच्यावरून, जीव (आणि) प्राण (हे) उतरून टाकावे इतका (तो मला) प्रिय[४] असतो.[४]

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

**अन्वय—**यः न[१] हृष्यति,[१] न[२] द्वेष्टि,[२] न[३] शोचति,[३] न[४] कांक्षति,[४] शुभाशुभपरित्यागी[५] यः भक्तिमान्[५] सः मे प्रियः ॥

**अर्थ—**जो हर्ष[१] पावत[१] नाहीं[१], द्वेष[२] करीत[२] नाहीं,[२]–शोक करीत नाहीं,[३]–(कशाचीहि) इच्छा[४] करीत[४] नाहीं[४]–चांगलें व वाईट या[५] दोन्हीं विरहित–(असा) जो भक्तियुक्त[५] पुरुष[५] तो मला प्रिय (होय).

जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींचि न देखे ॥
म्हणोनि भोगविशेखें । हरिखेजेना ॥ १९० ॥

**अन्वय—**जो आत्मलाभासारिखें[१] कांहींचि गोमटें न देखे म्हणोनि भोगविशेखें[२] हरिखेजेना.[३]

**अर्थ—**जो ब्रह्मप्राप्तीच्या[१] तोडीचें[१] कांहींच चांगलें मानीत नाहीं म्हणून (जो) भोगांच्या[२] आधिक्यानें[२] (म्ह. उत्तम विषय सुखांनीं)–हुरळून[३] जात नाहीं.—

आपणचि विश्व जाहला । तरि भेदभावो सहजचि गेला ॥
म्हणोनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ॥ १९१ ॥

**अन्वय—**आपणचि विश्व जाहला तरि भेदभावो सहजचि गेला[१] म्हणोनि जया पुरुषा द्वेषु ठेला.[२]

**अर्थ—**स्वतःच जगत् बनतो म्हणून भेदभाव (म्ह. द्वैत) सहजच नाहींसा[१] होतो.[१] म्हणून ज्या पुरुषाचा द्वेष (पूर्णपणें) नष्ट[२] होतो.[२]

पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींही न वचे ॥
हें जाणोनि गताचें न। शोची जो ॥ १९२ ॥

**अन्वय**—जें साचें आपुलें (असें) तें कल्पांतींही[1] न[2] वचे[2] हें जाणोनि जो गताचें न[3] शोची.[3]

**अर्थ**—जें खरेंच आपलें (असतें) तें कल्पाच्या[1] शेवटीं[1] सुद्धां[1] नष्ट[2] होत[2] नाहीं[2] असें जाणून जो गेलेल्याचा शोक[3] करीत[3] नाहीं.[3]

आणि जयापरौतें कांहीं नाहीं । तें आपणपेंचि आपुल्या ठायीं ॥
जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना ॥ १९३ ॥

**अन्वय**—आणि जयापरौतें[1] कांहीं नाहीं तें आपणपेंचि आपुल्या ठायीं जाहला यालागीं जो कांहीं आकांक्षी ना.

**अर्थ**—आणि ज्याच्या[1] पलीकडे[1] (श्रेष्ठ) कांहीं नाहीं तें ब्रह्म स्वतःच्याच ठिकाणीं (जो) होतो (व) म्हणून जो कांहींच इच्छित नाहीं.

वोखटें कां गोमटें । हें कांहींचि तया नुमटे ॥
रात्रिदिवस न घटे । सूर्यासि जेवीं ॥ १९४ ॥

**अन्वय**—जेवीं सूर्यासि रात्रिदिवस[1] न घटे (तेवीं) वोखटें कां गोमटें हें कांहींचि तया नुमटे.[2]

**अर्थ**—ज्याप्रमाणें सूर्याजवळ रात्र[1] (आणि) दिवस[1] (हा) भेद नसतो (त्याप्रमाणें) वाईट अथवा चांगलें हें कांहींहि (भिन्न प्रकारानें) त्याच्या (मनांत) भरत[2] नाहीं.[2]

ऐसा बोधुचि केवळु । जो होऊनि असे निष्कळु ॥
त्याहीवरी भजनशीळु । माझ्या ठायीं ॥ १९५ ॥

**अन्वय**—ऐसा जो केवळु बोधुचि होऊनि निष्कळु असे (व) त्याहीवरी[1] माझ्या ठायीं भजनशीळु (असे).

**अर्थ**—असा जो केवळ ज्ञानरूपच होऊन पूर्ण असतो (व) त्यांत[1] आणखी[1] माझ्या ठिकाणीं भजनशील (असतो) (म्ह० नित्य माझें भजन करतो).

तरि तया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें सोयरें ॥
नाहीं गा साचोकारें । तुझी आण ॥ १९६ ॥

**अन्वय**—गा (अर्जुना) तरि साचोकारें आम्हां तया ऐसें पढियंतें दुसरें सोयरें नाहीं तुझी आण (वाहतसें).

**अर्थ**—अरे अर्जुना तरी खरोखर आम्हांला त्याच्या इतका आवडता दुसरा नातलग नाहीं तुझीच शपथ (वाहतों).

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥**

**अन्वय**—शत्रौ[१] मित्रे[२] च मानापमानयोः[२] समः[३] तथा शीतोष्णसुखदुःखेषु[४] समः[५] च संगविवर्जितः ॥

**अर्थ**—शत्रु[१] मित्रांच्या[२] ठिकाणीं[२] आणि-मान[२] (व) अपमान यांचे ठिकाणीं-समान[३] असणारा[३] त्याचप्रमाणें-शीत, उष्ण, (व) सुखदुःखादि[४] (द्वंद्वांत)-सारखी[५] वृत्ति ठेवणारा-व (अंतर्बाह्य) संगविरहित—

पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं ॥
रिपुमित्रां दोहीं । सारिखा पाडु ॥ १९७ ॥

**अन्वय**—पार्था जयाचिया ठायीं वैषम्याची वार्ता नाहीं (आणि) रिपुमित्रां[१] दोहीं पाडु सरिसा (असे).

**अर्थ**—अर्जुना ज्याच्या ठिकाणी विषमतेची गोष्ट नसते (आणि ज्याच्या ठिकाणीं) शत्रु[१] (आणि) मित्र[१] (या) दोघांची किंमत सारखीच (असते).

कां घरिचियां उजियेडु करावा । पारखियां आंधारु पाडावा ॥
हें नेणेचि गा पांडवा । दीपु जैसा ॥ १९८ ॥

**अन्वय**—गा पांडवा जैसा दीपु घरिचियां[१] उजियेडु करावा कां पारखियां आंधारु पाडावा हें नेणेचि.[२]

**अर्थ**—अरे अर्जुना, ज्याप्रमाणें दिवा घरच्या[१] लोकांना[१] प्रकाश करावा अथवा परकीयांना अंधार करावा हें जाणत[२] नाहीं.[२]

जो खांडावया घावो घाली । कां लावणी जयानें केली ॥
दोघां एकचि साउली । वृक्षु दे जैसा ॥ १९९ ॥

**अन्वय**—जैसा वृक्षु जो खांडावया घावो घाली कां लावणी जयानें केली[१] ( अशा ) दोघां एकचि साउली दे.

**अर्थ**—ज्याप्रमाणें झाड, जो तोडण्याकरितां प्रहार करितो अथवा ( त्याची ) लागवड ज्यानें केलेली[१] असते[१] ( अशा ) दोघांना सारखीच साउली देतें.

नातरी इक्षुदंडु । पाळितया गोडु ॥
गाळीतया कडु । नोहेचि जेवीं ॥ २०० ॥

**अन्वय**—नातरी जेवीं इक्षुदंडु पाळितया गोडु ( आणि ) गाळीतया[१] कडु नोहेचि.[२]

**अर्थ**—अथवा ज्याप्रमाणें ऊंस वाढविणाऱ्यास गोड ( व ) पिळून[१] काढणा[१]-ऱ्यांस कडु होत[२] नाहीं.[२]

अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भावो ऐसा ॥
मानापमानीं सरिसा । होतु जाय ॥ २०१ ॥

**अन्वय**—अर्जुना तैसा अरिमित्रीं[१] जया ऐसा भावो ( असे ) ( आणि ) मानापमानीं[१] ( जो ) सरिसा होतु जाय ॥

**अर्थ**—अर्जुना तसाच शत्रुमित्रांच्या[१] ठिकाणीं[१] ज्याची अशी भावना ( असते ) ( आणि ) मान[२] ( व ) अपमानांचे[२] ठिकाणीं[२] ( ज्याच्या मनाची प्रवृत्ति ) सारखीच होत जाते म्ह. असते.

तिहीं ऋतूं समान । जैसें कां गगन ॥
तैसें एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ २०२ ॥

**अन्वय**—जैसें गगन तिहीं ऋतूं समान ( असे ) तैसें जया शीतोष्णीं[१] एकचि मान ( असे )

**अर्थ**—ज्याप्रमाणें आकाश तिन्हीं ऋतूंमध्यें सारखें ( असतें ) त्याप्रमाणें जो-थंड व उष्ण[१] यांच्यासंबंधानें-सारखाच वागतो. ( म्ह. त्याच्या ठिकाणीं यांची किंमत सारखीच असते. )

दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता ॥
तैसा सुखदुःखां प्राप्तां । मध्यस्थु जो ॥ २०३ ॥

**अन्वय**—पांडुसुता जैसा मेरु दक्षिण उत्तर मारुता ( मध्यस्थु असे ) तैसा जो प्राप्तां[१] सुखदुःखां मध्यस्थु (असे.)

**अर्थ**—अर्जुना, ज्याप्रमाणें मेरु ( पर्वत ) दक्षिण--उत्तर वाऱ्याविषयीं (उदासीन असतो ) त्याप्रमाणें जो प्राप्त[१] झालेल्या[१] सुखदुःखांविषयीं उदासीन (असतो.)

माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका ॥
तैसा जो सकळिका । भूतां समु ॥ २०४ ॥

**अन्वय**—( जैसी ) चंद्रिका माधुर्यें राया रंका सरिसी ( असे ) तैसा जो सकळिकां भूतां समु ( असे .)

**अर्थ**—( ज्याप्रमाणें ) चांदणें आल्हादकत्वानें राजाला ( व ) भिकाऱ्याला सारखेंच ( असतें ) त्याप्रमाणें जो सगळ्या प्राण्यांना सारखाच ( आल्हादकारक असतो. )

आघविया जगा एक । सेव्य जैसें उदक ॥
तैसें तयातें तिन्ही लोक । आकांक्षिती ॥ २०५ ॥

**अन्वय**—जैसें उदक आघविया जगा एक सेव्य[१] ( असे ) तैसें तयातें तिन्ही लोक आकांक्षिती.[२]

**अर्थ**—ज्याप्रमाणें पाणी ( हें ) सर्व जगाचा सर्वसाधारण-सेवन करण्याचा[१] विषय-( असतें ) त्याप्रमाणें त्याची तिन्ही ( म्ह. स्वर्ग, मृत्यु, पाताळांतलि ) लोक इच्छा[२] करितात.[२]

जो सबाह्यसंगु । सांडोनियां लागु ॥
एकाकी असे आंगु । आंगीं सूनी ॥ २०६ ॥

**अन्वय**—जो सबाह्यसंगु लागु सांडोनियां ( आणि ) आंगी आंगु सूनी एकाकी असे.

**अर्थ**—जो अंतर्बाह्यसंगाचा संबंध टाकून ( आणि ) आंगांत ( म्ह. ब्रह्मस्वरूपांत ) आंग ( म्ह. जीवात्मा ) घालून एकटा असतो.

**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

**अन्वय**—तुल्यनिन्दास्तुतिः[१] मौनी येन[२] केनचित् संतुष्टः अनिकेतः[३] स्थिरमतिः भक्तिमान् नरः मे प्रियः ॥

**अर्थ**—निंदा व स्तुति[१] समान मानणारा-मौनी-जे कांहीं[२] मिळेल-त्यानेंच संतुष्ट-कोठेंच आश्रय[३] धरून न राहणारा-स्थिरबुद्धि ( असा ) भक्तिमान् पुरुष मला प्रिय ( होय ).

जो निंदेतें नेघे । स्तुति न श्लाघे ॥
आकाशा न लगे । लेपु जैसा ॥ २०७ ॥

**अन्वय**—जैसा आकाशा लेपु न लगे ( तैसा ) जो निंदेतें नेघे[१] ( आणि ) स्तुति न[२] श्लाघे.[२]

**अर्थ**—ज्याप्रमाणें आकाशाला लेप लागत नाहीं ( त्याप्रमाणें ) जो निंदेला घेत[१] नाहीं[१] ( म्ह. मनावर घेत नाहीं ) ( व ) स्तुतीनें चढून[२] जात[२] नाहीं.[२]

तैसें निंदे आणि स्तुती । मानु करूनि एके पांती ॥
विचरे प्राणवृत्ती । जनीं वनीं ॥ २०८ ॥

**अन्वय**—तैसें निंदे आणि स्तुती एके पांती मानु करूनि ( जो ) जनीं[१] वनीं प्राणवृत्ती[२] विचरे.

**अर्थ**—त्याप्रमाणें निंदेचा आणि स्तुतीचा एकाच वर्गात समावेश करून ( जो ) लोक[१] वस्तींत[१] ( व ) ( निर्जन ) अरण्यांत वायुच्या[२] सारखा[२] भटकतो.

साच लटिकें दोन्हीं । बोलोनि न बोले जाहला मौनी ॥
जे भोगितां उन्मनी । आरायेना ॥ २०९ ॥

**अन्वय**—( जो ) साच लटिकें दोन्ही बोलोनि न[१] बोले[१] मौनी जाहला जे उन्मनी[२] भोगितां आरायेना.[३]

**अर्थ**—( जो ) खरें ( व ) खोटें दोन्ही बोलून-न बोलल्यासारखा[१] असतो—( व म्हणून ) ( तो ) मौनी ठरतो कारण ( त्याच्या ) उन्मनी[२] अवस्थेच्या[२] भोगण्यांत खंड[३] पडत[३] नाहीं.[३]

जो यथालाभें न तोखे । अलाभें न पारुखे ॥
पाउसेंवीण न सुके । समुद्र जैसा ॥ २१० ॥

**अन्वय**—जो यथालाभें[१] न तोखे ( आणि ) जैसा पाउसेंवीण समुद्र न सुके ( तैसा ) अलाभें न पारुखे.

**अर्थ**—जो-इच्छेप्रमाणें लाभ[१] झाला असतांहि-संतुष्ट होत नाहीं ( आणि ) ज्याप्रमाणें पाउसावांचून ( म्ह० पाऊस न पडला तरी ) समुद्र सुकत नाहीं ( त्याप्रमाणें ) अलाभानें खिन्न होत नाहीं.

आणि वायूसि एके ठायीं । बिढार जैसें नाहीं ॥
तैसा न धरीच कहीं । आश्रयो जो ॥ २११ ॥

**अन्वय**—आणि जैसें वायूसि एके ठायीं बिढार नाहीं तैसा जो कहीं आश्रयो न धरीच.

**अर्थ**—आणि ज्याप्रमाणें वायूला एके ठिकाणी वसतिस्थान नसतें त्याप्रमाणें जो कोठेंहि आश्रय धरीतच नाहीं.

आघवाचि आकाशस्थिति । जेवीं वायूसि नित्य वसति ॥
तेवीं जगचि विश्रांति—। स्थान जया ॥ २१२ ॥

**अन्वय**—जेवीं आघवाचि आकाशस्थिति[१] वायसि नित्य वसति ( असे ) तेवीं जगचि जया विश्रांति[२]-स्थान.[२]

**अर्थ**—ज्याप्रमाणें सर्व आकाशाच्या[१] पोकळींत[१] वायूची नित्य वसति (असते ) त्याप्रमाणें ( सर्व ) जगच ज्याचें राहण्याचें[२] ठिकाण[२] ( आहे ) ( म्ह० तो जगतांत कोठेंहि राहूं शकतो ).

हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ॥
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ २१३ ॥

**अन्वय**—हें विश्वचि माझें घर ऐसी जयाची स्थिर मती किंबहुना[१] (जो) आपण चराचर[२] जाहला.[२]

**अर्थ**—हें (संपूर्ण) जगच माझें घर (आहे) असें ज्याचें पक्कें मत (झालेलें असतें) फार[१] काय[१] सांगावें[१] (जो) स्वतःच स्थावरजंगमात्मक[२] जग[२] (विचार-दृष्टया) झालेला[२] असतो.[२]

मग याहीवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था ॥
तरी तयातें मी माथां । मुकुट करीं ॥ २१४ ॥

**अन्वय**—पार्था, मग याहीवरी[१] माझ्या भजनीं आस्था (असे) तरी मी तयातें माथां मुकुट[२] करीं.[२]

**अर्थ**—अर्जुना, मग यांत[१] आणखी[१] माझ्या भजनामध्यें (त्याचें) प्रेम (असेल) तर मी त्याला डोक्यावर-मुगुटाप्रमाणें[२] धारण करतों—

उत्तमासि मस्तक । खालविजे हें काय कौतुक ॥
परि मानु करिती तिन्ही लोक । पायवणिया ॥ २१५ ॥

**अन्वय**—उत्तमासि[१] मस्तक खालविजे हें काय कौतुक (असे) परि पायवणिया तिन्ही लोक मानु करिती

**अर्थ**—चांगल्या[१] व्यक्तीपुढें[१] मान वांकवावी ह्यांत काय आश्चर्य (आहे?) कारण (उत्तम व्यक्तीच्या) चरणतीर्थाला (सुद्धां) तिन्ही (भुवनांतील) लोक पवित्र मानतात.

तरि श्रद्धावस्तूसि आदरु—। करिता जाणिजे प्रकारु ॥
जरी होय श्रीगुरु । सदाशिवु ॥ २१६ ॥

**अन्वय**—जरी सदाशिवु श्रीगुरु होय तरि श्रद्धावस्तूसि[१] आदरु करिता प्रकारु जाणिजे.[२]

**अर्थ**—जर श्रीशंकर गुरु होतील तरच-आपल्या भक्तीचा विषय[१] असलेल्या व्यक्तीचा-आदर करण्याची रीत कळून[२] येईल.[२]

परि हें असो आतां । महेशातें वानितां ॥
आत्मस्तुति होता । संचारु असे ॥ २१७ ॥

**अन्वय**—परि हें आतां असो[१] महेशातें वानितां[२] आत्मस्तुति[३] होता संचारु असे.

**अर्थ**—परंतु हें आतां राहूं[१] दे[१] श्रीशंकराचें वर्णन[२] करीत[२] असतांना[२] माझी[३] स्वताची[३] स्तुति[३] होण्याचा दोष ( उत्पन्न ) होतो.

ययालागीं हें नोहे । म्हणितलें रमानाहें ॥
अर्जुना मी वाहें । शिरीं तयातें ॥ २१८ ॥

**अन्वय**—ययालागीं हें नोहे रमानाहें म्हणितलें अर्जुना मी तयातें शिरीं वाहें.[१]

**अर्थ**—याकारणास्तव हें ( योग्य ) नाहीं ( असें ) श्रीकृष्णानें म्हटलें, " अर्जुना, मी त्याला डोक्यावर धारण[१] करतों.[१] "

जे पुरुषार्थसिद्धि चौथी । घेऊनि आपुलिया हातीं ॥
रिगाला भक्तिपंथीं । जगा देतु ॥ २१९ ॥

**अन्वय**--जे चौथी पुरुषार्थसिद्धि आपुलिया हातीं घेउनि जगा भक्तिपंथीं देतु रिगाला.[१]

**अर्थ**—कारण चौथी पुरुषार्थासिद्धि ( म्ह. मोक्ष ) आपल्या हातांत घेऊन ( तो मोक्ष ) जगाला भक्तिमार्गानें वांटीत जात[१] असतो.[१]

कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडीबांधी करी ।
कीं जळाचिये परी । तळवटु घे ॥ २२० ॥

**अन्वय**—कैवल्याचा अधिकारी मोक्षाची सोडीबांधी[१] करी कीं जळाचिये[२] परी[२] तळवटु[३] घे.

**अर्थ**--मोक्षाचा स्वामी ( असल्यामुळें ) मोक्ष देणें[१] न[१] देणें[१] ( हें आपल्या इच्छेप्रमाणें तो ) करतो. तरीपण पाण्याप्रमाणें[२] ( म्ह. पाण्याची रीत अनुसरून ) खालचें[३] स्थान[३] घेतो ( म्ह. नम्रपणानें वागतो. )

म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्हीं माथां मुकुट करूं ॥
तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही ॥ २२१ ॥

**अन्वय**—गा ( अर्जुना ) म्हणोनि आम्ही तयातें नमस्कारूं[१] ( तयातें ) माथां मुकुट[२] करूं.[२] तयाची टांच[३] आम्हीं हृदयीं धरूं.[४]

**अर्थ**--अरे ( अर्जुना ), म्हणून आम्ही त्याला नमस्कार[१] करूं.[१] ( त्याला आम्ही ) डोक्यावर मुगुटासारखा[२] धारण[२] करूं[२] ( आणि ) त्याच्या पायाचें[३] चिन्ह[३] आम्ही हृदयावर धारण[४] करूं.[४]

तयाचिया गुणांचीं लेणीं । लेववूं आपुलिये वाणी ॥
तयाची कीर्ति श्रवणीं । आम्ही लेऊं ॥ २२२ ॥

**अन्वय**--तयाचिया गुणांचीं लेणीं आपुलिये वाणी लेववूं ( आणि ) आम्ही तयाची कीर्ति श्रवणीं लेऊं.

**अर्थ**—त्याच्या गुणांचे दागिने आमच्या वाचेला घालूं ( आणि ) आम्ही त्याची कीर्ति ( हा दागिना ) कानांत घालूं.

तो पहावा हे डोहळे । म्हणोनी अचक्षूसी मज डोळे ॥
हातींचेनि लीलाकमळें । पुजूं तयातें ॥ २२३ ॥

**अन्वय**—तो पहावा हे डोहळे म्हणोनि अचक्षूसी[१] मज[२] डोळे[२] ( असती ) हातींचेनि लीलाकमळें[३] तयातें पुजूं.[४]

**अर्थ**—तो पाहावा ही इच्छा असल्यामुळें चक्षुरहित[१] असतांहि[१]-मी डोळे[२] धारण करतों-हातांत-विलासाकरितां[३] घेतलेल्या कमळानें-( मी ) त्याची पूजा[४] करीन.[४]

दोंवरी दोनी । भुजा आलों घेऊनी ॥
आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ॥ २२४ ॥

**अन्वय**—तयाचें आंग आलिंगावयालागुनी[१] दोंवरी[२] दोनी भुजा घेउनी आलों.

**अर्थ**—त्याच्या शरीराला आलिंगन[१] देण्याकरितांच[१] ( मी ) दोन[२] भुजांवर[२] ( आणखी ) दोन भुजा घेऊन अवतरलों

तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे ॥
किंबहुना आवडे । निरुपमु ॥ २२५ ॥

अन्वय—विदेहा[१] मज तया संगाचेनि सुरवाडें देह धरणें[२] घडे,[२] किंबहुना (तो) निरुपमु आवडे.

अर्थ—देहरहित[१] असलेल्याहि[१] मला त्याच्या संगतीच्या सुखासाठीं शरीर धारण[२] करावें[२] लागतें[२] कार[३] काय[३] सांगावें[३] (तो मला) अद्वितीय वाटतो.

तेणेंसीं आम्हां मैत्र । एथ कायसें विचित्र ॥
परि तयाचें चरित्र । ऐकती जे ॥ २२६ ॥

अन्वय—आम्हां तेणेंसीं मैत्र एथ कायसें विचित्र परि जे तयाचें चरित्र ऐकती.

अर्थ—आमची त्याच्याशीं मैत्री (असते) यांत कसलें आश्चर्य? कारण जे त्याचें चरित्र ऐकतात (ते)—

तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें ॥
जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ २२७ ॥

अन्वय—जे भक्तचरित्रातें प्रशंसिती[१] तेही प्राणापरौते आवडती हें निरुतें (असे).

अर्थ—(व) जे भक्तचरित्रांचें वर्णन[१] करतात[१] तेसुद्धां (मला) प्राणा-पलीकडे आवडतात हें निश्चित (आहे).

जो हा अर्जुना साद्यंत । सांगितला प्रस्तुत ॥
भक्तियोगु समस्त । योगरूप ॥ २२८ ॥

अन्वय—अर्जुना, जो हा प्रस्तुत साद्यंत भक्तियोगु सांगितला (तो) समस्त योगरूप (असे).

अर्थ—अर्जुना, जो हा आतां संपूर्ण भक्तियोग सांगितला (त्यांत) सर्व योगांचा (अंतर्भाव होतो.) (म्ह. सर्व योगांचीं फळें त्यानें मिळतात.)

जेणें मी प्रीति करीं । कां मनीं शिरसा धरीं ॥
येवढी थोरी । जया स्थिती ये ॥ २२९ ॥

अन्वय—जेणें मी प्रीति करीं कां मनीं शिरसा धरीं[१] येवढी थोरी जया स्थिती ये.[२]

**अर्थ**—ज्यामुळें ( म्ह. ज्या भक्तियोगामुळें ) मी ( भक्तावर ) प्रीति करता आणि मनांत ( व ) मस्तकावर धारण[१] करतों[१] एवढी महती ( त्या भक्ताला ) ज्याच्या ( म्ह. भक्तियोगाच्या ) आश्रयानें प्राप्त[२] होते.[२]

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ॥**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥**

**अन्वय**--तु ये श्रद्दधानाः मत्परमाः भक्ताः इदं यथोक्तं[१] धर्म्यामृतम्[२] पर्युपासते[३] ते मे अतीव प्रियाः ॥

**अर्थ**—आणि जे श्रद्धावान् मत्परायण भक्त हें वर[१] सांगितलेलें[१] धर्मरूप[२] अमृताचें[२] सेवन[३] करतात[३] ( म्ह. त्याप्रमाणें आचरण करतात ) ते मला अत्यंत प्रिय ( आहेत. )

ते हे गोठी रम्य । अमृतधाराधर्म्य ॥
करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥ २३० ॥

**अन्वय**--जे ते हे रम्य अमृतधाराधर्म्य[१] गोठी आइकोनि प्रतीतिगम्य[२] करिती.

**अर्थ**—जे ती ही आनंददायक-अमृताच्या धारेचे धर्म धारण[१] करणारी-गोष्ट ( म्ह. भक्तियोग ) ऐकून ( आपल्या ) अनुभवाचा[२] विषय[२] करतात ( म्ह. त्याचा अनुभव घेतात. )

परि निरूपिली जैसी । तैसीच स्थिति मानसीं ॥
मग सुक्षेत्रीं जैसी । पेरणी केली ॥ २३१ ॥

**अन्वय**—परि ( मी ) जैसी निरूपिली तैसीच मानसीं स्थिति ( आथी ) मग जैसी सुक्षेत्रीं[१] पेरणी केली.

**अर्थ**—आणि ( मी ) ज्याप्रमाणें सांगितली तशीच मनांत स्थिति ( असेल ) ( तर ) मग ज्याप्रमाणें उत्तम[१] शेतांत[१] पेरणी केली ( म्हणजे बीं समृद्ध होतें ).

तैसीचि श्रद्धेचेनि आदरें । जयांचे ठायीं विस्तरे ॥
जीवीं जया थारे । जे अनुष्ठितीं ॥ २३२ ॥

**अन्वय**—तैसीचि श्रद्धेचेनि आदरें जयांचे ठायीं विस्तरे जया जीवीं थारे[१] ( आणि ) जे अनुष्ठिती.[२]

**अर्थ**—त्याचप्रमाणें श्रद्धेच्या स्वीकारानें ( ही गोष्ट ) ज्यांच्या ठिकाणीं वाढते ( म्ह. बळावते ) ज्यांच्या मनांत स्थिर[१] राहते[१] ( व ) जे ( ती ) आचरणांत आणतात[२].

परि मात परम करूनि । इये अर्थीं प्रेम धरूनि ॥
हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ॥ २३३ ॥

**अन्वय**—परि जे मातें परम[१] करूनि इये अर्थीं प्रेम धरूनि हेंचि सर्वस्व[२] मानूनि घेती.

**अर्थ**—आणि जे मला अंतिम[१] प्राप्य[१] करून ( आणि ) या गोष्टीची आवड धरून ( आणि ) हीच ( गोष्ट ) ( आपलें ) सर्व[२] भांडवल[२] समजून अंगिकारतात.

पार्था गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी ॥
उत्कंठा तयांलागीं । अखंड मज ॥ २३४ ॥

**अन्वय**—गा पार्था जगी तेचि भक्त तेचि योगी ( आथी ) मज तयांलागीं अखंड उत्कंठा ( असे )

**अर्थ**—अरे अर्जुना, जगतांत तेच भक्त ( व ) तेच योगी ( आहेत ) मला ( म्ह. माझ्या ठिकाणीं ) त्यांच्याविषयीं निरंतर उत्सुकता ( असते ).

ते तीर्थ ते क्षेत्र । जगीं तेचि पवित्र ॥
भक्तिकथेसी मैत्र । जयां पुरुषां ॥ २३५ ॥

**अन्वय**—जयां पुरुषां भक्तिकथेसी मैत्र ( असे ) तेचि जगीं पवित्र ते तीर्थ ते क्षेत्र.

**अर्थ**—ज्या पुरुषांना भक्तिकथेची आवड ( असते ) तेच ( या ) जगतांत पवित्र ( आहेत ) ते तीर्थ ( आहेत ) ( व ) ते क्षेत्र ( म्ह. पुण्यस्थान ) ( आहेत ).

आम्ही तयांचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन ॥
तेवांचूनि आन । गोमटें नाहीं ॥ २३६ ॥

**अन्वय**—आम्ही तयांचें ध्यान करूं, ते आमुचें देवतार्चन[1] ( असे ) तेवांचनि आन गोमटें नाहीं.

**अर्थ**—आम्हीं त्यांचें ध्यान करूं, ते आमुचे पुजेचें[1] दैवत[1] ( होत ) त्यांच्या-वांचून दुसरें ( जगतांत ) प्रिय ( आम्हांला ) नाही.

तयाचें आम्हां व्यसन । तो आमुचें निधिनिधान ॥
किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ २३७ ॥

**अन्वय**—आम्हां तयाचें व्यसन, तो आमुचें निधिनिधान[1] किंबहुना[2] तो मिळे तैं समाधान ( असे ).

**अर्थ**—आम्हांला त्याचा छंद ( असतो ) तो आमच्या-भांडारांतील[1] मूल्य-वान[1] ठेवा[1]-( आहे )-फार काय[2] सांगावें-तो भेटतो तेव्हांच ( आमच्या-मनाला ) समाधान ( वाटतें ).

पैं प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पांडुसुता ॥
ते मानूं परमदेवता । आपुली आम्ही ॥ २३८ ॥

**अन्वय**—पांडुसुता जे प्रेमळाची वार्ता अनुवादती ते आम्ही आपुली परम देवता[1] मानूं.

**अर्थ**—( अरे ) अर्जुना जे भक्ताची कथा सांगतात त्यांना आम्ही आमुचें श्रेष्ठ[1] दैवत[2] मानतों.

ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें ॥
बोलिलें मुकुंदें । संजयो म्हणे ॥ २३९ ॥

**अन्वय**—ऐसें तेणें निजजनानंदें[1] जगदादिकंदें[2] मुकुंदें बोलिलें संजयो म्हणे.

**अर्थ**—असें त्या-आपल्या भक्तांचा[1] आनंद-जगाचें[2] मूळ कारण-( अस-णाऱ्या ) श्रीकृष्णानें सांगितलें ( असें ) संजय म्हणाला.

राया जो निर्मळु । निष्कल लोककृपाळु ॥
शरणागतां प्रतिपाळु । शरण्यु जो ॥ २४० ॥

अन्वय—राया जो निर्मळु[1] निष्कल लोककृपाळु[2] शरणागता प्रतिपाळु[3] शरण्यु.[4]

'अर्थ—राजा ( धृतराष्ट्रा ) जो पवित्र[1] आचरणाचा[1] ( सर्व संपत्तीनें ) पूर्ण,-लोकांवर[2] कृपा करणारा,-( आणि ) शरणागतांचें रक्षण[3] करणारा[3] (व म्हणून)-आश्रय घेण्यास[4] योग्य-( असा जो श्रीकृष्ण तो म्हणाला ).

जो धर्मकीर्तिधवळु । अगाधदातृत्वें सरळु ॥
अतुळबळें प्रबळु । बळिबंधनु ॥ २४१ ॥

अन्वय—जो धर्मकीर्तिधवळु[1] अगाधदातृत्वें[2] सरळु[3] अतुळबळें[4] प्रबळु[5] बळिबंधनु.[6]

अर्थ—जो-धर्माच्या संबंधीं शुद्ध कीर्ति[1] धारण करणारा-( धर्मरक्षक म्हणून )-अपार[2] औदार्यामुळें[2]-नित्य[3] दान देण्यास सिद्ध-अद्वितीय[4] सामर्थ्यामुळें[4] अत्यंत[5] बलाढ्य[5] बळीला[6] ( पाताळांत ) बांधणारा.[6]

पैं सुरसहायशीळु । लोकलालनलीळु ॥
प्रणतप्रतिपाळु । हा खेळु जयाचा ॥ २४२ ॥

अन्वय—सुरसहायशीळु[1] लोकलालनलीळु[2] प्रणतप्रतिपाळु[3] हा जयाचा खेळु ( असे ).

अर्थ—देवांना साहाय्य[1] करणें हा ज्याचा स्वभाव आहे—लोकांचें प्रेमानें[2] रक्षण करणें हा ज्याचा विलास आहे—आणि शरणांगतांचें[3] रक्षण करणें-हा ज्याचा खेळ आहे—

जो भक्तजनवत्सलु । प्रेमळजनप्रांजळु ॥
सत्यसेतुसरळु । कलानिधि ॥ २४३ ॥

अन्वय—जो भक्तजनवत्सलु[1] प्रेमळजनप्रांजळु[2] सत्यसेतुसरळु[3] कलानिधि.[4]

अन्वय—जो भक्तजनांचा[1] कनवाळु-प्रेमकरणाऱ्या[2] लोकांशीं प्रेमानें वागणारा-सत्याची मर्यादा[3] पालन करणारा ( व )-कलांचा[4] ठेवा ( आहे ).

तो श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा ॥
सांगे येरु दैवाचा । आइकतु असे ॥ २४४ ॥

**अन्वय**—तो निजांचा चक्रवर्ती (व) वैकुंठींचा श्रीकृष्ण सांगे,[१] दैवाचा येरु आइकतु असे.

**अर्थ**—तो स्वकीयांचा पूर्णस्वामी (व) वैकुंठांतील श्रीकृष्ण सांगत[१] आहे[१] (आणि) भाग्यवान् दुसरा (म्ह० अर्जुन) ऐकत आहे.

आतां ययावरी । निरूपिती परी ।
संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ २४५ ॥

**अन्वय**—आतां ययावरी निरूपिती[१] परी अवधारीं (ऐसें) संजयो धृतराष्ट्रातें म्हणे.

**अर्थ**—आतां यानंतर (भगवंताचा) विवेचन[१] करण्याचा[१] प्रकार ऐक (म्ह० तिकडे लक्ष दे) (असें) संजय धृतराष्ट्राला म्हणाला.

तेचि रसाळ कथा । मऱ्हाठिया प्रति पथा ॥
आणिजेल आतां । अवधारिजो ॥ २४६ ॥

**अन्वय**—तेचि रसाळ कथा मऱ्हाठिया[१] पथा[२] प्रति[२] आणिजेल,[३] आतां अवधारिजो.[४]

**अर्थ**—तीच रसभरित कथा मऱ्हाठी[१] भाषेच्या[२] रूपांत[२] आणली[३] जाईल[३] आतां (तिकडे) लक्ष[४] द्यावें.[४]

ज्ञानदेव म्हणे तुम्ही । संत वोळगावेति आम्ही ।
हें पढविलां जी स्वामी । निवृत्ति देवीं ॥ २४७ ॥

**अन्वय**—ज्ञानदेव म्हणे जी आम्ही तुम्ही संत वोळगावेति[१] हें स्वामी निवृत्तिदेवीं पढविला.[२]

**अर्थ**—ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात "महाराज, आम्हीं तुम्हां संतांची सेवा[१] करावी[१] हें श्रीगुरु निवृत्तिदेवांनीं (आम्हांस) शिकविलें[२] आहे.[२]

॥ इति श्रीज्ञानदेव विरचितायां भावार्थदीपिकायां द्वादशोऽध्यायः ॥१२॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

॥ ॐ ॥

# ॥ ज्ञानेश्वरी अध्याय बारावा ॥

## प्रकरण पहिलें

### टीपा व विस्तृत निरूपण

## उपोद्‌घात

श्रीज्ञानेश्वरमहाराज ह्या अध्यायाच्या आरंभीं आपले गुरु जे श्रीनिवृत्तिनाथ त्यांच्या 'कृपादृष्टीचें' म्हणजे पर्यायानें आपल्या गुरूचेंच नमन आईच्या रूपकानें करतात. 'गुरुकृपादृष्टि' म्हणजे गुरु, आणि ह्याच दृष्टीनें गुरुकृपादृष्टीच्या सर्व विशेषणांचा अर्थ हा गुरूंच्या वर्णनात्मक आहे असें समजावयाचें.

**नमनाचें (मंगलाचें) महत्व**—आस्तिक ग्रंथकार हा सामान्यतः आपल्या ग्रंथाच्या आरंभीं, गणपति अथवा सरस्वतीचें किंवा आपल्या कुलदेवतेचें नमन करीत असतो. असें नमन करण्यांत ग्रंथकाराचे मुख्यतः तीन हेतु दिसून येतातः—

(१) आपण हातीं घेतलेला ग्रंथ निर्विघ्नपणें पार पडावा. (२) आपल्या ग्रंथवाचनानें लोक आस्तिक बनावेत, व (३) आपल्यावर नमन करण्याचा जो पूर्वापार शिष्टाचार चालत आलेला आहे तो मोडल्याचा आरोप येऊं नये.

**ज्ञानेश्वरांचीं नमनें**—ज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायाच्या आरंभीं तर नमन केलेलें आहेच, पण लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं त्यांनीं इतर पुष्कळ अध्यायांच्या आरंभींहि नमन केलेलें आहे. असे गीतेचे फक्त पांचच अध्याय आहेत कीं ज्यांच्या आरंभीं त्यांनीं नमन केलेलें नाहीं. ते अध्याय म्हणजे २, ३, ५, ७ व ८ होत. असें वारंवार नमन करण्यामध्यें ज्ञानेश्वरमहाराजांचे मुख्यतः दोन हेतु दिसतात--

( १ ) गुरूंनीं आपल्यावर प्रसन्न होऊन आपल्याला स्फूर्ति द्यावी व तद्द्वारा नवीन नवीन कल्पना व विचार सुचावे व त्यांच्यामुळें आपल्याकडून असा ग्रंथ निर्माण व्हावा कीं ज्याचें सेवन करीत असतांना अमृतरसहि त्याच्यापुढें फिक्का वाटावा. ( ' माझा मराठाचि बोलु कौतुकें । परि अमृतातें ही पैजा जिंके । ऐसीं अक्षरें रसिकें । मेळवीन ॥ ' ज्ञा–६–१४ ).

जसें इंजिन ( Engine ) हें रस्त्यांत कोळसा व पाणी ह्यांची तूट पडूं नये म्हणून वाटेंत मोटमोठ्या स्टेशनवर कोळसा व पाणी वारंवार भरून घेत असतें त्याचप्रमाणें आपणांस योग्य शब्द व योग्य अलंकार ह्यांची वानवा पडूं नये, एवढेंच नव्हे, तर त्यांचा लाभ गुरूच्या कृपादृष्टीनें सतत व्हावा एवढया-करितांच ज्ञानेश्वरमहाराज वारंवार नमन करून श्रीगुरुजवळ कृपेची मागणी करतात. ( आतां कृपाभांडवल सोडीं । भरीं मति माझी पोतडी । करीं ज्ञानपद्य जोडी । थोरा मातें ' ॥ ज्ञा. –१४–१७ ' हे वाक्सृष्टि एके वेळे । देखतु माझे बुद्धीचे डोळे । तैसा उदैजो जी निर्मळें । कारुण्य चिंबें ॥ ' ज्ञा–१४–२०)

( २ ) ज्ञानेश्वरमहाराजांनीं नमनाचा उपयोग अध्यायसंगति सांगण्या-करितां केला आहे. एका अध्यायापासून दुसरा अध्याय कसा निघाला हें सांगणें व तद्द्वारा ग्रंथाची सुसंगतता दाखविणें ही एक प्रकारची जबाबदारी टीकाकारावर असते. ज्ञानेश्वरमहाराजांनीं हें ओळखून नमनांतून कित्येक वेळां अध्यायसंगति सांगितलेली दिसते.

या सर्व नमनांतून ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या गुरूच्या तात्विक स्वरू-पाचें वर्णन केलेलें आहे; त्यांच्या स्थूल शरीराचें वर्णन कोठेहि केलेलें नाहीं. ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या गुरूच्या तात्विक स्वरूपाचें वर्णन करण्याकरितां जीं रूपकें योजलेलीं आहेत त्यांत कधीं ' आचार्याच्या ' रूपकानें, कधीं सूर्याच्या रूपकानें, कधीं गणपतीच्या रूपकानें व प्रस्तुत अध्यायांत आईच्या रूपकानें गुरूचें वर्णन केलेलें आहे. खोल अभ्यासाअंतीं असें दिसून येईल कीं हीं जीं वेगवेगळीं रूपकें केलीं आहेत तीं रूपकें निर्हेतुक नाहींत; तर प्रत्येक अध्यायांत जो विषय सांगितला आहे त्याला अनुरूप अशीं तीं रूपकें आहेत. त्यांच्या-मागें कारणपरंपरा आहे. तीं हेतुपूर्वक आहेत.

**आईचें रूपक कां केलें?**— प्रस्तुत अध्यायाच्या आरंभीं ज्ञानेश्वरमहाराजांनीं आपल्या गुरूचें नमन 'आईच्या' रूपकानेंच कां केलें हें ध्यानांत येण्याकरितां ११ व्या अध्यायांतील विषयाचें सिंहावलोकन करणें अवश्य आहे.

१० व्या अध्यायांत भगवंतांनीं अर्जुनाला विस्तरशः आपल्या विभूति सांगितल्या; त्या ऐकून अर्जुनाच्या मनांत एक अचाट इच्छा उत्पन्न झाली कीं या सर्व विभूति आपण आपल्या चर्मचक्षूंनीं पहाव्या. त्याप्रमाणें अर्जुनानें भगवंताला विनति केली व भगवंतांनीं ११ व्या अध्यायांत अर्जुनाला आपलें विश्वरूप दाखविलें. तें भगवंताचें अक्राळविक्राळ विश्वरूप पाहून ', कीं ज्याच्यांत भीष्म, द्रोण वगैरे सर्व गिळकृत झालेले त्याला दिसले व आपणही त्यांत विरघळून जाणार असें त्याला वाटूं लागलें.' त्यामुळें अर्जुन घाबरला व त्यानें भगवंताला आपण पुन्हां सगुण साकार व्हावें अशी विनंति केली. भगवंत त्याच्याकरितां सगुणसाकार झाले; परंतु त्यांनीं तसें होतांना अर्जुनाला दोष दिला व ते म्हणाले "अरे अर्जुना, तूं गांवढळ दिसतोस, माझें खरें जें विश्वरूप तें टाकून तूं सगुणसाकार रूपावर प्रेम धरतोस हें योग्य नव्हे. असें करणें म्हणजे अंग सोडून छायेला आलिंगन देण्यासारखें आहे" ('परि नेणसीच गांवढिया। काय कोपों आतां धनंजया। आंग सांडोनि छाया। आलिंगितोसि मा।' ज्ञा.–११–६२९).

ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात आजपर्यंत जें विश्वरूप कोणालाहि दाखविलें नाहीं त्या विश्वरूपवस्त्राची घडी भगवंतांनीं अर्जुनाकरितां उलगडली, परंतु तें वस्त्र अर्जुनाला पटलें नाहीं म्हणून ती घडी पुन्हां गुंडाळली. ही गोष्ट प्रेमाखेरीज होणें शक्य नाहीं. या प्रेमाला योग्य दृष्टांत एक आईचाच ज्ञानेश्वरमहाराजांना दिसला. आई ही मुलाकरितां त्यानें बदामाच्या वड्या मागितल्या तर पायाखालीं खुर्ची घेऊन फळीवरून वड्या काढून त्याला देते. परंतु इतक्यांत त्या मुलाची लहर फिरली व "ह्या बदामाच्या वड्या नकोत, मला श्रीखंडाच्या वड्या दे" म्हणून तें रडूं लागलें तर आई त्याच्यावर रागावते, त्याला पोरट्या वगैरे शिव्याहि देते, पण मुलावरील प्रेमामुळें पुन्हां त्या बदामाच्या वड्या ठेवून श्रीखंडाच्या वड्या काढून देते. हें सर्व आईच्या ठिकाणींच शक्य

आहे. ( ' देखा बालकाचिया धर्गी धाइजे । का शिष्याचेनि जाइलेपणें होइजे । हे सद्गुरूचि एकलेनि जाणिजे । कां प्रसवतिया ॥ ' ज्ञा.–८–५५ ).

वास्तविक ज्ञान प्राप्त करून घेण्याकरितां गुरूची कष्टतर सेवा करावी लागते व अशी कष्टतर सेवा करूनहि गुरु जर प्रसन्न झाले तरच ज्ञान सांगतात. पण ह्या ठिकाणीं तर सर्व उलटेंच दिसतें. अर्जुन रागावला तर ते सर्व सहन करून त्याचे गुरु श्रीकृष्ण, तो म्हणेल तें करण्यास तयार होतात. अशा प्रकारचे गुरुशिष्यांचें अद्वितीय प्रेम पाहून ज्ञानेश्वरमहाराजांचे ठिकाणीं त्यांच्या गुरूबद्दल असलेलें प्रेम जागृत झालें ( ' हा ठाववरी शिष्याची निकसी सहाते गुरु आहाती कवणें देशीं । परी नेणिजे आवडी कैसी । सजयो म्हणे ॥ ' ज्ञा–११–६४६ ) व म्हणूनच ते या अध्यायाच्या आरंभीं आपल्या गुरूचें नमन ' आईच्या ' रूपकानें करतात. ते म्हणतात कीं हे गुरुकृपादृष्टिरूपी माउली म्हणजेच ' हे श्रीगुरुमाउली ' तुझा जयजयकार असो.

**ओवी १--जयजय--**( तुझा ) जयजयकार असो. **वो--**अहो; हे. **शुद्ध**—निर्मळ, पवित्र,—श्रीगुरूंच्या म्हणजेच संतांच्या शुद्धतेचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे. सामान्यतः तीच वस्तु शुद्ध म्हणून गणली जाते कीं, जिच्याजवळ दुसरी अपवित्र वस्तु आली असतां, ती तिच्यामुळें अपवित्र तर होत नाहींच उलट त्या अपवित्र वस्तूलाहि ती शुद्ध करते. ( ' पुनीत केले विष्णुदासी । संगें आपुलिया दोषी ॥ ' तुका—१९८९ ' जय जय देव निर्मळ । ' ज्ञा–१८–१ ) संतांच्या शुद्धतेचें व्याख्यान ज्ञानेश्वरांनीं याच अध्यायांत ' अनपेक्षः शुचिर्दक्षः ' गीता–१२–१६ या श्लोकांवर केलेलें आहे. त्या दृष्टीनें सांगावयाचें तर जगतांत तीन वस्तु मोठ्या पवित्र आहेत. एक काशीक्षेत्र, दुसरा हिमालय व तिसरी गंगा. पण या तिहींपेक्षां संतांचें पावित्र्य अगाध आहे. काशी ही मोक्ष देते ही गोष्ट खरी; परंतु जो काशींत मरतो त्यालाच मोक्ष मिळतो. जन्मभर जरि काशींत राहिला परंतु मरणाच्या वेळेस, तो परगांवाला जाऊन मेला तर त्याला काशी मोक्ष देऊं शकत नाहीं. ( ' मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर । परि वेचणें लागे शरीर । तिये गांवीं । ' ज्ञा–१२–१७३ ) परंतु संतांच्या जवळ येऊन मरावें लागत नाहीं;

येवढेंच नव्हे तर जन्मभर त्यांच्याजवळहि रहावें लागत नाहीं. ( ' आलिंगनें घडे । मोक्ष सायुज्यता जोडे ॥ ' तुका–१९३४ )

हिमालय हाहि पवित्र आहे; परंतु हिमालयाच्या यात्रा करण्याकरितां शरीर सुदृढ लागतें, जवळ पैसा लागतो व या यात्रा करतांना जीवास अपायहि होतो. एवढेंच नव्हे तर हिमालयावर देह पडावा लागतो परंतु साधूंच्याजवळ येण्यास कष्ट पडत नाहींत; पैसाहि खर्च करावा लागत नाहीं व त्यांच्याजवळ येऊन मरावेंहि लागत नाहीं. ( ' हिमवंतु दोष खाये । परि जीविताची हानि होये । तैसें शुचित्व नोहे । सज्जनाचें ॥ ' ज्ञा–१२–१७४ )

त्याचप्रमाणें गंगाहि पवित्र आहे. तिच्यांत स्नान केलें असतां अंतःकरण-शुद्धिहि होते, परंतु ज्यांच्या ठिकाणीं श्रद्धा आहे त्यांचेच कार्य सफलित होतें. याशिवाय गंगेंत देह टाकावा लागतो. ( ' शुचित्वें शुचि गांग होये । आणि पाप ताप ही जाये । परि तेथें आहे । बुडणें एक ॥ ' ज्ञा–१२–१७५. ) परतु संतांच्या जवळ येऊन देह टाकावा लागत नाहीं, तर ते जीवंतपणींच साधकास मोक्ष देऊं शकतात. एवढेंच नव्हे, तर गंगेंत पापी लोक स्नान करतात त्यामुळें गंगेला जो अपवित्रपणा येतो तो तिचा अपवित्रपणा संतांनीं तिच्यांत स्नान केलें असतां नाहींसा होतो. ( ' सतांचेनि अंगलगें । पापातें जिणणें गंगे । तेणें संतसंगे । शुचित्व कैसें ॥ ' ज्ञा–१२–१७७. ) गगेची जी आज पवित्र म्हणून ख्याति आहे तिला कारण ती भगवंताच्या चरणापासून निघाली हेंच होय. तो भगवान्‌हि प्रत्यक्ष संताच्या संगतीचीच अपेक्षा करतो व त्यांच्या चरणरेणूनें आपण पवित्र झालों असें मानतो. ( ' अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंघ्रिरेणुभि : ' ॥ एभा—श्लोक १४–१६ ' देव इच्छी संत चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ तुका–१९८५ ). संत हे तीर्थाला तीर्थ होतात एवढी त्यांची पवित्रता असते. ( ' मोक्षाचें तीर्थ न लगे वाराणसी । येती तयापासीं अवघी जनें । तीर्थांशी तीर्थ जाला तोचि एक । मोक्ष तेणें दर्शनें । तुका–२०८१ ).

इतकें पावित्र्य अंगांत येण्यास संत हे किती पवित्र झालेले असतात याची कल्पना येणें अवश्य आहे. मनुष्याच्या ठिकाणीं अपवित्रता ही त्याच्या ठिका-

च्या देहतादात्म्यामुळें मुख्यतः आलेली असते. ‘ देहोऽहं ’ हें स्फुरण घालविण्याकरितां ‘ शिवोऽहं ’ हें स्फुरण ध्यानानें आणावें लागतें; परंतु कांहीं काळानंतर ‘ शिवोऽहं ’ हेंहि स्फुरण जावें लागतें. शरीराच्या दृष्टीनें ज्याप्रमाणें माती हा मळ आहे त्याचप्रमाणें अत्तर हाहि मळच आहे, कारण तेंहि विजातीय द्रव्य आहे. तद्वतच ‘ स्वरूपाच्या ’ दृष्टीनें ‘ मी देह आहे ’ हें स्फुरण अविद्येचा मळ आहे व ‘ मी ब्रह्म आहे ’ हें स्फुरण विद्येचा मळ आहे. ( ब्रह्मीं स्फुरे जें स्फुरण । शुद्ध सत्त्वाचें लक्षण । तो तूं लक्षी लक्ष्यातीत । परिपूर्ण रे । ’ नाथ–३१४४ ). ह्या दोन्ही स्फुरणरहित जी केवळ निर्धर्म स्वरूपस्थिति म्ह. ब्रह्मरूप स्थिति ) तीच ‘ शुद्ध ’ या पदानें संबोधिली आहे. तिच्याशीं संत हे विचारानें समरस झालेले असतात. म्हणूनच ते खरे ‘ शुद्ध ’ असतात दुसऱ्यास पवित्र करणारा हा स्वतः फार पवित्र असावा लागतो व संतांच्या ठिकाणीं वर वर्णिलेल्या अविद्या व विद्या या दोन्ही उपाधिमळांचा वास नसल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं अपवित्राला पवित्र करण्याचें सामर्थ्य असतें ( ‘ जयाचेनि कृपासलिलें । जीवु हा ठाववरी पाखाळे । जें शिवपण ही वोविळें । अंगीं न लवी ॥ ’ अमृ.–२–११ ).

उदार०—दानशूर, दाता, थोर मनाचा–जगतांत दातृत्वाबद्दल मुख्यतः तीन वस्तु प्रसिद्ध आहेत. एक कल्पतरु, दुसरी कामधेनु व तिसरा चिंतामणि. ह्यांच्याजवळ कल्पिलेली वस्तु प्राप्त होते, परंतु कल्पना करणारा जर दुर्दैवी असेल तर ह्या वस्तु प्राप्त होऊनहि त्याचा नाश होऊं शकतो. ( उदाहरणार्थ एक अभागी मोळीविक्या दरिद्री मनुष्य उन्हांत तापल्यामुळें सावलीसाठीं एका झाडाखालीं बसला. तें झाड कल्पतरूचें होतें. दमल्यामुळें त्याला साहजिकच अशी इच्छा उत्पन्न झाली कीं या वेळेस आपणास प्यावयास गार पाणी मिळेल तर फार बरें होईल. अशी कल्पना केल्याबरोबर त्याच्यासमोर वाळा घातलेला व थंड पाण्यानें भरलेला असा एक चांदीचा पेला उत्पन्न झाला. पाणी प्याल्यानंतर आपणांस जेवावयास सुग्रास अन्न व झोंप घेण्यास उत्तम पलंग मिळाला तर फार बरें होईल अशी कल्पना त्याच्या मनांत आल्याबरोबर त्या वस्तु त्याच्यापुढें तयार होऊन आल्या. पलंगावर पडल्यानंतर तो

अभागी असल्यामुळें त्याच्या डोक्यांत अशी कल्पना आली कीं हा सर्व खेळ एखाद्या भुताचा तेर नाहींना व तें भूत मला खाणार तर नाहींना ? त्याबरोबर तेथें भूत उत्पन्न होऊन त्यानें त्याला पेढ्यासारखें गट्ट करून टाकलें.) शिवाय ह्या वस्तु मनुष्याच्या कल्पना व कामना अधिकाधिक वाढवितात. याच्या उलट संतांच्याजवळ येणारा हा जरी दुर्दैवी असला तरी त्याचा उद्धार होतो व त्याच्या कामना व संकल्प नाहींसे होतात. ( ‘ या संतांचें हें देणें । कल्पतरुहूनि दुणें । परीसा परीस अगाध देणें । चिंतामणि ठेंगणा ॥ ’ ज्ञा. गा.–२१९ ) संत हे कल्पनातीत जी ब्रह्मवस्तु ती प्राप्त करून देणारे कल्पतरू आहेत. ( जय जय देव श्रीगुरो । अकल्पनाख्य कल्पतरो । ज्ञा.–१८–१० ) म्हणून संतांची उदारता ह्या तिन्हीं वस्तूपेक्षां श्रेष्ठ आहे.

एवढेंच नव्हे तर संतांची उदारता ही भगवंताच्या उदारतेपेक्षांहि श्रेष्ठ आहेः—( १ ) देव हा प्रथम कांहीं तरी घेतो व मग देतो. सुदाम्याला देवांनीं सोन्याची नगरी दिली, परंतु पहिल्यांदा त्याच्या जवळचे पोहे खाल्ले. ( ‘ उदाराचा राणा म्हणविसी आपणा । सांग त्वां कवणा काय दिलें । ’ नामा–४२७. ) परतु संत हे ‘ प्रत्युपकार न वांच्छिता ’ दान देतात. उदाहरणार्थ दधिची ऋषींनीं कांहींहि मोबदला न घेतां इंद्राला वज्र करण्याकरितां स्वतःचीं हाडें दिलीं.

( २ ) देवाच्या ठिकाणीं आपपरभाव आहे कारण तो आपल्या भक्तांचा प्रतिपाळ करतो व शत्रूंचा संहार करतो. परंतु संत हे आपल्या शत्रूंचेंहि कल्याण करतात. वाल्या कोळी नारदांना ठार मारावयास तयार झाला होता परंतु नारदांनीं त्याचा उद्धार करून त्याला अशी योग्यता प्राप्त करून दिली कीं तो पुढें वाल्मिक ऋषि झाला. देव हा भक्तवत्सल आहे तर साधु हे दीनवत्सल आहेत. ( ‘ अवतार तुम्हां धराया कारण । उद्धरावे जन जड जीव । तुका–१९६६ ) एवढेंच नव्हे तर जे अज्ञानी व दुष्ट असतात त्यांच्याबद्दल संतांच्या ठिकाणीं अधिक कळकळ असते. ( ‘ जे खळाची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ’ । ज्ञा.१८–१७९४ )

( ३ ) देव हा भक्तांच्या इच्छेनुरूप फळ देणारा आहे ( ये यथा मां

प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ॥ गीता–४–११ ) आपण त्याच्याजवळ जी गोष्ट मागूं ती 'तथास्तु' म्हणून तो देतो; परंतु ती देतांना त्यांत भक्ताचें कल्याण आहे कां अकल्याण आहे हें पहात नाहीं. उदाहरणार्थ 'हिरण्यकशीपूनें' देवाजवळ 'मी रात्रीं मरूं नये, दिवसा मरूं नये' वगैरे अनेक वर, मरण चुकविण्याकरितां मागितले; देवानें ते सर्व वर दिले; पण असा उपदेश त्यास केला नाहीं कीं शरीर हें कधींच अमर होणार नाहीं. खुद्द भगवंताच्या रामकृष्णादिक अवतरांचे विग्रह टिकले नाहींत; मग मनुष्याचें शरीर अमर कसें काय होणार ? त्याचप्रमाणें वसुदेवानें देवाजवळ "तूं माझा पुत्र हो" असा वर मागितला. भगवंतानें "तथास्तु" म्हटलें, पण त्यास श्रेय जें आत्मज्ञान तें माग म्हणून सांगितलें नाहीं. पुढें नारदांनीं वसुदेवाला आत्मज्ञान सांगून त्याचा उद्धार केला. ('म्यां पूर्वीं आराधिलें देवराया । तें भजन ममता नेलें वाया । प्रलोभविलों देवमायां । पुत्रस्नेहालागोनी' । ए. भा.–२–८६ ). संत हे त्यांच्या जवळ येणाऱ्यानें जरी पुत्रधनादि ऐहिक भोगांची मागणी केली तरी ते त्याला तीं देत नाहींत; उलट त्याच्या ठिकाणीं भगवद्भक्तीची आवड उत्पन्न करतात. ('निळा म्हणे धराल हातीं । तरि द्याल मति निरुपम ।' निळा–१५८६ )

( ४ ) देव हा वर देतो व पुन्हा अदृश्य होतो पण साधु आपल्या शिष्याकडून परमार्थाचा अभ्यास करून घेतात व त्याचा उद्धार करतात, त्याला आपले पद देतात; म्हणजे 'मी ब्रह्म आहें' अशा अनुभवावर त्याला आणून ठेवतात.

( 'कृपाकटाक्षें न्याहाळिलें । आपुल्या पदीं बैसविलें । बापरखुमादेविवरें विठ्ठलें । भक्ता दिधलें वरदान ।' ज्ञा. गा. २१९ )

अशा प्रकारचें अलौकिक व अमुप औदार्य संतांच्या म्हणजे गुरूंच्या ठिकाणीं होण्यास्तव ज्ञानेश्वर महाराज गुरुपाउलीचें वर्णन 'उदार' व 'प्रसिद्ध' ह्या विशेषणांनीं करतात.

**आनंदें वर्षतिये**—आनंदाचा वर्षाव करणारी–संतांच्या सान्निध्यांत मनुष्याला त्याच्या दुःखाचा विसर पडतो. कारण संत हे सदा सर्वकाळ प्रसन्न

असतात. ( ' जयाचें नांव तीर्थरावो । दर्शनें प्रशस्तीसि ठावो । जयाचेनि संगें ब्रह्मभावो । भ्रांतासही ॥ ' ज्ञा. ६–१०२ ) एवढेंच नव्हे तर संत असा आनंदाचा वर्षाव करतात कीं त्रिविध दुःखें जरी प्राप्त झालीं तरी मनुष्याच्या चित्तांतील आनंद कमी होत नाहीं.

( ' प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते । ' गीता २–६५ ) कारण आनंदरूप जो आत्मा त्याची प्राप्ति संत करून देतात. ( ' तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्व सुखाचा आरामु । ज्ञा. ९–६० ) विषयाच्या प्राप्तीनें होणारा आनंद हा अल्प व क्षणिक असतो परंतु आत्म्याच्या प्राप्तीनें होणारा आनंद हा अमर्यादित व अखंड असतो. प्रत्येक जीवाच्या ठिकाणीं आत्म्याच्या ' सद्, चिद् व आनंद ' ( अ. स्प. प्र. २ पहा ) या तीन स्वरूप लक्षणापैकीं पहिल्या दोहोंची जाणीव असते. म्हणजे ' मी आहे ' व ' मी ज्ञाता आहे. ' असें ज्ञान प्रत्येकाला असतें. फक्त कमतरता जर कशाची असेल तर ती आनंदाची. त्या आनंदाचा लाभ संत करून देतात. ( ' धर्म जागो गुरु महिमा देहीं दाविला देव । ' नाथ—३७१३ ). केशवस्वामी व आनंदमूर्ती यांच्याबद्दल अशी एक कथा सांगतातः—एकदां केशवस्वामींचें कीर्तन हैद्राबादेस चाललें होतें. त्या वेळेस आनंदमूर्ती हैद्राबादेस आले आहेत असें स्वामींना कळलें, तेव्हां कीर्तनाच्या शेवटीं केशवस्वामींनीं असें सांगितलें कीं " आनदमूर्तीची व माझी जो भेट करून देईल त्याला मी महायात्रेचें अर्ध पुण्य देईन. " ज्या ब्राह्मणाच्या घरीं आनंदमूर्ती उतरले होते त्या ब्राह्मणानें आनदमूर्तींना कीर्तनास येण्याबद्दल आग्रह केला. आनंदमूर्तींनीं त्या ब्राह्मणास केशवस्वामीजवळ " माझ्या व केशवस्वामींच्या भेटींत जो आनंद होईल त्या आनंदाचा अंश माग " असें सांगितलें. त्याप्रमाणें त्या ब्राह्मणानें तसें मागितलें व केशवस्वामींनीं त्याला आनंद दिला. त्याचा परिणाम असा झाला कीं तो ब्राह्मण सदा ब्रह्मानंदांत निमग्न राही. ) केवळ शास्त्राभ्यास करून चित्त समाधान होईल असें सांगतां येत नाहीं. खुद्द श्रीव्यासांनीं अनेक ग्रंथ लिहिले; परंतु त्यांच्या चित्ताचें समाधान होईना म्हणून ते सरस्वतीतीरावर जाऊन तपश्चर्या करीत बसले. नंतर नारदांनीं त्या ठिकाणीं

येऊन त्यांना उपदेश केला व त्यामुळें व्यासांना समाधानता व आनंद प्राप्त झाला. ( ' बाप गुरुवाक्याचा निजबोध । निःशेषें निरसला जीवभेद । पूर्ण कोंदला परमानंद । स्वानंदकंद निजबोधेंसी ॥ चतुभा—९०२ ) अशा रीतीनें संत हे अखड आनंदाची वृष्टि करतात; पण तत्पूर्वी संत काय करतात हें पुढच्या ओवींत सांगतात.

**ओवी २—मिठी**—आलिंगन, विळखा, दंश. **ताठी**—ताठपणा, मूर्च्छा. **तुटी**—उठत नाहीं, नष्ट होत नाहीं. **विषयव्याळ**—विषयरूपी सर्प—शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध असे पांच विषय आहेत. यांना सर्प म्हणण्याचें कारण यांचें सेवन केलें असतां मनुष्याचा नाश होतो. विष खाल्लें असतां एकदांच मृत्यु येतो; पण विषयांचे सेवन केलें असतां मनुष्याला अनेक जन्म घेऊन तितक्यां वेळां मरावें लागतें. ( ' विखाहूनि विषय अधिक । विख एक वेळा मारक । विषयो पुनः पुनः घातक । काळ सर्व लोक भुलविले ॥ ' ए.भा. १९–१२३. ' विषय सेवितां गा जन्ममरणाच्या बाधु ।' नाथ–३७०६ विषयाबद्दलचें जे प्रेम तेंच या ठिकाणीं विष होय. सर्प चावलेल्या माणसाला कडु लिंबाचा पाला खावयास दिला तर तो त्याला गोड लागतो, त्याचप्रमाणें विषयप्रेमरूपी विष ज्याच्या अंगांत भिनतें त्याला गोड परमार्थ कडू लागतो व कडू विषय गोड वाटतो. ( ' विषयविषाचा पडिपाडु । गोड परमार्थु लागे कडू । कडू विषय तो गोडू । जीवासी जाहला ॥ ' ज्ञा. १०–१५९ ' विषय निंब बहु गोडीये आला । भजन गूळ तो मज कडु झाला । ' नाथ–३७८७ ) विषयांचें प्रेम अधिक वाढलें असतां मनुष्य बेभान होतो व मग त्याला त्याच्या कर्तव्याची शुद्धि रहात नाहीं. मनुष्यजन्माचें मुख्य कर्तव्य ईश्वरप्राप्ती करून घेणें हें आहे. त्या कर्तव्याला विसरणें हीच आहे मूर्च्छा. ( ' पाहे पा शरीराचिया गांवा । जया लागीं आले पांडवा । तो कार्यार्थु आघवा । सांडुनिया ॥ ' ज्ञा. ७–१०५ ) तो आपल्या कर्तव्याला विसरतो एवढेंच नव्हे तर ऐहिक ऐश्वर्याच्या मदानें त्याच्या ठिकाणचा विचार नाहींसा होतो. ( ' आणि स्त्रीपुत्रादि मेळें । संपत्ति जंव जंव फळे । तेणें रजें डोळे । जाती जयाचे ॥ ज्ञा. १३–७६८ ) तो वेद, ईश्वर, मोक्ष हें सर्व

खोटें आहे असें म्हणूं लागतो. ( ' तैसा माजे स्त्रिया धनें । विद्या स्तुती बहुतें मानें । ' ज्ञा. १६–२२७. ' असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् । गीता. १६–८. ' तारुण्याच्या मदें न मानी कोणासी । सदा मुसमुसी घुली जैसा । ' तुका—३२०९ ).

**निर्विष होय**—( तो दंश ) विषरहित होतो–संतांच्या संगतीनें जीवाच्या ठिकाणीं असणारें विषयप्रेमरूपी विष नाहींसें होतें. ते त्याला उपदेश करतात कीं, ' ज्या शरीराकरितां तूं सर्व विषय गोळा करीत आहेस ते शरीर आज ना उद्यां तुला सोडून जाणार ' ( ' मग हें तंव पांच मेळावा । शेखीं अनुसरल पंचत्वा । ते वेळीं केला कें गिंवसावा । शीणु आपुला । ' ज्ञा. ३–२०८. ' देह जाईल जाईल । यासी काळ बा खाईल । ' तुका–२७३८.) ' शेवटीं तुझ्याबरोबर जर कांहीं येणार असेल तर तें तूं केलेलें कर्मच होय. ' ( धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे । भार्या गृहद्वारि जनः स्मशाने । देहश्चितायां परलोकमार्गे । कर्मानुगो गच्छति जीव एकः । ) संतांच्या संगतींत जो कोणी येईल त्याचा ते उद्धार करतात. समर्थ रामदासस्वामी एकदां भिक्षेला बाहेर गेले असतां त्यांच्या अंगावर एका बाईनें शेणाचें पोतेरें फेंकून मारलें; परंतु पुढें रामदासस्वामींनीं तिला आपल्या कीर्तनास येण्याचा आग्रह केला व तिचा उद्धार केला. प्रापंचिक लोकांच्या संगतीनें आपल्या अंतःकरणांत असलेल्या विषयवासना अधिक वाढतात, पण संतांच्या उपदेशानें असलेल्या वासना नष्ट होतात. ( ' बैसतां संताचे संगती । कळों आलें कमळापती । आपुलीं कोणीच नव्हती । निश्चय चित्तीं दृढ झाला । तुका–४५९ ) संतांच्या कृपेनें अविद्या व तत्कार्य विषयासक्ति या दोहोंचा निःशेष नाश होतो. ( ' जयाचेनि कृपा तुषारें । परतले अविद्येचे मोहिरे । परिणमे अपारे । बोधामृते । ' अमृ. २–१५ )

**ओवी ३—पोळी**-भाजील. **ताप**–दुःख–आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक अशीं तीन प्रकारचीं दुःखें आहेत. (अ. स्प. प्र. २ पहा). मनुष्याचें ज्या वेळेस स्थूल देहाशीं तादात्म्य असतें त्या वेळेसच त्याला त्रिविध दुःखांचा अनुभव येतो. ज्या अवस्थेमध्यें शरीराशीं तादात्म्य नसतें त्या अव-

स्थेंत दुःखाचा अनुभव येत नाहीं. उदाहरणार्थ पायाला झालेलें गळूं जरी ठणकत असलें तरी झोप लागली असतां गळवाच्या वेदना होत नाहींत; याचें कारण झोपेंत शरीराशीं तादात्म्य नसतें. तात्पर्य, दुःखाला कारण आहे देह-तादात्म्य, व साधु ज्याच्यावर कृपा करतात त्याच्या ठिकाणचें देह तादात्म्य ते घालवितात. आत्मा हा ज्या वेळेस अज्ञानाला वश होऊन आपल्या मूळच्या स्वरूपाला विसरतो व शरीराशीं तादात्म्य करतो म्हणजे जीवत्वदशेला येतो त्या वेळेसच त्याला त्रिविध दुःखें भोगावीं लागतात. साधु हे देहतादात्म्य घालविण्याकरितां शिष्यास पंचकोशाचा विचार सांगतात. ( अ. स्व. प्र. २ पहा ). " अन्नमय कोश जें शरीर तें तूं नाहींस, कारण शरीराच्या मागें नाश आहे व तूं त्याचा द्रष्टा आहेस. द्रष्टा हा नेहमीं दृश्याहून वेगळा असतो. तूं शरीराला पहातोस म्हणून ' घटद्रष्टा घटाद्भिन्नः ' या न्यायानें तूं त्याच्याहून वेगळा आहेस. त्याचप्रमाणें प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय हेहि कोश तूं नाहींस; कारण हे सर्व कोश विकारी व विनाशी आहेत ( ' न त्वं देहो नेन्द्रियाणि न प्राणो न मनो न धीः । विकारित्वात् विनाशित्वात् दृश्यत्वाच्च घटो यथा । ' सदाचारानुसंधानम्–२१ ) या सर्वांचा साक्षी तूं आत्मा आहेस अत एव त्यांच्याहून तूं पृथक् आहेस." असा विचार मनांत ठसल्यामुळें ज्यानें आपला आत्मभाव पंचकोशांतून वेगळा काढून घेतला व त्याच्याशीं जो तद्रूप झाला त्याला शरीरावर येणाऱ्या दुःखाचें भान कोठून होणार? व मग त्याला ताप कसा काय पोळणार? ( सांडूनि आंगींचीं खोळी । सर्प रिगालिया पाताळीं । ते त्वचा कोण सांभाळी । तैसें जालें । ज्ञा.–१४–२१२. ' पै स्वरूप समरसें । तया ही गा जालें तैसें तेथ । कीं धर्म हें कैसें । नेणें देह । ' ज्ञा.–१४–२१४ ).

' जेणें देहत्रय निरसिलें । ज्ञानाग्निमाजी जाळिलें । अच्युतपद प्राप्त केलें । त्यांसी वेळ नाहीं ॥ ' नाथ–३०६८ ).

**शोक**—खेद–ज्या ठिकाणीं द्वैत प्रतीति आहे त्या ठिकाणीं शोक आहे. साधु उपदेश करून जीवाच्या ठिकाणची द्वैतप्रतीति घालवितात. पूर्वीं तो आपल्याला परिच्छिन्न असा साडेतीन हातांचा देहच समजत असतो. परंतु

साधु त्याला सर्व व्यापक जो परमात्मा 'तो मीच आहे' अशा व्यापक बोधावर आणतात व त्यामुळें जीवाच्या ठिकाणचा शोक नाहींसा होतो. ('तस्य कः शोकः को मोहः एकत्वमनुपश्यतः ॥' कठोपनिषत्) 'मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतः सिद्धु । जो आपणेनसी भेदु । नेणोनि जाणे ।' ज्ञा.–१५–५६२) शोक नाहींसा होण्याकरितां भगवंतांनीं

अर्जुनाला हाच उपाय सांगितला आहे. ('अर्जुना ऐसा जाणावा । हा सकलात्मकु देखावा । मग सहजें शोकु आघवा । हरेल तुझा ।' ज्ञा.–२–१५१).

**ओवी ४—योगसुख**-अष्टांग योगाने प्राप्त होणारें (समाधि) सुख. (अ. स्प. प्र. २ पहा). जो अष्टांग योगाचा अभ्यास करतो त्याला 'महासुख' म्हणजे 'ब्रह्मसुखाचा' लाभ होतो. एवढेंच नव्हे तर तो सुखरूपच होऊन जातो. ('तें अनिर्वाच्य महासुख । पैं आपणचि जाहले ते पुरुष ।' ज्ञा.–६–३२५).

एऱ्हवीं साधकानें समाधिपर्यंत जरी योगाभ्यास केला, पण श्रीगुरूची कृपा नसेल तर खरें समाधान प्राप्त होणार नाहीं; उदाहरणार्थ ज्या वेळेस मुक्ताबाईनें चांगदेवांच्या मस्तकावर हात ठेवला त्या वेळेसच त्यांना खरें समाधिसुख प्राप्त झालें. ('न लाविची मुद्रा कष्ट नाहीं अंगीं । केला राजयोगी जीवन्मुक्त ।' निळा–चांगदेव चरित्र प्र. ५–६२).

**सोहंसिद्धि**—'तो आत्मा मी आहे' असा अनुभव.–'मी देह आहे' ही वृत्ति जाऊन 'मी ब्रह्म आहे' ही वृत्ति उत्पन्न होणें फार कठीण आहे. परंतु गुरुकृपेनें ही गोष्ट सहज प्राप्त होते; जन्म देणारी आई ही मुलाचे लाड 'चेंडू, दांडू, मोर वगैरे खेळणीं' देऊन पुरविते; परंतु गुरुरूपी माउली ही 'तें ब्रह्म मी आहे' ह्या अनुभवाचे लाड आपल्या साधकरूपीं बालकाचे पुरविते म्हणजे या अनुभवाची प्राप्ति त्याला सहजगत्या करून देते.

**ओवी ५—आधारशक्तीचिया अंकीं वाढविसी**—मूलाधारचक्राच्या ठिकाणीं असलेल्या कुंडलिनीच्या मांडीवर तूं साधकास वाढवितेस. योगशास्त्रांत जीं षट्चक्रें आहेत, त्यांतील पहिलें चक्र 'आधारचक्र' म्हणजे

'मूलाधारचक्र' होय. त्यांत कुंडलिनी शक्ति निद्रित असते. पाठीच्या कण्याच्या शेवटीं व गुद व शिश्न ह्यांच्या मध्यभागीं जें ज्ञानतंतूंचें चक्र आहे, त्याला 'मूलाधारचक्र' म्हणतात. (अ. स्प. प्र. २ पहा). ह्या चक्राच्या ठिकाणीं मूळबंध किंवा वज्रासन घालतात. ह्या आसनानें अपानवायु कोंडला जातो व उष्णता उत्पन्न होते व त्यामुळें कुंडलिनी जागृत होते. ज्याप्रमाणें मुलाच्या वाढीला आईच्या मांडीपासून सुरवात होते त्याचप्रमाणे योगाभ्यासाची वाढ मूलाधार चक्रांतील कुंडलिनी जागृत करण्यापासूनच सुरू होते. गुरुकृपेनें कुंडलिनी जागृत करण्याचा अभ्यास सुलभतेनें व सहजासहजीं होतो. **हृदयाकाशपल्लकीं**—हृदयाकाशरूपा पाळण्यांत—हृदयाचें ठिकाणीं योगमार्गातील चवथें ज्ञानचक्र ज्याला 'अनाहत' चक्र म्हणतात ते आहे. ह्या अनाहत-चक्ररूपी पाळण्यांत श्रीगुरुरूपी माउली साधकरूपी बाळकास घालून निजविते. म्हणजे श्रीगुरु साधकाकडून कुंडलिनीस सुषुम्ना मार्गानें मूलाधार चक्रापासून अनाहत चक्रांत अनायासानें आणवितात.

**ओवी ६-प्रत्यक् ज्योत**--आत्मप्रकाश - प्रत्यक् म्हणजे जवळ, मागें, उलट,—व्यापक ब्रह्मचैतन्याचा जेवढा भाग अंत:करणास अधिष्ठानरूपाने आहे त्यासच साक्षी, कूटस्थ, आत्मा, त्वंपदलक्ष्य 'प्रत्यक्' इत्यादि नांवें आहेत. तेव्हां 'प्रत्यक्' म्हणजे 'आत्मा' व 'ज्योति' म्हणजे प्रकाश. आत्मप्रकाशानें ओवाळतेस म्हणजे आत्मप्रकाशाचा अनुभव आणून देतेस. योग्याला कांहीं विशिष्ट प्रकाश दिसतात.

**मनपवनांचीं खेळणीं करिसी**—मनाचीं व प्राणाचीं खेळणीं देतेस. ह्याचा अर्थ मनाचा व प्राणाचा निरोध सहजगत्या करवून घेतात.

**बाळलेणीं**—लहान मुलाचे दागिने—बिंदली, वाकी, सोन्याचा कडदोरा वगैरे—दागिना हें सौख्याचें व आनंदाचें प्रतीक आहे. श्रीगुरु हे शिष्यावर अविनाश अशा आत्मसुखाचा दागिना घालतात म्हणजे आत्मानंदाचा अनुभव आणून देतात.

**ओवी ७-सतरावी**—व्योमचक्रांतील चंद्रामृतरूपी जीवनकला—मुलें हीं कवळ बाललेण्यांनीं वाढत नसतात; एवढयाकरितां आई त्यांना स्तनपान देते.

त्याचप्रमाणें श्रीगुरुरूपी माउली मस्तिष्कांत जें सहस्रदल कमळ आहे ज्याला सहस्रादलचक्र म्हणतात त्यांतील चंद्रामृत हेंच कोणी एक दूध आपल्या साधकरूपी बालकास पाजते. त्या सहस्रदल कमळाच्या मध्यभागीं एक चंद्र आहे त्यांतून नेहमीं अमृत वाहत असतें. त्या चंद्रामृताचें तळें कुंडलिनी नांवाच्या प्राणरूप शक्तीच्या धक्यानें कानवडें होतें व त्यांतील चंद्रामृत कुंडलिनीच्या मुखात पडतें व त्यामुळें सर्व शरीरावर दिव्य कांती येते. ( 'तंव वरिले कडोनि ढाळे । चंद्रामृताचें तळें । कानवडोनि मिळे । शक्तिमुखीं ।' ज्ञा–६–२४७ 'सहस्रदळाचा मेघु । पीयूषें वर्षोनि चांगु । ज्ञा. १८–१०३९ **स्तन्य**–दूध–चंद्रामृतरूपी दूध.

**अनुहत**—अनाहत ध्वनि–योगसाधनाने ऐकू येणाऱ्या दशनादाच्यापैकीं एक नाद. कुंडलिनी सुषुम्नामार्गानें हृदयाकाशांत आली म्हणजे अनाहत ध्वनि घुमू लागतो. ह्यालाच ह्या ठिकाणीं अंगाई गीत असें म्हटलें आहे. ( 'हे असो ते कुंडली । हृदया आंतु आली । तंव अनाहताचा बोली । चावळे ते ।' ज्ञा. ६–२७४ ). ह्या अनाहत ध्वनीनें ब्रह्मस्थानाचें द्वार आपोआप उघडतें. अनाहतध्वनीच्या ठिकाणीं साधकाची वृत्ति लीन झाली म्हणजे ती पुन्हां बहिःप्रवृत्त होत नाहीं. ( अनुहातीं गुंतला नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ लागे । तुका. ३६०२ ). **हुलुर**–अंगाईगीत.

**समाधिबोधें**—समाधीच्या अनुभवानें. ( अ. स्व. प्र. २ पहा ).

**बोध**–ज्ञान **बुझाऊनि**—समजूत घालून–सविकल्प समाधीच्या बोधावर तूं साधकाला प्रथमतः आणतेस. पण ह्या स्थितींत 'अहं ब्रह्मास्मि' हें स्फुरण असतें. हें स्फुरण जरी शुद्ध सत्त्वात्मक असलें तरी निर्धर्म जी ब्रह्मस्थिति तिच्या अलीकडचें आहे. म्हणून तूं साधकाची 'समजूत घालतेस' म्हणजे उपदेश करतेस व त्याच्या ठिकाणचें 'ब्रह्माहम्' हें स्फुरण घालवितेस व त्याला आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं 'निजवितेस' म्हणजे 'स्थिर करतेस' व निर्विकल्प समाधिप्रत आणतेस. ( 'जिती अविद्या ऐसी । अन्यथा बोधातें गिवसी । तेचि यथार्थ बोधेंसी । निमालीनी उठों ।' अमृ. ३–१० 'तें ऋगशेष वाचा इया । न फेडवेचि मरोनिया । तें पायां पडोनि मियां । सोडविलें ।' अमृ–

३–१२. ' निजीं निजरूपीं निजविला तुका । अनुहतें बाळका हल्लरू गातो । तुका. ३५४७.)

**ओंवी ८—म्हणोनि—**म्हणून–आई ही मुलांच्या बाबतींत त्याला ' मांडीवर वाढविणें, अंगाईगीत गाऊन पाळण्यांत झोके देणें, अंगावर बिंदली, ताईत वगैरे दागिने घालणें ' इत्यादि गोष्टी करते त्याचप्रमाणे श्रीगुरू हे साधकाला मूलाधारचक्रस्थित कुंडलिनीशक्तीच्या मांडीवर वाढवितात, त्यास हृदयाकाशरूपी पाळण्यांत घालून झोके देतात. त्याला मनपवनरूपी खेळणीं देतात व आत्मसुखाचे दागिने घालून त्याचे सर्व कोडकौतुक पुरवितात म्हणून ज्ञानेश्वरमहाराजांनीं ह्या ठिकाणीं श्रीगुरूस माउलीची उपमा दिली आहे. याशिवाय आई ही मुलाला उदराबाहेर टाकते पण श्रीगुरुरूपी माउली ही साधकाला आपल्या उदरांत घेते म्हणजे त्याला आपल्या आत्मस्वरूपांत समाविष्ट करते; एवढ्याकरतांच नाथमहाराजांनीं जन्म देणाऱ्या आईस सावत्र आई ( कमी कल्याण करणारी म्ह. प्रेय देणारी ) म्हटलें आहे व श्रीगुरुमाउलीस सख्खी आई म्हणजे ( श्रेय देणारी ) असें म्हटलें आहे. ( ' उदराबाहेर घातल्यापाठीं । माता पुत्रस्नेहें कळवळा उठी । बाहेरिले सूनि आपल्या पोटीं । निजस्नेहें गोमटी गुरुमाता । ' ए. भा. १३–८७ ).

**पिकणें—**उत्पन्न होणें; भरभराट होणें—गुरुप्रसादाखेरीज खरी विद्या प्राप्तच होत नाहीं. गुरु हे साक्षात् ' ज्ञानाची मूर्ति ' असतात. ( ' गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्या हि शांकरी । अमृ. १–२ ) विद्या प्राप्त झाली पण गुरुप्रसाद नसेल तर ती शेवटीं उपयोगी येत नाहीं. या बाबतींत कर्णाचें उदाहरण देतां येईल. कर्ण हा परशुरामांच्याकडे ब्राह्मणाचा वेष घेऊन धनुर्विद्या शिकण्यास गेला. तो धनुर्विद्या शिकला परंतु परशुरामाचा असा पण होता कीं, क्षत्रियाला धनुर्विद्या शिकवावयाची नाहीं. एक दिवस परशुराम कर्णाच्या मांडीवर डोकें ठेवून निजले असतां इंद्र भुंग्याचें रूप घेऊन कर्णाच्या मांडीला डसला व त्यानें त्याच्या मांडीला भोंक पाडलें व त्यांतून रक्त वाहूं लागलें. तें रक्त परशुरामांच्या अंगाखालीं गेल्यामुळें ते जागे झाले

व कर्णाला म्हणाले कीं " ज्या अर्थी तू इतका वेळ मांडीसुद्धां हलविली नाहींस त्या अर्थी तूं ब्राह्मण नाहींस, तर तू कोण आहेस ते खरें सांग. " कर्ण म्हणाला, " मी क्षत्रिय आहे. " तेव्हां परशुरामांनीं त्याला शाप दिला कीं, " तूं जी धनुर्विद्या शिकला आहेस ती आयत्या वेळीं तुझ्या उपयोगास येणार नाहीं." पुढें तो जेव्हां अर्जुनावर बाण सोडूं लागला त्या वेळेस त्याच्या रथाचें चाक एकाएकीं जमिनींत खचलें.

**सारस्वत**—सर्व विद्या, वाङ्मय, साहित्य–एक वेळ व्यावहारिक ज्ञान हें स्वकष्टानें प्राप्त होऊं शकेल परंतु ब्रह्मज्ञान हें गुरुखेरीज प्राप्त होत नाहीं. ('ब्रह्मज्ञान जरी कळे उठाउठीं। तरी कां हिंपुटी वेदशास्त्रें।' तुका.–१९९६ 'सद्गुरुवीण ब्रह्मज्ञान। सर्वथा नव्हे जाण। हें उपनिषदर्थ प्रमाण। परम निर्वाण साधिलें।' ए.भा.–१०–१०७ ). **साउली**—सान्निध्य, आश्रय.

**पाउल**—चरणमुद्रा.

**ओवी ९**—**धात्रा**-निर्माता, उत्पादक, ब्रह्मदेव–गुरूचें सामर्थ्य अपूर्व असतें. ( 'तुका म्हणे आले समर्थाच्या मना। तरी होय राणा रंक त्याचा। तुका–२०२५ ) गावबा नांवाचा एक ब्राह्मणाचा मुका मुलगा होता. त्याला नाथांच्यामुळें 'वाचा' प्राप्त झाली, पुढें नाथांच्या प्रयाणसमयीं त्यांनीं गावबास बोलावून त्याच्या मस्तकीं हात ठेवला, त्याचा परिणाम असा झाला कीं त्याच्या बुद्धीचा तावडतोब विकास झाला व त्यानें पुढें नाथांच्या भावार्थरामायणाचे अपूर्ण राहिलेले युद्धकांडाचे बाकीचे अध्याय पूर्ण केले व उत्तरकांड लिहिलें. ( 'म्हणोनि समर्थ जें जें करी। तें न हो न ये चराचरीं। तुम्ही संत तयापरी। बोलवा मातें।' ज्ञा.–११–२४ ).

**ओवी १०**—**श्रीमंत**—ऐश्वर्यवान्, धनवान् ( भगवंत हे ...र्थांत श्रीमंत आहेत म्हणून भगवंताचे 'लक्ष्मीनाथ' हें नांव सार्थ आहे. ( 'आइका यश श्री औदार्य। ज्ञान वैराग्य ऐश्वर्य। हे साही गुणवर्य। वसती जेथ।' ज्ञा.–६–३७. 'म्हणोनि तो भगवंतु।' ज्ञा.–६–३८ ) अशा प्रकारचे श्रीमंत भगवंत साधूंच्या ताब्यांत असतात म्हणून संत हेहि श्रीमंतच ठरतात.

(' तुम्ही अच्युतात्मे निजनिर्धारीं । म्हणोनि देवो तुमचा आज्ञाधारी । तुम्ही म्हणा त्यातें उद्धरी । येऱ्हवीं हातीं न धरी आनातें ॥ " ए. भा.-२-७७ )

**निजजनकल्पलता**—आपल्या सेवकांच्या इच्छा पूर्ण करणारी कल्पलता—जो कल्पतरूचा आश्रय करतो त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात; त्याचप्रमाणें श्रीगुरु हेही आपल्या भक्तांच्या सर्व इच्छा पूर्ण करतात; परंतु एका दृष्टीनें संत हे कल्पतरूपेक्षा अधिक श्रेष्ठ आहेत; कारण कल्पतरु हा फक्त कल्पिलेलीच वस्तु देऊं शकतो परंतु संत हे 'अकल्पनाख्य' जी ब्रह्मवस्तु तिची प्राप्ति करून देतात. (' जयजय देव श्रीगुरो । अकल्पनाख्य कल्पतरो ।' ज्ञा.-१८-१० )

**ओवी ११—नवरस**—शृंगार, वीर, करुण, अद्‌भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र व शांत हे नऊ रस—या ओवीपासून पुढील ५-६ ओव्यांना एकप्रकारें विशेष महत्त्व आहे, कारण त्यावरून ज्ञानेश्वरमहाराज 'सद्‌ग्रंथ' कशाला म्हणतात व त्यांच्या दृष्टीने त्याचीं लक्षणे काय हें स्पष्ट होणार आहे. ज्याप्रमाणें औषध हें कडू किंवा गोड अनुपानांत दिलें जातें त्याचप्रमाणें ग्रंथ हाहि क्लिष्ट किंवा रसात्मक भाषेत लिहिला जातो. पण सद्वैद्य हा जसा नेहमीं गोड अनुपानांतून औषध देतो त्याचप्रमाणे ज्ञानेश्वरमहाराज हे सद्वैद्य असल्यामुळें त्यांनीं गीतेसारखा वेदांतांनीं भरलेला ग्रंथ लोकांच्या गळीं उतरण्याकरितां तो काव्यात्मक भाषारूपी अनुपानातून दिला आहे. असा ग्रंथ त्यांना निर्माण करावयाचा होता म्हणून ते नवरसांची व शब्दालंकारांची मागणी करतात. (' जेथ साहित्य आणि शांति । हे रेखा दिसे बोलती ।' ज्ञा. ४-२१८ ' नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्‌पथा । जे शृंगाराच्या माथा । पाय ठेविती ।' ज्ञा. १३-११५५ ).

**आगर**—तात्पर्यार्थ, स्थान, मळा,खाण. **भावार्थ**—तात्पर्यार्थ, सारांश—ज्ञानेश्वरांना आपल्या ग्रंथांत शब्दांचें नुसतें भारूड लिहावयाचें नव्हतें. त्यांना तो ग्रंथ सूत्ररूपानें व अर्थभरित अशा शब्दांत लिहावयाचा होता. (' जैसे बिंब तरी बचकें एवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें । शब्दांची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी॥' ज्ञा.४-२१५). त्यांच्या ओव्यांतून अर्थाची रेलचेल दिसते. त्यांच्या

ओव्या गूढार्थानें भरलेल्या असल्यामुळे नामदेवरायांनीं त्यांचें वर्णन असें केलें आहे. (' नामा म्हणे ग्रथ श्रेष्ठ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवावी ।' नामा–६९९ ).

**ओवी १२—साहित्य**--अलंकार–ज्ञानेश्वरांच्या ओव्यांतून उपमा व रूपकें पुष्कळ आहेत. ज्ञानेश्वरांची महत्त्वाकांक्षा मोठी होती. त्यांना ग्रंथ अंतर्बाहि उत्कृष्ट करावयाचा होता. (' फिटो विवेकाची वाणी । हो काना मनाची जिणी । देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची॥' ज्ञा.–१३–११६०. ' म्हणोनि अक्षरीं सुमेदी । उपमा श्लोक कोंदाकोंदी । झाडा देईन प्रतिपदीं । ग्रंथार्थासी । ज्ञा.–१३–११६३ )

**ओवी १३—संवाद**-प्रश्नोत्तररूप चर्चा; संभाषण; शास्त्रांची एकवाक्यता–संवादाचे महत्त्व असे आहे कीं संवादाच्यामुळें ' अव्यवहार्य ' जी ब्रह्मवस्तु ती अनुभविता येते (' आणि संवादाचेनि मिषें । जे अव्यवहारी वस्तु असे । तेचि भोगिजे की जैसे । आरिसा रूप ।' ज्ञा.–१८–८१ ) परंतु तो संवाद ' सम्यक् वाद ' असला पाहिजे. की ज्या वादांत आग्रह, छल, हेत्वाभास, वितंडवाद आणि कुभांड वगैरे दोष नसतात. **फळनिधानें**-फळाचे सांठे; फळांनीं भरलेली.

**ओवी १४—पाखांड**–नास्तिकमत, जडवादी, वेदाला न मानणारा, 'नास्तिको वेदनिंदकः' नास्तिक मतांत माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक, वैभाषिक, चार्वाक आणि दिगंबर यांचा समावेश होतो. (' पाखांड्यांनीं पाठी पुरविला दुमाला । तेथें मी विठ्ठला काय बोलों ।' तुका–६४९ ). ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात. " माझ्या ग्रंथांत नास्तिकपणा, वितंडवाद, कुतर्क हे येऊं नयेत."

**ओवी १५—श्रीकृष्णगुणीं**-श्रीकृष्णाच्या गुणांच्या ठिकाणीं-या ओवीवरून ज्ञानेश्वरांचें सगुण परमात्म्याविषयींचें प्रेम दिसून येतें. ते जरी नाथपरंपरेंतील होते तरी त्यांचा ' कृष्ण मंत्र ' होता. ( निवृत्ति गयनी कृपा केली असे पूर्ण । कुळ हें पावन कृष्णनामें । निवृत्ति–३३२ ). त्यांची श्रीकृष्णाच्या सगुणरूपाविषयींची प्रीति इतर पुष्कळ ओव्यांतून दिसून येते. (' कैसें नीलोत्पलातें रांवित । आकाशाहि रंगु लावित । तेजाची वोज दावित । इंद्रनीळा ।

ज्ञा.–११–६००. ‘मग सांवळा सकंकणु । बाहु पसरोनि दक्षिणु । ज्ञा.–१८–१४१८ ). **राणिव**—राज्य–‘श्रवणाच्या राज्यावर बसव’ म्हणजे श्रोत्यांना श्रवणसुखाची रेलचेल होऊं दे. ( ‘श्रवणसुखाच्या मांडवीं । विश्व भोगी माधवी । तैसी सासिने बरवी । वाचावल्ली ।’ ज्ञा.–१५–१४ ).

**ओवी १६—मऱ्हाठियेचिया**-मराठी भाषेच्या–या ओवीवरून ज्ञानेश्वरांचे मराठी भाषेवरील उत्कट प्रेम, अध्यात्मविद्येविषयीं तळमळ, अज्ञ लोकांविषयीं कळकळ हीं दिसून येतात. स्वतःला संस्कृत उत्तम येत असताना व त्या काळीं संस्कृत ग्रंथास विशेष मान असतांना त्यांनीं गीतेवर मराठी भाषेत टीका लिहिली ह्याचें कारण संस्कृत भाषा न येणाऱ्या लोकांना आत्मज्ञान प्राप्त व्हावें हेंच होय. ( ‘तीरे संस्कृताचीं गहने । तोडोनि मऱ्हाठिया शब्दसोपानें । रचिलीं धर्मनिधानें । श्रीनिवृत्तिदेवें ।’ ज्ञा.–११–९ ‘फिटो विवेकाची वाणी । हो काना मनाचीं जिणी । देखो आवडे तो खाणी । ब्रह्मविद्येची ।’ ज्ञा.–११–११६० ).

**ओंवी १७--आतांचि**—सांप्रत, या क्षणीच–या ओवीवरून ज्ञानेश्वरांचें ठिकाणीं स्वसामर्थ्याची जाणीव व त्याबरोबरच विनय ह्या दोन गोष्टी एकत्र कशा रहात होत्या हें दिसून येतें. कारण या ठिकाणी गुरूजवळ ते केवळ कृपेचीच मागणी करतात.

**ओंवी १८–न बोलें बहु**—फार बोलूं नकोस–इतका वेळ निवृत्तिनाथ बोलले नाहींत ह्याचा अर्थ त्यांना आपली स्तुति फार आवडत होती असें नव्हे तर गीतेला सोडून ( म्हणजे नमनांतून ) जें ज्ञानेश्वर महाराज व्याख्यान करीत तें फारच सुंदर व तत्त्वज्ञानानें परिप्लुत असें होत असें ( “ तूं संतस्तवनीं रतसी । तरी कथेचां से न करिसी । कीं निराळीं बोल देखसी । सनागर ।’ ज्ञा. ५–१४१ ).

**ओंवी १९–जी जी**–आज्ञा,आज्ञा, **साविया**-तत्काळ, तत्क्षणीं. **महाप्रसादु**-मोठी कृपा—गुरुप्रसादाचें एवढें सामर्थ्य असतें कीं त्यांना साक्षात् कष्ट करावे लागत नाहींत. नुसतें ‘सांग किंवा होईल’ एवढें म्हटलें तरी शिष्याचें कार्य सफल होतें.

**ओंवी २०—अधिराज**—सार्वभौम राजा, मुख्य—अर्जुनानें ‘ शंकरादिकांना ’ जिंकल्यामुळें ज्ञानेश्वरमहाराज त्याचें वर्णन ‘ अधिराज ’ **असें** करतात. ( ‘ तुवां संग्रामीं हरु जिंकिला । निवातकवचांचा ठावो फेडिला । पवाडा तुवां केला । गंधर्वासी । ज्ञा. २–१० )

ध्वज—पताका—अर्जुनाच्या अनेक नांवांपैकीं एक नांव ‘ विजय ’ **असें** आहे म्हणून ज्ञानेश्वरमहाराज त्या शब्दावर कोटी करून त्याचें **वर्णन** ‘ विजयध्वज ’ असे करतात. ( ‘ विजयी नामें अर्जुन विख्यातु । ’ **ज्ञा.** १८–१६४१ ).

**ओंवी २१—नवल**—आश्चर्यकारक, अपूर्व, अद्‌भुत—अर्जुनाला ‘ **विश्व**रूप ’ हें एक अद्‌भुत होतें. कारण भगवंतांनीं हे विश्वरूप कोणालाहि **आज**पर्यंत दाखविलें नव्हते. ( ‘ परि विश्वरूप हें राहविलें । न दावीच कवणा । ’ ज्ञा. ११–३५ ). याशिवाय अर्जुनाची बुद्धि आतापर्यंत द्वैतांतच **वावरत** होती पण विश्वरूपदर्शनानंतर अर्जुनाला सगळीकडे कृष्णाचींच मुखें **दिसूं** लागलीं; तीं इतकीं कीं त्यानें जरी डोळे मिटून घेतले तरीहि त्याला **तीं** तेजःपुंज व अकाळविकाळ कृष्णवदनेंच सगळीकडे दिसत होतीं. मग **त्यानें** भयभीत व्हावें यांत मुळींच आश्चर्य नाहीं. एखादा खेडवळ मनुष्य, **ज्यानें** कधींहि वीज, आगगाडी, मोटार, विमान, मोठमोठया इमारती **वगैरे** पाहिल्या नाहींत त्याला जर एकदम रात्रीच्या वेळीं मुंबईत आणून ठेवलें **तर** तो जसा गोंधळून जातो तशीच त्या अपूर्व ‘ विश्वरूप ’ दर्शनांत अर्जु**नाची** स्थिति झाली.

**ओंवी २२—वारणें**—परावृत्त करणें, प्रतिबंध करणें—अकराव्या **अध्या**यात अर्जुनानें भगवंताला विश्वरूप टाकून पुन्हा चतुर्भुज रूप धारण **करावें** अशी विनंति केली. त्यावेळीं भगवंतांनीं अर्जुनाचा निषेध केला. ( ‘ **परि** नेणसीच गांवढिया । काय कोपों आतां धनंजया । आंग सांडोनि छाया । आलिंगितासि मा । ’ ज्ञा. ११–६२९ )

**ओंवी २३—तूंचि एक**—तूच एक—सगुण म्हणजे साकार व निर्गुण **म्हणजे** निराकार हीं दोन्हीं रूपें एका परमात्म्याचींच आहेत. ( बापरखुमादे**वीवरु**

सगुण निर्गुण । रूपें विटेवरि दाविली खूण । ' ज्ञा. गा.-८० ) ' सगुण-निर्गुणाचा ठाव । विटे पाव धरियेलें । तुका-३२८७ 'दोन्ही टिपरी एकचि नाद । सगुण निर्गुण नाहीं भेद रे । ' तुका-२३६ ) ज्याप्रमाणें एकच तूप घट्ट व पातळ या दोन्हीं रूपानें असूं शकतें त्याप्रमाणें निर्गुण व सगुण या दोन्हीं रूपानें परमात्माच आहे. ( ' थिजावें कीं विघरावें । हे अप्रयोजक आघवें । घृतपण नव्हे । अनारिसें । ' अमृ. ७-२४२. ' निर्गुणाहूनि सगुण न्यून । म्हणे तो केवळ मूर्ख जाण । सगुण निर्गुण दोन्ही समान । न्यून पूर्ण असेना । ' ए. भा. ११-१४५७. ) ज्याप्रमाणे पाण्याचा बर्फ होण्याकरितां कडाक्याची थंडी पडावी लागते त्याप्रमाणें निर्गुण निराकार परमात्मा सगुण साकार होण्याकरितां तीव्र भक्ति करावी लागते. ( ' आणिला रूपाही बळें । करूनि खळें हरिदासीं ।' तुका. १९४९. ' सवें तुका मेला । त्यानें अगुणा आणिला ।' तुका. १६२. ' इतर देवांची कथा कोण । थोरला देव लांचुगा पूर्ण । तो ही न भेटे जीव घेतल्याविण । भेटल्याचे आपण गर्भवास सोसी । ' ए. भा. २-६९ ).

**योगें**-ज्ञानयोगाने अथवा हटयोगानें-' अव्यक्त ' म्हणजे ' आत्मा ' हें जीवाचें मूळचें स्वरूप आहे आत्मा हा ज्या वेळेस अज्ञानाला वश होऊन आपल्या स्वरूपाला विसरतो त्या वेळेसच तो जीवत्वदशेला येतो. वास्तविक आत्मा हा नित्य प्राप्त असतांना तो ' अप्राप्तवत् ' होतो, ह्याचे कारण स्वस्वरूपाचें अज्ञान होय. अज्ञानाचें विरोधी ज्ञान आहे म्हणूनच ज्ञानेश्वर महाराज 'अव्यक्ताची' प्राप्ति ज्ञानानें होते असे म्हणतात. शिवाय 'ब्रह्माहम्' असें जरी ज्ञान प्राप्त झालें तरी वृत्ती पुन्हां ' देहोऽहम् ' ह्यावर येत असते. ती वृत्ती स्थिर होण्याकरितां ध्यानधारणात्मक अष्टांगयोगाची जरूरी आहे. तात्पर्य, हटयोगानें किंवा ज्ञानानें अव्यक्ताची प्राप्ति होते.

**ओवी २४—दारवंठां**—उंबरठयांत, दरवाजांत, उंबरठयांनीं, दरवाजांनीं—व्यक्त व अव्यक्त असा जो तूं परमात्मा त्या तुझ्या व्यक्त स्वरूपाला पोंहच-ण्यास भक्ति हा दरवाजा आहे व अव्यक्त स्वरूपाला पोहचण्यास योग हा

दरवाजा आहे. ह्या दोहोंपैकीं कोणत्याहि दरवाजानें म्हणजे मार्गानें प्रवेश केला असतां परमात्म्याचीच प्राप्ति होते.

**ओंवी २५—वानी**—कस. **ह्यातुका**— शंभर ( भार ) वजनाला **एकदेशिया**—मर्यादित, व्यक्त. **वाल**—तीन गुंजभार वजन—कसाच्या दृष्टीनें एक सोन्याची लगड व तिच्यांतूनच वेगळें काढलेलें वालभर सोनें यांची योग्यता जरी सारखी असली तरी किंमतीच्या दृष्टीनें दोघांमध्यें फार फरक असतो. तेव्हां हा दृष्टांत व्यक्त व अव्यक्त स्वरूपाची सर्व बाबतींत एकच योग्यता आहे हे दाखविण्याच्या बाबतींत अपूर्ण म्हणजे कमी पडतो म्हणून ज्ञानेश्वर महाराज पुढच्या ओंवींत पूर्ण दृष्टांत देतात.

**ओंवी २६—थोरी**—मोठेपणा, उत्कर्ष. **लहरी**—लाट. **चुळीं**-चुळक्यांत-ज्याप्रमाणें अमरत्व देण्याच्या बाबतींत चुळकाभर अमृत व अमृताचा सागर याची योग्यता सारखीच आहे, त्याचप्रमाणें मोक्ष देण्याच्या बाबतींत मर्यादित व्यक्ताची उपासना व व्यापक अव्यक्ताची उपासना या दोन्हीहि सारख्याच फलदायी आहेत.

**ओवी २७—प्रतीति**— अनुभव-विश्वरूपाची म्हणजे अव्यक्त स्वरूपाची उपासना करून जें फल प्राप्त होतें, तेंच फल व्यक्तस्वरूपाची म्हणजे सगुण परमात्म्याची उपासना करून प्राप्त होतें, असा माझा अनुभव आहे. या दोन्ही उपासना मोक्षाचीच प्राप्ति करून देतात.

**ओवी २८— कवत्तिक**- गंमत, विनोद. **जाणावया**- समजून घेण्याकरितां;-अर्जुनाची ह्या ठिकाणची भाषा सौम्य आहे. याच्या उलट तिसऱ्या अध्यायांत अर्जुनानें भगवंतला प्रश्न विचारतांना " तुला लाज कशी वाटत नाहीं " असें म्हटलें आहे ( ' इयें लाजसीना महाघोरीं । कर्मीं सूतां ' ज्ञा. ३-३ ). येथें अर्जुन देवाला विचारतो " हे देवा, तुम्हीं क्षणभर विश्वरूप धारण केलेंत व त्याची प्रशंसा केलीत; ती माझा अनुभव व बोध काय आहे हें काढून घेण्याकरितां गमतीनें केलीत कां आपल्यामतें खरोखरच अव्यक्तरूप श्रेष्ठ आहे हें मला सांगा " असें विचारण्यांत अर्जुनानें मर्मभेदक भाषा न वापरतां आपला आशय फार मार्मिक रीतीनें व्यक्त केला आहे, यामुळें

भगवंताला संतोष वाटला असें ज्ञानेश्वरमहाराज सांगतात. ( ‘ इया किरीटी-चिया बोला । तो जगद्बंधु संतोषला । म्हणे हो प्रश्नु भला । जाणसी करूं ॥ ’ ज्ञा. १२–३४ ).

**ओवी २९—मनोधर्म**–मनाचे व्यापार, संकल्प, विकार–भक्त हे आपलें प्रेम, द्वेष, काम, क्रोध, मत्सर वगैरे अंत:करणांतील सर्व विकार भगवंताला अर्पण करून, त्याच्याशीं सर्व भावांनीं अनन्य झालेले असतात. ( ‘ संकल्प तो नाहीं दुजा । महाराजावीण तो । ’ तुका--५९२ ‘ काया वाचा मनें । तुका म्हणे दुजे नेणें । ’ तुका--७९५).

**ओवी ३०—सर्वोपरी**- सर्व प्रकारांनीं, काया वाचा मनानें ( ‘ सर्व भावें आलों तुजचि शरण । काया वाचा मनें सहित देवा । ’ तुका--६१० )

**ओवी ३१—वैखरी**-व्यावहारिक वाणी, जिच्या योगानें मनुष्य दुसऱ्याशीं बोलूं शकतो. चार वाणींतील एक वाणी. ( अ. स्प. प्र. २ पहा ). **कानडे**—दुर्बोध, कठीण–परमात्मा हा वाणीचा प्रकाशक होण्यास्तव त्या वाणी, त्याला विषय करूं शकत नाहींत म्हणजे जाणूं शकत नाहींत. ( ‘ तेवीं जेणें तेजें । वाचेसी वाच्य सुजे । ते वाचा प्रकाशिजे । हे के आहे । ’ अमृ. ५–१५. ‘ तुका म्हणे तूं ऐसा एक साचा । ऐसी तव वाचा झाली नाहीं । ’ तुका–३४८० ‘ यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ॥ तै. उ. २–४ ).

ज्या वस्तूच्या ठिकाणीं ‘ परा वाणीचा ’ सुद्धा लाग लागत नाहीं त्या वस्तूचें प्रकाशन वैखरी वाणी कशी करू शकेल ? ( ‘ जयाच्या रूप निर्धारीं । गेली परेसी वैखरी । ’ अमृ. १–४६ ‘ परहि परतें बोलणें खुंटलें । वैखरी कैरोनि सांगे । ज्ञा. गा. ७६४. ‘ कां परेसी पडे मिठी । तेथें नादा सळु नुठी । मा वावरिजेल ओंठीं । हे के आहे । ’ अमृ. ५–६३ ). **सांगडें**=सारखें–ती वस्तु ‘ अद्वितीय ’ होण्यास्तव तिच्यासारखी दुसरी वस्तु कशी सांपडणार ?

**ओवी ३२—अक्षर**–अविनाशी, ब्रह्म. **निर्देशदेशरहित**–( बोटानें ) दाखवितां न येणारी व स्थलरहित–त्या वस्तूहून दुसरें कांहीं नाहींच म्हणून तिच्या ठिकाणीं दाखविण्याचा व्यवहार होत नाहीं. ( ‘ दृश्यपणें देखिजे । का ज्ञेयत्वें

जाणिजे । अमुकें ऐसें म्हणिजे । तें जें नव्हे । ' ज्ञा. १५–३०७ ). **देश-रहित**–देशपरिच्छेदशून्य. ( अ. स्प. प्र. २ पहा ).

**ओवी ३३—येरयेरांमाजीं**–परस्परांमध्यें; ( योगी व भक्त ह्या ) दोघां-मध्यें. **योग**–आत्मयोग–अर्जुनाच्या मनांतून भगवंताला त्याचें ' व्यक्त स्वरूप' श्रेष्ठ कां ' अव्यक्त स्वरूप ' श्रेष्ठ असें विचारावयाचें होतें असें दिसतें; परंतु तसें स्पष्ट न विचारतां अर्जुन भगवंताचेच शब्द घेऊन ' मत्कर्मकृत् मत्परमो मद्भक्तः संगवर्जितः ।' गीता. ११–५५. भगवंताला त्याच्याशीं तत्पर झालेले ज्ञानी व भक्त या दोहोंपैकीं खरा ' आत्मयोग ' कोणी जाणला असें विचारतो.

**ओवी ३४—बंधु**–हितकर्ता, सोबती–जो बंधनापासून सोडवितो त्यासच ' बंधु ' म्हणणें योग्य आहे. खरा बंध हा संसारबंध होय. ह्या बंधापासून जीवाला फक्त एक श्रीगुरु किंवा परमात्माच सोडवितात. ( ' फेडितां बंध-नाचा ठावो । तूं जगद्बंधु ऐसाभावो । ' ज्ञा. १७–१० ) व्यावहारिक बंधु हे जीवाला संसारबंधनांतून सोडवूं शकत नाहींत उलट ते त्याला संसारांत अधिकच गोवतात. ( ' यमाचिया हातीं बांधोनिया देती । भूषणें हीं घेती काढोनिया । तुका. १६९० ). **भला**–चांगला–ह्या ठिकाणीं अर्जुनानें भग-वंतास प्रश्न फार मार्मिक रीतीनें विचारला आहे. प्रश्न विचारण्यासहि हुषारी लागते. ती हुषारी अर्जुनानें या ठिकाणीं चांगली दाखविली आहे; म्हणून भगवंत अर्जुनास शाबासकी देत आहेत. नाहीं तर सहाव्या अध्यायांत अर्जु-नानें भगवंताला वेड्यासारखा प्रश्न विचारला आहे. ( ' तेथ अर्जुन म्हणे अनंता । हें मज विस्मो बहु आइकतां । सांगें तया ऐसी हे योग्यता । कवणें दीजे । ' ' तंव हांसोनि श्रीकृष्ण म्हणे । तुझें नवल ना हें बोलणें । कवणासि काय दिजेल कवणे । अद्वैतीं इये ये । ' ज्ञा. ६–६६–६७ ).

**ओवी ३५--रिगालिया**--शिरला असतां. **संचरती**—जातात. भक्तीचें मुख्य लक्षण ' अनन्यता ' आहे. अन्य आश्रयांचा त्याग करून केवळ ईश्वराचाच आश्रय करणें ह्याला अनन्यता म्हणतात. ' अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता ' । ना० भ०–१० ). प्रस्तुत ओंवींत ज्ञानेश्वर महाराज भक्त हे परमात्म्याशीं कसे अनन्य असतात हें दृष्टांतानें सांगतात. सूर्याची-

किरणें सूर्याशीं अनन्य असतात. तीं सूर्याबरोबरच उगवतात व सूर्याबरोबरच अस्तास जातात. त्याला सोडून तीं वेगळीं राहात नाहींत. ('सूर्याच्या होण्या होइजे । कां सूर्यासवेंचि जाइजे । हें विकलेपण साजे । प्रभेसि जेवीं । ज्ञा.-१३-६०८ ). त्याचप्रमाणें भक्त हे केवळ भगवंताचा आश्रय करतात व त्यालाच कायावाचामनानें शरणागति करतात. ( 'शरीरवाचा मानस । पियाली कृतनिश्चयाचा कोश । एक मी वांचोनि वास । न पाहती आन । ज्ञा. १३-६०४) अनन्यतेसंबंधीं ज्ञानेश्वरमहाराजांनीं दुसरा दृष्टांत आईच्या गर्भातील मुलाचा दिला आहे. ( 'पै सर्वभावेंसीं उखितें । जे वोपिले मज चित्तें । जैसा गर्भगोळु उद्यमातें । कोणाही नेणे । ज्ञा. ९-३३५ ) भक्तांना भगवंताखेरीज दुसरा विषयच नसतो. ( 'परि तेचि भक्ति ऐसी । पर्जन्याची सुटिका जैसी । धरावांचूनि अनारिसी । गति चि नेणे ।' ज्ञा.-११-६८६ ) कितीहि संकटें प्राप्त झालीं तरी भक्त हे भगवंताची कास सोडीत नाहींत. ( 'जरि हे आकाश वर पडों पाहे । ब्रह्मगोळ भंगा जाये । वडवानळ त्रिभुवन खाये । तरी तुझीच वाट पाहें गा विठोबा ।' भानु-५७ 'मजवरी घालीं घण । परि मी न सोडीं चरण । तुका. १६६४ 'देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो । नामा-३३३.) गंधमादन हा प्रभु रामचंद्राचा एकनिष्ठ सेवक होता. कुंभकर्णानें त्याचा गळा दाबला व त्याला सांगितले "मी रामाचा नाहीं, एवढें म्हण, म्हणजे मी तुला जीवदान देतो". परंतु गंधमादनानें मरण पत्करलें पण तो "मी रामाचा नाहीं" असें म्हणाला नाहीं. भक्त हे असे 'एकविध' म्हणजे 'अनन्य' असतात, ('एकविध आम्ही न धरूं पालट । न संडुं ते वाट सांपडली । तुका-४८९)

**ओवी ३६—नीच**-नित्य, प्रतिदिनीं—या ओवींत भक्तीचें दुसरें लक्षण वर्धमानता' सांगतात. ( 'प्रतिक्षणवर्धमानम् ।' ना. भ. ५४ ). प्रेमाची जात अशी आहे कीं, ज्या वस्तुविषयीं प्रेम असतें त्या वस्तूच्या भोगांत तें प्रेम अधिकच वाढत जातें. ( 'पढियंतें सदा तेंचि । परी भोगीं नवी नवी रुचि । अमृ. १०-१३. ) यःकश्चित सामान्य व नाशिवंत भोगाविषयीं ही स्थिति दिसते मग भगवंताचें स्वरूप तर विषयापेक्षां अधिक मोहनीय आहे

म्हणून त्याची गोडी लागली असतां तद्विषयक प्रेमाची वाढ व्हावी यांत काय आश्चर्य आहे ? ( ' तरी बाप वस्तु स्वभावो । फावे तंवतंव गोडीये थांवो । ज्ञा. १५–४–४४५ ' जे विटे ना सरे । भोगितयाचेनि पवाडें पुरे । पुढती महासुखाचें सोयरें । भावंडचि । ' ज्ञा. ८–२६४. ' तप्राप्य तदेवावलोकयति तदेव शृणोति तदेव चिन्तयति । ' ना. भ. ५५ ' वीट नाहीं पांडुरंगीं । वाढे अंगीं आर्तते । ' तुका– ३६२६ ' नित्य नवा कीर्तनीं कैसा वोढवला रंग । श्रोता आणि वक्ता स्वयें जाला श्रीरंग । ' नाथ–१४४४ ). भगवंताच्या भक्तींत प्रेमाची कशी वाढ होत जाते यासंबधीं नाथांनीं दोनचार दृष्टांत दिले आहेत. ( ' का वंध्या गर्भ संभवल्या पाठीं । उल्हासें वाढवी गोरटी । तैशी माझ्या प्रेमाची पोटीं । आवडी मोठी जैं होय ' ' सदैव जांवयी आल्या घरा । जेवीं सर्वस्व वेंची सुंदरा । तेंवीं माझा कळवळा पुरा । ज्याच्या जिव्हारा वोसंडे ।' ' बीज अधिकाधिक पेरितां । उल्हास कृषीवलाचे चित्ता । तेवीं सर्वस्व मज अर्पितां । तैशी उल्हासता जैं होये । ' ' सगुण सुरूप समर्थ भर्ता । निघोन गेलिया तत्त्वतां । त्यालागीं तळमळी जेवीं कांता । तैशी कळवळता जैं उठी । ' ए. भा. १४·२४४, २४६, २४७, २४८. )

**ओवी ३७—यावा**–प्रवाह, **अनिवार**– अमर्याद, अलोट.

**पाडिभर**—भर, आधिक्य–या दृष्टांतानें भक्तीचें तिसरें लक्षण ' अनवच्छिन्नता ' म्हणजे ' सातत्य किंवा अखंडितता ' सांगतात. ( अविच्छिन्नं सूक्ष्मतरमनुभवरूपम् ' ना. भ.–५४ ) गंगा ही गंगोत्री पासूननिघून कलकत्त्याजवळ बंगालच्या उपसागराला मिळते; मिळाल्यानंतर ती मागें फिरत नाहीं. उलट मागून येणारा गंगेचा प्रवाह जोराचा असतो व तो समुद्रालाच मिळतो. त्याचप्रमाणें अनुभवानें भक्त जरी भगवंताशीं एकरूप झाले तरी पण त्यांच्या प्रेमभावाला दिवसानुदिवस अधिकच भर असतो. ( ' मिळोनि मिळतचि असे । समुद्रीं गंगाजळ जैसें । मी होऊनि मज तैसे । सर्वस्वें भजती । ज्ञा. १३–६०७. ' अखंड न खडे अभग न भंगे । तुका म्हणे गंगे मिळणी सिंधु । ' तुका–२२४३. ) भक्तीचा खरा आनंद ज्ञानोत्तर भक्तींतच प्राप्त होतो. एवढ्याकरताच साध्य भक्तीचा आरंभ हा ब्रह्मानुभवा-

पासूनच होतो असें तुकाराममहाराज म्हणतात. ( ' पावावया उपासना । ब्रह्मस्थानीं प्रस्थान । ' तुका. ३५९३ )

**ओंवी ३८—सर्वेंद्रियांसहित**—ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियांसह-डोळे, कान, नाक, रसना व त्वचा हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत व पाय, हात, जिव्हा गुद व शिश्न हीं पांच कर्मेंद्रिये आहेत. ह्यांशिवाय मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार हीं चार अंतरिंद्रिये आहेत. **सूनि**—घालून, ठेवून, लावून-सर्व इंद्रियांमध्यें मन हे प्रधान आहे. कोणत्याहि विषयाचें ज्ञान किंवा भोग होण्याकरतां मनाची आवश्यकता असते. मना पाठोपाठ, सर्व इंद्रियें आपोआप जात असतात व जी गोष्ट मनांत असते तिचेंच रूपांतर क्रियेंत होतें. (आवडे ते वृत्ती किरीटी । आधीं मनौनी उठी । मग ते वाचे दिठी । करांसि ये ।' ज्ञा. १३-२९८) भक्तांचें मन हें भगवंतांत रत झाल्याकारणानें ते भगवंताचीच कायावाचा-मनानें अखंड उपासना करतात. ( ' सकळांइद्रियां मन एक प्रधान । तें ही करी ध्यान विठोबाचें । तुका-५४५ 'मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयंतः परस्परम् । कथयंतश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च । गीता. १०-९. ' तैसेंचि मातें मिरवीं कथित । कथिनेनि तोषें कथूं विसरत । मग तया विसरामाजीं विरत । आंगे जीवें । ज्ञा. १०-१२८ ). रामकृष्णपरमहंसांची अशी गोष्ट सांग-तात कीं त्यांनीं ' श्रीकृष्ण, श्रीकृष्ण, श्रीकृष्ण ' असें तीन वेळां म्हटलें कीं त्यांना " भावसमाधि ' लागे. तुकारामबुवांचीहि अशी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. ते माळशिरस या गावीं मारुतीच्या देवळांत कीर्तनास उभे राहिले: कीर्तनाच्या आरंभीं ' रामकृष्णहरि ' म्हणतां म्हणतांच त्यांचें देहभान नाहींसें झालें व कीर्तन करण्याच्या ऐवजीं ते भजनच करीत राहिले. ( ' तुका प्रेमें नाचे गाये । गाणीयांत विरोन जाये । ' तुका. २०८८ ). गोकुळांतील गोळणींच्या ठिकाणीं अशा प्रकारचीच पराभक्ति होती म्हणूनच निळोबाराय त्यांचें वर्णन ' धन्य भाग्याच्या ' असें करतात. ( ' धन्य भाग्याच्या त्या जन्मल्या संसारीं । ज्यांचे ध्यानीं मनीं नित्य काळ हरी । करितां कामकाज दृष्टी त्याचिवरी । बोलतां चालतां जेवितां निरंतरीं वो । ' निळा. ११७३ ).

**ओंवी ३९—आपणपें**--आत्मत्व; आपणा स्वतःस-आपणा स्वतःस

भगवंताला अर्पण करणें ह्याचा अर्थ भगवंतासमोर जाऊन गळा कापणें व जीव देणें असा नव्हे तर आपल्यावरचें निरतिशय प्रेम भगवंताला अर्पण करणें असा आहे. देव हा प्रेमाचा भुकेला आहे. तो भक्ताचा भाव व प्रेम पहातो बाकी पत्रपुष्पादि उपचार हे केवळ निमित्त आहेत. ( 'पै अर्जुना माझे ठायीं । आपणेंवीण सौरसु नाहीं । मी उपचारीं कवणाही । ना कळे गा ।' ज्ञा. ९-३६७. ) भगवंताच्या प्राप्तीकरतां स्वतःचा जीव म्हणजे जीवाबरचें प्रेम हीच कोणी एक लांच, भगवंताला अर्पण करावी लागते असें एकनाथ महाराज म्हणतात. ( 'इतर देवाची कथा कोण । थोरला देव लांचुगा पूर्ण । तो ही न भेटे जीव घेतल्याविण । भेटल्याचे आपण गर्भवास सोसी ।' ए.भा. २-६९ ).

**ओवी ४०—येर**-दुसरे ( हटयोगी ) **सोहंभाव**-'तें ब्रह्म मी आहे' अशी भावना-योग्याची कुंडलिनी' म्हणजे प्राणवायुरूप शक्ति सुषुम्नामार्गानें ब्रह्मरंध्रापर्यंत आली म्हणजे ती त्या ठिकाणीं स्थिर होते. नंतर 'तें ब्रह्म मी आहे' अशा भावनेनें ती ब्रह्माशीं ऐक्य पावते. ('मग ब्रह्मरंध्रीं स्थिरावोनी । सोहंभावाच्या बाह्या पसरूनि । परमात्मलिंगा धांवोनी । आंगा घडे । ज्ञा. ६-३०५ ). **निरवयव**-अवयवरहित ( ब्रह्म )-जें परमाणूंचें बनलेलें असतें तें सावयवी असतें. ब्रह्म हें परमाणूंचें बनलेलें नाहीं म्हणून तें निरवयवी आहे. ( 'जे आकाराचें पैलतीर । जें नादाची पैल मेर । तुर्येचे माजघर । परब्रह्म जें ।' ज्ञा. १३-१०७३. 'नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ।' तुका-३७६५. ( अशा ब्रह्माला सोऽहं या भावनेनें झोंबणें किती कठीण आहे हें पुढच्या ओव्यांतून सांगतात ).

**ओवी ४१—नखी**-नख, घर, पकड-मन हें अपंचीकृत पंचमहाभूतांच्या मिलित रजांशापासून झाल्यामुळे तें अतिशय चंचल व चपल आहे. म्हणून ज्या ठिकाणीं इंद्रियें पोचूं शकत नाहींत त्या ठिकाणींहि मन जाऊं शकतें. मन हें वाटेल त्याविषयीं संकल्प करूं शकतें व क्षणांत प्रतिसृष्टि निर्माण करतें व मोडूं शकतें ( 'संकल्पे सृष्टी घडी । सवेंचि विकल्पूनि मोडी मनोरथांच्या उतरंडी उतरी रची ।' ज्ञा.-१३-११४ ). अशा प्रका-

रचें बलवत्तर जें मन त्याच्या ठिकाणीं जी सकल्पविकल्प करण्याची शक्ति आहे ती ब्रह्माची आहे. ब्रह्मच त्याचें प्रकाशन करतें म्हणून तें ब्रह्माविषयीं संकल्प करूं शकत नाहीं; कारण प्रकाश्य हें प्रकाशकाचें द्योतन करूं शकत नाहीं. ( 'बुद्धि बोध्या सोके । ते येवढी वस्तु चुके । मना संकल्प निके । याहीहूनि ।' अमृ.-७-११० 'जे मनाचे मन । जें नेत्राचे नयन । कानाचे कान । वाचेची वाचा ।' ज्ञा.-१३-९२९.' 'यन्मनसा न मनुते येना हुर्मतो मतम् ।' केन. उ.-१-५ ). **दृष्टी**-पोंच, जाणीव, वृत्ति, नजर-जेथें जेथें जाणण्याची क्रिया असते ते तें कर्मबुद्धीचे असतें. ( 'मग सर्वत्र जे जाणतें । तें बुद्धीचें कर्म निरुतें । ज्ञा.-५-६० ) बुद्धि ही शुद्धसत्त्वाची होण्यास्तव तिच्या ठिकाणी परावर्तन करण्याची शक्ति आहे. ती कांचेसारखी आहे. कांच ही कंदीलातील प्रकाशाचे परावर्तन करते पण प्रकाश हा कांचेचा नसून तो कंदीलांतील वातीचा असतो. त्याचप्रमाणें बुद्धींतील प्रकाश हा आत्म्याचा प्रकाश आहे. ती केवळ त्या प्रकाशाचे परावर्तन करते म्हणूनच प्रकाश्य बुद्धि ती प्रकाशक जो आत्मा त्याला जाणूं शकत नाहीं 'विज्ञातारमरे केन विजानीयात्' कठ. उ. २, ४, १४.

आतां ( 'मनसैवेदमाप्तव्यम्' कठ-उ-२-१-११ ) वगैरे वचनें श्रुतींत आढळतात पण त्याचा अर्थ मन किंवा बुद्धि आत्म्याला साक्षात् जाणूं शकतात असा नव्हे तर ती त्याला अज्ञान-आवरणभंगद्वारा जाणूं शकतात असा आहे. आत्मा हा स्वयंप्रकाश होण्यास्तव त्याला जाणण्याकरतां फक्त वृत्तिव्याप्तीची जरूरी लागते, फलव्याप्तीची जरूरी लागत नाहीं. बुद्धीनें आत्मा जाणला जातो असें म्हटलें तर आत्मा जड ठरेल. ( अ. स्प. प्र. २ पहा. ) **जोगें**- योग्य, जोगते, गम्य-ज्या ठिकाणीं हत्ती बुडतो त्या ठिकाणीं शेळीचा काय पाड लागणार ? याच न्यायानें जेथें मन व बुद्धि पोहोंचूं शकत नाहींत ती वस्तु इंद्रियांना कशी काय गम्य होणार ? इंद्रियांची शक्ति ही मर्यादित असते. जें इंद्रिय ज्या भूताच्या सत्त्वगुणापासून निर्माण झालेलें असतें तें इंद्रिय फक्त त्या भूताच्या गुणालाच जाणूं शकतें. आकाशाच्या सत्वगुणाच्या अर्ध्या भागापासून कान झाले म्हणून ते कान

आकाशाचा जो गुण शब्द त्यालाच फक्त जाणूं शकतात. स्पर्श, रूप, रस वगैरे विषयांना ते जाणूं शकत नाहींत. तसेंच इतर इंद्रियांचें समजावें. आत्मा हा जर 'शब्दादि' पंच विषयांपैकीं असता तर तो इंद्रियांना जाणतां आला असता. परंतु आत्मा हा ('अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगन्धवच्चयत्' कट. उ. १-३-१५) असा आहे म्हणून तो इंद्रियांना गोचर होत नाहीं. ('म्हणोनि तेथिंची मातु। न चढेचि बोलाचा हातु' ज्ञा. ६-३११ 'जे शब्दातीत स्वभावें' ज्ञा. ५-६८ 'न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मनो न विद्मो न विजानीमो।' केन. उ. १ ३).

**ओंवी ४२—कुवाडें**—कठीण, अगम्य—ब्रह्म हें व्यापक होण्यास्तव त्याचें ध्यान होऊं शकत नाहीं. ध्यान हे नेहमीं परिच्छिन्न वस्तूचेंच होऊं शकतें. ('जो ध्यानें सूये मानसीं। तयालागीं नाहीं तूं त्याचे देशीं। ध्यानहि विसरे तेणेंसी। वालभ तुज।' ज्ञा. १७-१३ 'जरी तूंचि म्हणो आघवें। तरि चिंतनचि न घडे। ज्ञा. १०-१८७). **व्यक्तीसि—व्यक्ती**—प्रगटता, आविष्कार. **माजिवडें**—मध्यें असणारें, अंतर्गत.

**ओंवी४३--सर्वत्र**—सर्व ठिकाणीं—ब्रह्माच्या ठिकाणीं 'देशपरिच्छेद नाहीं.' ('स्थूलस्थावरजंगम व्यापूनि राहिला अकळ' ज्ञा. गा. ३५). **सर्वकाळीं**—सर्वकाळांत—ब्रह्माच्या ठिकाणीं 'कालपरिच्छेद' नाहीं. ('आघवांचि देशीं काळीं। ज्ञा. १३-८७३) **सर्वपणें**—सर्वरूपानें—ब्रह्माच्या ठिकाणीं 'वस्तु-परिच्छेद' नाहीं. (ऐसें सर्वरूपरूपसें। सर्व दृष्टिडोळसें। सर्वदेशनिवासें। बोलिलें श्रीकृष्णें। ज्ञा. १८-१४१७.) (अ. स्प. प्र. २ पहा). **चिंतवणें**-चिंतनसामर्थ्य. **हिंपुटी—कष्टी**, खिन्न, लज्जित.

**ओंवी ४४—होय ना**—उत्पन्न होत नाहीं—ब्रह्म उत्पन्न होतें म्हणजे जन्मतें असें मानलें तर 'आत्माश्रय, अन्योन्याश्रय, चक्रकापत्ति, अनवस्था, विनिगमनविरह व प्राग्लोप' असे सहा दोष येतात. ('आणि आकाराचेनि जालेपणें। जन्मधर्मातें नेणें। आकारलोपीं निमणें। नाहीं कहीं।' ज्ञा. ८-१८ 'सृष्टीचा होणा न रचे। सर्वसंहारें न वेंचे। आथी नाथी या दोहींचें। पंचत्व तो' ज्ञा. १३-१११२.

**नोहे [ ना ]**—नाश पावत नाहीं.—जें जन्माला येतें त्याच्याच मागें नाश असतो. ( ‘ उपजे तें नाशे । ’ ज्ञा–२–१५९ ) ब्रह्माचे ठिकाणीं जन्म नाहीं म्हणून नाश नाहीं. शिवाय ब्रह्माचा नाश होण्याकरतां त्याच्याहून कोणी तरी वेगळें असलें पाहिजे. पण सर्व ठिकाणीं व सर्व रूपानें ब्रह्मच, एकच एक असल्यामुळें त्याचा नाश संभवत नाहीं. ( ‘ नैनं छिंदन्ति शस्त्राणि । ’ गीता–२–२३ )

**नाहीं ना**—नाहीं असे नाहीं. ब्रह्म नाहींच असे म्हणावे तर जे दिसत आहे भासत आहे त्याला आधार कोण ? असद्वस्तूला नेहमीं सदधिष्ठान लागतें म्हणून ब्रह्म नाहीं असें म्हणतां येत नाहीं. ( ‘ तेवीं समूळ अविद्या खाये ! तें ज्ञानही जैं बुडोनि जाये । तऱ्ही जें नाहीं कीर नोहे । आणि न साहे असणें ही । ’ ज्ञा–१५–४४० ‘ जें नाहीं म्हणो जाइजे । तंव विश्वाकारें देखिजे । ज्ञा–१३–८६८ ‘ प्रमेय परिच्छेदें । प्रमाणत्व नांदे । तें कायी स्वतःसिद्धे । वस्तूच्या ठायीं ! ’ अमृ–५–१७ ).

**आहे ना**— आहे असें नाहीं. ब्रह्म आहे असे म्हणावे तर तें मनबुध्यादि इंद्रियांना गोचर व्हावयास पाहिजे पण ते तसे होत नाहीं, म्हणून त्याला आहे असें म्हणतां येत नाहीं. बरें, विश्वच परमात्मा आहे असें म्हणावें तर त्याच्यामागें नाश आहे ( ‘ आणि विश्वचि ऐसें म्हणिजे । तरि हे माया । ’ ज्ञा–१३–८६८ ) म्हणून ब्रह्म हें सत् असत् विलक्षण अनिवर्चनीय पण सत् आहे. त्याच्या उलट प्रपंच हा सत्असत् विलक्षण अनिर्वचनीय पण असत्, आहे.

**ओंवी ४५—चळे ना ढळे ( ना )**—हालत नाहीं व सरत नाहीं. सरण्यास किंवा हालण्यास थोडा तरी अवकाश लागतो. पण ब्रह्म हें सर्वच ठिकाणीं, आंतबाहेर, खालींवर कोंडून भरलें असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं सरणें व हालणें या क्रिया संभवत नाहींत. ( ‘ बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च । ’ गीता १३–१५ ‘ जें एक आंतुबाहेरी । जें एक जवळ दुरी । जें एक वांचूनि परी । दुजी नाहीं । ज्ञा. १३–९१४. ) सरणें, हालणें या क्रिया परिछिन्न वस्तुच्याच ठिकाणीं संभवतात; व्यापकाच्या ठिकाणीं संभवत

नाहींत. उदाहरणार्थ आकाश हे व्यापक होण्यास्तव त्याच्या ठिकाणीं सरणें व हालणें या क्रिया संभवत नाहींत. ( ‘ जैसें येथूनि परुहां जाणें । आकाशा नाहीं । ’ ज्ञा. १५–३०० ) ब्रह्म हें आकाशाचें कारण होण्यास्तव तें त्याच्यापेक्षां अधिक व्यापक आहे म्हणून ब्रह्माचें ठिकाणीं हालणें चालणें या क्रिया संभवणें शक्य नाहीं. **सरे ना**–संपत नाहीं–सर्व जगताला व्यापून ब्रह्म हें शिल्लकच राहातें एवढें ते व्यापक आहे. ( ‘ सर्वमावृत्य तिष्ठति । ’ गीता. १३–११ ‘ अत्यातिष्ठद्दशांगुलम् । ’ पुरुषसूक्त )

**मैळे ना**— मळत नाहीं, गुणदोषांनीं लिप्त होत नाहीं.–ज्याप्रमाणें आकाश हें सर्व उपाधींना व्यापून असतें परंतु त्या उपाधींच्या गुणदोषांनीं लिप्त होत नाहीं, त्याचप्रमाणें सर्व पदार्थांना ब्रह्म हें जरी अधिष्ठान असलें तरी तें पदार्थांच्या गुणदोषांनीं लिप्त होत नाहीं. ( ‘ तैसा सर्वत्र सर्व देहीं । आत्मा असतुचि असे पाहीं । परी संगदोषें एकेंही । लिप्त नोहे । ज्ञा. १३–११२० **बळें**–सामर्थ्यानें–कोणच्या बळानें म्हणजे साधनानें अव्यक्तोपासक अव्यक्ताची प्राप्ति करून घेतात हें पुढच्या ओव्यांतून सांगतात. ( आपुलेनि पुरुषार्थें जिंकिला संसार केला मदमत्सर देशोधडी ॥ नामा. ६२० **आंगविलें**– स्वाधीन करून घेतलें.

**ओवी ४६— पैं**– पादपूरणार्थक अव्यय. **वैराग्य महापावकें**–वैराग्यरूप मोठ्या अग्नीनें–या ठिकाणीं जिज्ञासा वैराग्याला ‘ महापावक ’ म्हटलें आहे. ( अ. स्प. प्र. २ पहा. )

**अधपलीं**— होरपळलेलीं. आत्मनात्म विवेकानें विषय हे दुःखरूप व अनित्य आहेत असें साधकाला पटतें. मग तो सात्विक धैर्यानें इंद्रियांना विषयांपासून आवरीत असतो. अशा प्रकारें इंद्रियांची व विषयांची ताटातूट करण्यांत म्हणजेच इंद्रियनिग्रह करण्यांत साधकाला फार दुःख होत असतें. किती दुःख होतें याची कल्पना येण्याकरितां ज्ञानेश्वरांनीं चारपांच दृष्टांत देऊन शेवटीं युगांता इतकें दुःख होतें असें म्हटलें आहे ( ‘ जें सारसांही विघडतां । होय वोहावूनि वत्स काढितां । नव्हे भणंगु दवडितां । भाणया वरूनी ॥ ’ ‘ पैं मायेपुढौनि बालक । काळें नेता एकुलतें एक । होय कां

उदक । तुटतां मीना । ' ' तैसें विषयांचें घर । इंद्रिया सांडिता थोर । युगांतु होय तें वीर । विरागु साहाती । ' ज्ञा.–१८–७८५–७८७. ) जोंपर्यंत मनाला आत्मानुभवाचे सुख प्राप्त होत नाहीं तोंपर्यंत इंद्रियें शांत होत नाहींत. तीं यमनियमांच्या द्वारें विषयांपासून आवरलीं असल्यामुळें तीं सारखी तडफडत असतात. म्हणून ज्ञानेश्वरमहाराजांनीं ह्या ठिकाणीं इंद्रियांना ' अधपलीं ' असें विशेषण लावलें आहे. जाळूनि—जाळून.–साधक विषयांना जाळतो याचा अर्थ तो बायका, पोरें, घरदार, जाळतो असा नव्हे; कारण ह्या ठिकाणीं व्यावहारिक अग्नि असें पद घातलेलें नसून वैराग्यरूपी अग्नि असें पद घातले आहे. विषयापेक्षां विषयासंबंधीं अंतःकरणांत असलेलें जे प्रेम तेंच बाधक असतें. साधक हा अशा प्रेमाचा त्याग करतो. ( ' असक्तबुद्धिः सर्वत्र । ' गीता १८–४९ ' पुत्र वित्त कलत्र । हे जालियाही स्वतंत्र । माझे न म्हणे पात्र । विषाचें जैसें । ज्ञा.–१८–९५८. ) दुःखाला कारण स्नेह आहे व त्या स्नेहाला जाळणारें वैराग्य आहे म्हणून याठिकाणीं वैराग्याला अग्निची उपमा दिली आहे. ( ' तैसा वियोग जेणें दुःखें । विपत्ति शोक पोखें । तें स्नेह सांडूनि सुखें । उदासु होय ॥ ' ज्ञा. १३–५८९. ) साधक हा विषयांपासून इंद्रियें आवरीत असतांना विषय हे पुनः पुनः त्याला आपणाकडे ओढतात. अशाप्रकारें विषय हे धांव घालणारे आहेत म्हणून ज्ञानेश्वरांनीं विषयांच्यावर सैन्याचें रूपक केलें आहे. विषयांच्या ठिकाणीं स्वाभाविकच आकर्षता आहे. ( ' आणि शब्दादिक सहावे । सहज रंगे इवावे । ज्ञा. १५–१६१ ) म्हणूनच ते इंद्रियांना आपल्याकडे ओढूं शकतात. ' विशिनोति बध्नाति इति विषयः ' । ' बांधणारे ते विषय ' अशीच त्यांची व्याख्या आहे. साधकानें इंद्रियांना विषयांपासून आवरण्याचा जरी प्रयत्न केला तरी ह्या विषयांची इंद्रियांना एवढी आकर्षता असते कीं तीं इंद्रियें साधकाला पुन्हा विषयांच्याकडे खेचून नेतात. (' जयातें अभ्यासाची घरटी । यमनियमांची ताटी । जे मनातें सदा मुठी । धरूनि आहाती । ' ' तेही किजती कासाविसी । या इंद्रियांचीं प्रौढी ऐसी । जैसी मंत्रज्ञातें विवसी । भुलवी कां । ज्ञा.–२–३११, ३१२ ). साधकानें विषयांचा जरि त्याग केला

तरी तेच विषय अन्य वेष धारण करून पुन्हां साधकावर स्वारी करतात. साधकानें घराचा त्याग केला तर त्याच्याऐवजीं तो मठ बांधतो. बायका पोरांचा त्याग केला तर शिष्यशिष्यीणी गोळा करतो. ( 'शिष्यशास्त्रादि-विलासें । मठादिमुद्रेचेनि मिषें । घातले आहाती फांसे । निसंगा जेणें ।' ज्ञा.-१८-१०६४ ) निदान ऋद्धिसिद्धीच्या मिषानें तरी विषय हे साधकावर हल्ला करतातच. ( 'देखें विषय हे तैसे । पावती ऋद्धिसिद्धीचेनि मिषें । मग आकळिती स्पर्शें ।' इद्रियांचेनी । ज्ञा.-२-३१३ ). एक एक विषय एक एक इंद्रियाला आपणाकडे ओढतो व जीवाला आपलें सेवन करावयास लावून शवटीं त्याचा घात करतो. 'जिह्वैकतोऽमुमपकर्षति कर्हि तर्षा शिश्नोऽन्यतस्त्वगुदरं श्रवणं कुतश्चित् । घ्राणोऽन्यतश्चपलदृक् क्व च कर्मशक्तिर्बह्व्यः सपत्न्य इव गेहपतिं लुनन्ति ।' ए. भा.-९-श्लो. २७ 'जिव्हा रसाकडे ओढी ।' ए. भा.-९-३१५-१८ ). शब्द विषयानें हरिणाचा; स्पर्शानें हत्तीचा, रूपानें ( म्ह० तेजानें ) पतंगाचा, रसानें माशाचा व गंधानें भुंग्याचा घात केलेला आहे. ( 'स्पर्शें मातंग । दीप्तीं पतग । नादें मृग । घ्राणें भृग । रसनें मीन ।' ज्ञा. गा.-५०५ ) म्हणून विषय हे फार घातक आहेत. ( 'कां जे विषय पांच आहेती । ते अवश्य साधक नाडिती । म्हणोनि लागों नेदी प्रीति । कवणे रीतीं ऐक पां । ए. चि. ११ ) या विषयांनीं इंद्रादि देव, विश्वामित्रासारखे तपी व नारदासारखे महान् साधु ह्यांच्यावर हल्ला करावयास सोडलें नाहीं ( 'इंद्रचंद्रकु क्यां क्यां भया । है सबकु मालुम हैजी । नारद कीं तो भयीं नारदी ऐसी नौबद गाजी'। कबीर ) अशा प्रकारें विषय हे बलाढय आहेत.

**धरिलीं**—धरून ठेवलीं; आवरून धरलीं, पकडलीं.

**ओवी ४७—संयम-निग्रह**—ह्या ठिकाणीं 'संयम' याचा अर्थ 'धारणा ध्यान समाधि' असा अभिप्रेत नाहीं तर 'यमनियम' असा आहे. **यम पांच आहेत**-अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह. त्याचप्रमाणें **नियम 'हि पांच आहेत-शौच** संतोष, तप, स्वाध्याय व ईश्वरप्रणिधान. ( **अ.** स्प. प्र. २ पद्दा ) पंच ज्ञानेंद्रियांच्या द्वारें बाहेर विषयांकडे धांव घेणारी वृत्ति

अंतर्मुख करण्याकरितां या यमनियमांचा उपयोग होतो. ( ' एहींचि पांचै द्वारीं । ज्ञानासि धांव बाहेरी । जैसा कां हिरवे चारीं । भांबावे पशु । ' ज्ञा.-१३-११८ ) आत्मा हा हृदयांत होण्यास्तव त्याची भेट होण्याकरितां अंतः-करण-वृत्ति ही अंतर्मुख करणें अवश्य असते. ( तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्वसुखाचा आरामु । कीं भ्रांतासि कामु । विषयावरी ज्ञा.-९-६० ) ती वृत्ति अंतर्मुख होण्याचा उपाय म्हणजे इंद्रियांना ' संयमाचा ' म्हणजे निग्रहाचा पाश लावणें हाच होय. ( ' परी हें तरीच घडे । जरी संयमाचीं अखंडें । सर्वद्वारीं कवाडें । कळासती । ' ज्ञा.-८-११२ ). **घाटी**-फांस, पाश, धाड. **मुरडिली**-वळवली. **उफराटी**-उलट, मागें.

**ओवी ४८—अपानींचिया**-गुदद्वाराच्या. **कवाडा**-द्वाराला. अपानवायु हा गुदस्थानीं राहतो. **वायु पांच आहेत**-प्राण, अपान, समान उदान व व्यान व त्यांची स्थानें-हृदय, गुद, नाभि कंठ व सर्व शरीर अशीं आहेत. योगामध्यें अपानवायु व ऊर्ध्ववायु ( प्राणवायु ) ह्यांचा निरोध करावा लागतो. गुदद्वारास ' मूळबंध दिला असतां अधोगामी जो अपानवायु तो कोंडला जातो.' **मुद्रा**-फळी, खिटी.

**आसनमुद्रा** = सिद्धासनरूपी फळी. **मूलबंध**-गुद व शिश्न यांमध्यें चार बोटें जागा आहे. त्यांपैकीं दीड बोट वर व दीड बोट खालीं जागा सोडून मध्यें जी एक बोट जागा राहते, तेथें उजव्या पायाच्या टाचेच्या वरच्या बाजूनें शिवण दाबणें व उजव्या पायावर डावा पाय बसविणें. नंतर थोड्या प्रमाणांत पाठीचा खालचा भाग उचलून दोन्ही घोटे उचलून धरणें व भुवईमध्यें दृष्टि ठेवून स्थाणुप्रमाणें शरीराची सरळ आणि निश्चल स्थिति करणें; याला ' मूल-बंध ' म्हणतात. ( ' गुदमेढ्रा आंतौतीं । चारी अंगुळें निगुती । ' ज्ञा-६-१९५ ते १९८ ) **सुहाडा** = सुज्ञा, मित्रा, **हुडा** - बुरूज. **पन्नासिला** = सज्ज केला; रचिला.

**ओवी ४९—आशेचे लाग तोडिले—**आशेचे संबंध तोडले-आशेच्या द्वारानें विषय हे वासनारूपानें अंतःकरणांत प्रवेश करतात. आत्मप्राप्तीकरितां आशा, इच्छा व वासनांचा नाश करावा लागतो. ( ' तुका म्हणे जरी

योगाची तातडी । आशेची बीबुडी करीं आधीं । तुका-२४६६ ' देव पहावया करीं वो सायास । न धरीं हे आस नाशिवंत । ' तुका-४०३८.) **अधैर्याचें**-भित्रेपणाचें. **कडे**-घसरण्याच्या जागा. **झाडिले**-साफ केले. **ढासळून दिले**, लोटून दिले.-मूळबंधानें अपानवायु कोंडला असतां तो ऊर्ध्वगतीनें माघारीं फिरून कोठ्यांत प्रवेश करतो व तेथें असलेले कफ आणि पित्त यांचा नाश करतो. त्यामुळें आरंभीं योग्याला रोगादिक क्लेश होतात. अशा क्लेशांना योगी हा धैर्यानें तोंड देत असतो. (' नाडीतें सोडवी । गात्रांतें विघडवी । साधकातें भेडसावी । परि बिहावें ना । ' ज्ञा.-६-२१९ ) म्हणूनच अधैर्यरूपी घसरण्याच्या जागा मोडून टाकल्या म्हणजे भीति नाहींशी केली असें ज्ञानेश्वरमहाराज वर्णन करतात. **काळवखें**—काळोख, अंधार. **शोधिलें**—नष्ट केला निद्रेचा काळोख म्हणजे पगडा नाहींसा केला. ( लोलुपता काय निद्रेसी जिंकावें । भोजन करावें परिमित ॥ तुका-२४६३ )

**ओवी २०—वज्राग्नीचिया ज्वाळीं**-वज्रासन घातल्यामुळें जी उष्णता उत्पन्न झाली तिच्या ज्वाळानें म्हणजे आंचीनें-वज्रासनाची उष्णता कुंडलिनी शक्तीला जागी करते व नंतर ती कुंडलिनी शरीरांतील सप्तधातु पिऊन टाकते म्हणजे जाळून टाकते. त्यामुळें प्रथम शरीर अगदीं कोरडें व कृश होतें. **सप्तधातु**-रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व रेत इत्यादि सात धातु. **सिसाळीं**-मुंडक्यांनीं-**शिस**-शिर, डोकें, **आळि**-रांग, ओळ. **यन्त्रें**-( प्राणायामरूपी ) तोफा-प्राण ( ऊर्ध्ववायु ) व अपान ( अधोवायु ) यांचा निरोध केला असतां पहिल्यांदा पोटांतील कुचकी घाण बाहेर पडूं लागते व शरीर शुद्ध होऊं लागतें. त्यामुळें प्रथमतः रोग उत्पन्न होतात; परंतु ते लगेच नाहींसे होऊन शरीर स्वच्छ व व्याधिरहित होतें. एवढ्याकरतांच ह्या ठिकाणीं प्राण-अपानरूपी तोफांची रोगरूपी मुंडक्यांनीं पूजा केली असें रूपक केलें आहे.

**ओवी २१—टेंभा**-मशाल, कांकडा. **आधारीं**-मूलाधार चक्रावर-वज्रासनाच्या उष्णतेनें जागृत झालेली कुंडलिनी शक्ति नाभिस्थानावरील कंदावर उभी राहते. **चोजवलें**-जाणवलें, पोहचविलें. **प्रभा चोजवले**-प्रकाशाला

( ब्रह्मरंध्रापर्यंत ) पोहचविलें. म्हणजे कुंडलिनीच्या प्रकाशाने सुषुम्नेचा मार्ग मूलाधार चक्रापासून तों ब्रह्मरंध्रापर्यंत समजून आला. **निमथावरी**–मस्तका-पर्यंत म्हणजे ब्रह्मरंध्रापर्यंत.

**ओवी ५२—नवद्वारांचिया**–नऊ द्वारांच्या–दोन डोळ्यांची, दोन कानाची दोन नाकाची, एक तोंडाचे एक गुदद्वाराचे व एक मूत्रद्वाराचे अशीं मनुष्य शरीराला नऊ द्वारें म्हणजे नऊ छिद्रें आहेत. अशा नऊ द्वारांच्या. **चौचकीं**-दरवाज्यावर. **संयतीची**-निग्रहाची. **आडवंकी**–अडसर. **ककारांत** सुषुम्नानाडी. **खिडकी उघडली**–मुख उघडण्यात आले–शरीराची सर्व द्वारें बंद केल्यामुळे अपानवायु व ऊर्ध्ववायु कोंडले जातात त्यामुळे सुषुम्नेचें द्वार खुले होतें.

**ओवी ५३—चामुंडा**–चामुडा ( नावाची ) देवी. या ओवीत प्राणशक्ति जी कुंडलिनी, तिच्यावर चामुडा देवीचें रूपक केले आहे. देवीला मेढ्यांचा व रेड्यांचा बळी दिला असतां ती संतुष्ट होते. या ठिकाणीं कुंडलिनी चामुंडा-देवीला संकल्परूपी मेंढे व मनोरूपी रेडा यांच्या शिराचे बळी दिले आहेत. ह्याचा अर्थ कुंडलिनी शक्ति जागृत झाली असतां कल्पना नाहींशा होतात व मनाची बाह्य विषयांकडची धांव थांबून मनाचा लय होतो.

**ओवी ५४—चंद्रसूर्या**–इडा पिंगला–इडेला 'चंद्र' व पिंगलेला 'सूर्य' अशीं दुसरीं नांवे आहेत.

**बुझावणी**—ऐक्य–ज्या वेळेस कुंडलिनी नांवाची प्राणशक्ति शरीरातील पृथ्वीचा व पाण्याचा अंश खाते त्यावेळेस इडापिंगळांतून वाहणारे वायु एकत्रित होतात व सर्व प्राणवायु फक्त सुषुम्ना मार्गाने वर जाऊ लागतो त्यामुळें ह्या दोन नाड्यांची ऐक्यता सुषुम्नेत होते. ( इडा पिंगळा एकवटती। ज्ञा. ६–२४४ )

**अनुहताची सुडावणी करूनि**—अनाहत ध्वनीचा गजर करून–कुंडलिनी नांवाची प्राणरूप शक्ति हृदयाकाशांत म्हणजे अनाहत चक्राजवळ आली म्हणजे योग्याला दहा प्रकारचे ॐकारात्मक ध्वनि ऐकूं येतात. ह्या नादानांच अनाहत ध्वनि म्हणतात. **सतरावियेचें पाणी**–व्योम चक्रांतील

चंद्रामृतरूपी पाणी—योगमतें भ्रुकुटीमध्यावर चंद्रामृताचें तळें आहे, तें कुंडलिनीच्या धक्क्यानें कलथें होतें व मग त्यांतील अमृत कुंडलिनीच्या मुखांत पडतें व त्यामुळें शरीराला दिव्यकांति प्राप्त होते. ( तंव वरिलेकडोनि ढाळें । चंद्रामृताचें तळें । कानवडोनि मिळे । शक्तिमुखीं ॥ ज्ञा. ६–२४७ ).

**ओवी ५५—मध्यमामध्य विवरें**-सुषुम्नानाडीच्या मध्यांतील पोकळीनें. **कोरिवें**-खोदलेल्या कोरलेल्या. **चवरें**-शिखर, शेवटचें ठिकाण. **ब्रह्मरंध्र**-चिदाकाशांत असणारें सुषुम्नेचें शेवटचें छिद्र, त्याला ब्रह्मरंध्र म्हणतात.

**ओवी ५६—मकारांत सोपान**-मकारांतरूपानें असलेला जिना. कुंडलिनी शक्ति हृदयाकाशांत म्हणजे अनाहत चक्राजवळ आली म्हणजे प्रथमतः ॐकारध्वनि ऐकूं येऊं लागतो. ह्या ओंकारध्वनीच्या 'अ, उ, म' अशा तीन मात्रा आहेत. ओंकाररूपानें प्रतीत होणारे दशनाद, हे, कुंडलिनी अनाहत चक्रापासून ब्रह्मरंध्रापर्यंत म्हणजे चिदाकाशांत प्रवेश करीपर्यंत ऐकूं येतात. चिदाकाशांत जाण्याचा हा तीन मात्रांचा जणू काय जिनाच आहे. जसजशी कुंडलिनी अनाहत चक्रापासून आज्ञाचक्रांतून ब्रह्मरंध्रापर्यंत येते तसतसा, 'अ, उ, म' या मात्रांचा ध्वनि लोपत जातो. शेवटीं चिदाकाशांत शिरतांना 'मकार' ध्वनीचाहि लोप होतो. **गगन काखेसूनियां**-मूर्ध्न्याकाशाला काखेंत मारून म्ह. आकाशाचाहि लय करून. **ब्रह्मीं भरले**-ब्रह्मांत शिरतात म्हणजे ब्रह्मरूप होतात.

**ओवी ५७—ऐसेनि**-अशा प्रकारें, ह्या मार्गानें **समबुद्धि**-प्राणापानाची समता करून समबुद्धि ( ब्रह्मबुद्धि ) झालेले. **गिळावया**-गिळंकृत करण्याकरितां, पचनीं पाडण्याकरिता. **सोहंसिद्धि**- 'तें ब्रह्म मी आहे' हा अनुभव. **योगदुर्गें**-योगमार्गांतील बिकट किल्ले–( वेगवेगळ्या पायऱ्या ).

**ओवी ५८—साटोवाटी**-अदलाबदलीनें, मोबदल्यानें; **आपुलिया**-आपल्या ( म्ह. जीव देऊन ). **शून्य**-अव्यक्त, ( ब्रह्म ). **उठाउठी**-ताबडतोब, सत्वर.

**ओवी ५९—आगळें**-अधिक, विशेषः—योगी पुरुष हा आपला जीव देतो म्हणजे आपलें सर्वस्व अर्पण करतो व अतिशय कष्ट करतो म्हणून त्याला

सगुणोपासकापेक्षां अधिक लाभ मिळत असेल असें कदाचित् वाटेल म्हणून भगवान् स्पष्ट सांगतात कीं योग्याला सगुणोपासकांपेक्षां अधिक कांहींहि मिळत नाहीं. ज्याप्रमाणें मुंबईस पायानें जाणारा व आगगाडीनें जाणारा हे दोघेहि मुंबईस पोहचतात पण पहिल्याच्या वांट्याला कष्ट अधिक येतात; त्याचप्रमाणें योग्यालाहि माझी प्राप्ति होते व भक्तालाहि माझी प्राप्ति होते पण योग्याच्या वांट्याला कष्ट मात्र अधिक येतात.

**ओवी ६०—हितीं**-कल्याणकारक असलेल्याच्या ठिकाणीं ( म्ह० अव्यक्त अशा ब्रह्माच्या ठिकाणीं )-जगतांत दोन ध्येयें आहेत. **एक प्रेय व दुसरें श्रेय** ( 'अन्यच्छ्रेयोऽन्यदुतैव प्रेयस्ते उभे नानार्थे पुरुषं सिनीतः-कठ उ. १-२-१ ). प्रेय म्हणजे आरंभीं गोड व परिणामीं कडु; ज्याप्रमाणें लहानपणीं खेळण्यांत बरें वाटतें पण पुढें भिक्षा मागावी लागते त्याचप्रमाणें 'विषय-सुख' हें आरंभीं गोड लागते पण त्याचा परिणाम हानिकारक आहे. ( 'जे इंद्रियजाता लळा । दिधलिया धर्मांचा मळा । जाळूनि भोगिजे सोहळा । विषयांचा जेथ ॥ ज्ञा. १८-८०२. 'बापा विषाची मधुरता । झणें आवडी उपजे चित्ता । परी तो परिणाम विचारितां । प्राणु हरी ॥' ज्ञा. ३-२१२ ). म्हणून 'विषयसुख' हें प्रेय आहे. जें 'आरंभीं कष्टप्रद पण परिणामीं गोड' त्याला श्रेय म्हणतात व अशा श्रेयालाच शास्त्रकार 'आत्यंतिक हित.' म्हणतात. सर्व प्राणिमात्रांचें आत्यंतिक हितांचें ठिकाण म्हणजे श्रेय, जर श्रेय कोणचें असेल तर तें 'ब्रह्म' होय, कारण त्याची प्राप्ति झाली असतां जीवाच्या मागची कायमची पुनरावृत्ति नष्ट होते. ( 'ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन् गता न निवर्तंति भूयः' गी. १५-४ ) **निरालंब**-निराश्रय-परमात्मा जर 'शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध' या पंचविषयांपैकीं एखादा विषय असतां तर तो इद्रियें मन अथवा बुद्धि यांचें आलंबन झाला असता. परंतु परमात्मा हा इतका निरुपाधिक आहे कीं, तो आपला आपल्यालाहि विषय होत नाहीं. ( 'कीं पुढिलाची दृष्टि चोरिजे । हा दृष्टिबंधु निफजे । परी नवल लाघव तुझें । जें आपणपें चोरे ॥' ज्ञा. १४-५ ) 'सर्व सिद्धांतांचिया उजरिया । सांडोनियां निदसुरिया । आपुलिया हाता चोरिया । आपणाचि जो ।' अमृ.

५-३९ 'मनाची नखी न लगे। ज्ञा. १२-४१) म्हणून परमात्मा हा 'निरालंब' आहे. **अव्यक्त**-निराकार ('जें आकाराचें पैल तीर। जें नादाची पैल मेर। तुर्येचें माजघर। परब्रह्म जें ॥' ज्ञा. १३-१०७३). परमात्मा हा निराकार होण्यास्तव तो इंद्रियांना अगोचर आहे. **पसरलिया**-पोहोचविल्या, घातल्या, टेवल्या.

**ओवी ६१—वाटवधें**-वाटमारेपणा-योगी हा योगाभ्यास, अव्यक्ताची प्राप्ति करून घेण्याकरितां करीत असतो. परंतु इंद्रादिक जे देव आहेत त्यांना असें वाटतें कीं योगी हा 'इंद्रपद' प्राप्त करून घेण्याकरितांच तपश्चर्या करीत बसला आहे; म्हणून ते त्याच्या तपश्चर्येंत अडथळा करण्याकरितां अप्सरादि देवांगना पाठवितात. शुक्राचार्यांच्या तपश्चर्येंत अडथळा करण्याकरता इंद्रानें रंभेला पाठविली होती असा पुराणांत उल्लेख आढळतो. परंतु जे भक्तीच्या मार्गानें परमात्म्याची प्राप्ति करून घेण्याचा प्रयत्न करतात त्यांचें रक्षण साक्षात् भगवान् करतात. ('यापरी हरिकीर्तन। देत परम समाधान। हा भक्ती-राजमार्ग पूर्ण। ये मार्गी संरक्षण चक्रपाणी कर्ता' ए. भा. २-५३७) एवढेंच नव्हे तर अंतःकरणांतील कामक्रोधादिक जे बलाढ्य शत्रु त्याचाहि नायनाट भगवान करतात. ('चक्रें अभिमान करी चेदा। मोहममता छेदी गदा। शंखें उद्बोधी निजबोधा। निजकमळें सदा निजभक्त पूजी' ए. भा. २-५३९). **ऋद्धिसिद्धि**—'ऋद्धि' म्हणजे 'ऐश्वर्य (स्वर्गादि).' '**सिद्धि' म्हणजे अष्टमहासिद्धि**—त्या आठ आहेतः—अणिमा, लघिमा, प्राप्ति, प्राकाम्य, महिमा, ईशिता, वशित्व व कामावसायिता. योगाभ्यास करतांना शरीरांतील पृथ्वीच्या व पाण्याच्या भागांचा लय झाल्यानतर योगी हा पाण्यावरून चालूं शकतो व प्रत्येकाच्या मनांतील हेतु ओळखूं शकतो. अशाप्रकारें त्याला अणिमादिक महासिद्धि प्राप्त होतात. ('पवनाचा वारिकां वळघे। चाले तरी उदकीं पाउल न लागे। येणें येणें प्रसगें। येती बहुता सिद्धि ॥' ज्ञा. ६-२७०). ह्या सिद्धि प्राप्त झाल्यानंतर कित्येक वेळा योग्याला असें वाटते कीं, आपलें प्राप्तव्य मिळालें व म्हणून तो अव्यक्ताची

प्राप्ति करून घेण्याचा अभ्यास सोडून ह्या महासिद्धींमध्येच गुग होऊन राहतो. ( 'योगाभ्यासें सिद्धि रोधिती वाटा वो ॥' निळा. ५६० ).

**ओवी ६२ विलग** — उपद्रव, त्रास. **उठावती**—उत्पन्न होतात.—ऋद्धि-सिद्धींच्या लाभामुळे योग्याच्या अंतःकरणात कामक्रोधादि विकार सारखे उत्पन्न होतात व योग्याला ते तसेच जिरवावे लागतात. पण भक्त हा ह्या विकाराची मोहर भगवंताकडे लावतो म्हणून त्यांच्यापासून त्याला त्रास होत नाहीं. ( 'तदर्पिताखिलाचारःसन् कामक्रोधाभिमानादिकं तस्मिन्नेव करणीयम्' नारदभक्ति सूत्र-६५ ) योगमार्ग व भक्तिमार्ग यांच्यात मुख्यतः फरक जर कांहीं असेल तर पहिल्यांत इंद्रियांचे निर्दळण करावे लागते, व दुसऱ्यांत फक्त त्या इंद्रियांची मोहर भगवंताकडे लावावी लागते. इंद्रियाचा निरोध करणें हें फार कठीण आहे. ( 'इंद्रियें कोंडिलीं न कोंडती । विषय सांडितां न सांडती । पुढतपुढती बाधों येती । यालागीं हरिभक्ति द्योतिली वेदें ।' ए. भा. २-२८७ 'कायावाचामनें झाला विष्णुदास । कामक्रोध त्यास बाधीतना' तुका. २४७३ ). **शून्येंसी**-निराकाराबरोबर-येथे बौद्धमतवाद्यांचे 'शून्य' घ्यावयाचें नाहीं. बौद्धमतवादी सर्व पदार्थ अत्यंत असद्रुप मानतात व या जगतांत बाकी शिल्लक शून्यच राहतें असे म्हणतात. येथे 'शून्य' ह्याचा अर्थ 'निराकार ब्रह्म' असा आहे. भक्ताला सगुण परमात्मा त्याच्या डोळयां पुढें दिसत असतो. परंतु योग्याला ज्याच्या प्राप्तीकरितां खटपट करावयाची तो 'निर्गुण' परमात्मा 'निराकार' होण्यास्तव डोळ्यांना दिसत नाहीं, म्हणून त्या अव्यक्त ब्रह्माला ह्या ठिकाणीं 'शून्य' म्हटले आहे.

**ओवी ६३—वाव**-दोन हात लांब केले असता एका हाताच्या टोंकापासून दुसऱ्या हाताच्या टोंकापर्यंतचें अंतर. **मवावा**-मोजावा, कवळावा—कवळी-मध्यें वारा पकडावा लागतो.

**ओवी ६४—उन्निद्रा**-जागृति. **वेल्हावणें**-प्रेम करणें, भोग घेणे. **साजणें**-मैत्री, सख्य.

**ओवी ६५—पांघुरावें**-अंगावर घ्यावें.

**ओवी ६६—किंबहुना**-फार काय सांगावें, थोडक्यांत, सारांश. **नीच**-

नित्य–योग हा सतीच्या वाणापेक्षां कठीण आहे. सतीला निदान नवऱ्याचें प्रेत तरी डोळ्यांसमोर दिसत असतें. परंतु योग्याच्या समोर कांहींच दिसत नसतें, कारण तो अव्यक्ताची उपासना करीत असतो. सतीला एकदांच अग्निप्रवेश करावा लागतो परंतु योगाभ्यास हा नित्य अग्निप्रवेशासारखा आहे.

**ओवी ६७—काज**–काम, निमित्त, कामगिरी. **बापिकें**–वंशपरंपरा आलेलें.

**ओवी ६८—तिख**–तीक्ष्ण. **घोंटे**–गिळवतें.

**ओवी ६९—वांटा**–हिस्सा.

**ओवी ७०—बोचरिया**–दंतहीन माणसाला. **शुद्धी**–सुटका, वियोग.

**ओवी ७१—खोलिजतु**–चालणे.

**ओवी ७२—वळघलिया**–आश्रय केला असता, शिरले असतां. **थाटी**–गर्दी. **पाउटी**–पायरी–सूर्यमंडळाचा भेद करून स्वर्गात दोघेच जातात. एक संन्यासी व दुसरा रणांगणांत शत्रूशीं लढत असतां समोरून घाव लागल्यामुळें मृत्यु पावलेला वीर (‘ द्वाविमौ पुरुषौ लोके सूर्यमंडलभेदिनौ । परिव्राट् योगयुक्तश्च शूरश्चाभिमुखो हतः ॥ ’)

**ओवी ७३—देहवंता**-शरीर धारण करणाऱ्याला. **गति**–प्रवेश.

**ओवी ७४—धिंवसा**–धैर्य, उत्साह. **झोंबती**–बिलगतात, लगट करतात.

**ओवी ७५—येर**–दुसरे ( भक्त ). **वोटंगले**–आश्रय केला.

**ओवी ७६—कर्मेंद्रिय**–ज्याच्या योगानें कर्म करतां येतें तें शरीराचें इंद्रिय. **कर्मेंद्रियें पांच आहेत**–हात, पाय, वाणी, शिश्न व गुद (‘मग वाचा आणि कर । चरण आणि अधोद्वार । पायू हे प्रकार । पांच आणिक । ज्ञा. १३–१००) **अशेखें**–सर्व, संपूर्ण. **वर्णविशेखें**–जातीवैशिष्ट्यानें म्ह. वर्ण व आश्रमाला योग्य अशी–‘वर्ण’ म्ह. ‘जाती’ चार आहेत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र. त्याचप्रमाणें आश्रमहि चार आहेत–ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास. प्रत्येक जातीचें कर्म काय आहे हें भगवंतांनीं गीतेच्या १८ व्या अध्यायांत सांगितलें आहे. (‘शमो दमस्तपः शौचं क्षांतिरार्जवमेवच’ गी. १८–४२, ४३, ४४ ). ‘अशेखें’ म्हणण्यांत विहित व अविहित अशा दोन्हीं कर्मांचा अंतर्भाव होतो. भक्त हा निषिद्ध कर्में करीत नाहीं हें दाखविण्याकरितां ‘ वर्ण

विशेखें' असे शब्द योजिले आहेत. ('तरी उचितें कर्में आघवीं । तुवां आचरोनि मज अर्पावीं । परी चित्तवृत्ति न्यासावी । आत्मरूपीं' ज्ञा. ३-१८६ ).

**ओवी ७७—विधीतें**- शास्त्राज्ञेला. **निषेधातें**-निषिद्धकर्माला. **गाळित**-वर्ज्य करतात ( अ. स्व. प्र. २ पहा ) **जाळित**-जाळून टाकतात—'जाळणें' ह्याचा अर्थ पुन्हा उगवण्यास निरुपयोगी करणें. जसें 'बीज' भाजलें व नंतर ते पेरलें तर पुन्हा तें उगवत नाहीं ('बीज भाजुनि केली लाही । आम्हां जन्म मरण नाहीं' तुका-३५५० ). त्याचप्रमाणें कर्म हे भोग देण्याकरितां शिल्लक राहत नाहीं. शास्त्रीय भाषेंत सांगावयाचें तर भक्त हे 'क्रियमाण' कर्म करीत नाहींत.

**ओवी ७८—नाहीं करिती**-नष्ट करतात.

**ओवी ७९—आणिकही**-आणखीही, याशिवाय-विधियुक्त कर्में तर भक्त मला अर्पण करतोच. परंतु याशिवाय शरीरानें, मनानें व वाणीनें ज्या त्याच्याकडून क्रिया होतात त्यांचाहि विषय मीच असतों. मी सोडून त्यांच्या क्रियेला दुसरा आश्रय कोणीच नसतो. ('जयांचिये वाचे माझे आलाप । दृष्टी भोगी माझेंचि रूप । जयांचें मन संकल्प । माझाचि वाहे' ॥ ज्ञा. ९-४४५ ते ४४८ ). **आनौती**-अन्यत्र, निराळा. **धांव**-प्राप्य, आश्रय, गति.

**ओवी ८०—निरंतर**-अखंड,-आपआपल्या वर्ण व आश्रमानुसार कर्में करून तीं भगवंताला अर्पण करणें व सर्व इंद्रियांच्या व्यापारांची धांव भगवंताकडे असणें हीच भगवंताची 'अखंड' भक्ति होय. ('तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं ॥' ज्ञा. १८-९१७ 'कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा' ए. भा. २ श्लो. ३६ 'हेतुक अथवा अहेतुक । वैदिक, लौकिक, स्वाभाविक । भगवंतीं अर्पे सकळिक । या नांव देख भागवतधर्म' ए. भा. २-३४० ) **ध्यानमिषें**-ध्यानाच्या निमित्तानें. त्यांनीं ध्यानाच्या योगानें आपलें हृदय माझें राहाण्याचें घर केलें. वास्तविक परमात्मा हा व्यापक आहे ('हरि व्यापक सर्वगत । हें तंव मुख्यत्वें वेदांत । तुका-३७२३ ) असें असतांना तो परमात्मा लहान अशा हृदयांत

कसा काय राहूं शकतो? तर ही गोष्ट भावनेच्या योगानें व प्रेमानें होऊं शकते; जसें एका लंगोटावर सगळा आखाडा चीत करून टाकणारा असा जरी अजिंक्य पहिलवान असला तरी पण त्याचा लहान मुलगा त्याच्या भोंवतीं उपरणें घालतो व म्हणतो "बाबा, मी तुम्हाला जाऊं देणार नाहीं." तेव्हां त्याचा बाप खालीं बसतो; पण तो त्या लहान मुलाला लाथाडूं शकत नाहीं ('पदरीं घाली पिळा। बाप निर्बळ साटी बाळा.' तुका २९९३) त्याच-प्रमाणें परमात्मा हा बलवान् खरा, परंतु तो भक्तांच्या अंकित होतो व त्यांच्या हृदयांत वास करतो. (सांठवला राहे हृदयसंपुष्टीं। बाहेर धाकुटी मूर्ति उभा॥ तुका २०८४).

**ओवी ८१—बापुडीं**–दीन, गरीब, कंगाल. **त्यजिली**–त्याग केला. त्यानें ऐहिक व पारत्रिक भोगांबद्दल विचार केला व त्याला असें दिसून आलें कीं त्यांच्यामध्ये निर्मळ, अखंड व शाश्वत असे सुख देण्याचें सामर्थ्य नाहीं. मुख्यतः सर्व भोगाना आश्रय जें शरीर तेंच मुळीं नाशिवंत आहे. ('मग हें तंव पाचमेळावा। शेखीं अनुसरेल पंचत्वा। ते वेळीं केला के गिंवसावा। शीणु आपुला' ज्ञा. ३–२०८) शरीरसुखाकरितां मनुष्य लग्न करतो परंतु लग्नानें माणसाची काळजी कमी होण्यापेक्षां उलट त्याची जबाबदारी अधिक वाढत जाते. ('स्त्री हातीं धरिता देख। वाढे प्रपंचाचें थोर दुःख। गृह पाहिजे आवश्यक। भोगार्थ देख स्त्रीयेच्या' ए. भा. ९–३०३) स्त्रीसुद्धां पैसा असेल तर नवऱ्याचा मान ठेवते ('धनवंता पुरुषापाशीं। स्त्री लवो-टवो करी कैशी।' ए. भा २३–३३६–३३७). त्याचप्रमाणे मुलांपासून सुखप्राप्त होईलच असे नाहीं ('तेवीं पुत्रापासोन सुखप्राप्ती। माता पिता होईल म्हणती। शेखीं पुत्र अगोठा दाविती। केवळ भ्रांती पुत्रमोहो'॥ ए. भा. ११–८२ 'जोंवरी चळण गा। तोवरी म्हणती माझा। मानिती लहान थोर। देह सुखाच्या काजा। इंद्रियें मावळलीं आला बागूल आजा। कैसा विपरीत झाला तोचि देह नव्हे दुजा'॥ तुका ३५०) धनानेंहि शाश्वत सुख मिळत नाहीं. धनाच्या मागें पंधरा अनर्थ आहेत ('स्तेयं हिंसाऽनृतं दंभः' ए. भा.–२३ श्लोक १८. 'तुका म्हणे धन। भाग्य अशाश्वत

जाण ' तुका--२१३२ ) मान हाहि अनित्यच आहे. ( ' प्रारब्धेंचि जोडे धन । प्रारब्धेंचि वाढे मान । ' तुका- ३४२५ ' लावण्य मान्यता विद्यावंत ' ज्ञा. गा. ४२७ ). तात्पर्य ऐहिक भोग हे सर्व अनित्य आहेत; ( ' जयां विषयांच्या ठायीं । एकनिष्ठता कहीं नाहीं ' ज्ञा.- २--११३ ) व त्यांचा भोग अन्य जन्मांना कारणीभूत होतो म्हणून भक्त हा त्यांचा त्याग करतो.( ' सर्वविशीं माझा त्रासलासे जीव । आतां कोण भाव निवडूं एक 'तुका–२०४०).त्याचप्रमाणें स्वर्गांतील व सत्यलोकांपर्यंतच्या सर्व भोगाच्या मागें नाश आहे. ( ' ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ॥ ' गी. ९–२१ ' इंद्रपदादिक भोग । भोग नव्हे तो भवरोग ॥ ' तुका. १९८४ ' ब्रह्मादिक पदें दुःखाची शिराणी । तेथें चित्त झणीं जडों देसी ॥ ' तुका–८३५ ) कर्मानें प्राप्त होणारें जेवढें म्हणून आहे त्याच्यामागें नाश आहे. हे तो जाणतो व म्हणून तो स्वर्गादि भोगांचा त्याग करतो. ( ' तुका म्हणे त्याचें कळलें आम्हां वर्म । जे जे कर्म-धर्म नाशवंत ' तुका—८३५ ' तयातें योगीश्वर अलौकिकें । दिठीचेनि हात-तुकें । अनुमानेती कौतुकें । तंव हलुवट आवडे ॥ ' ज्ञा. ८–२६६ ). ' मोक्ष ' म्हणजे केवळ ' ब्रह्मरूप ' स्थिति. त्याच्यांतहि खरा आनंद नाहीं. साखररूप होऊन राहण्यापेक्षा मनुष्य होऊन ती खाणे अधिक चांगलें त्याच-प्रमाणें केवळ आनंदरूप जो मोक्ष तद्रूप होऊन राहण्यापेक्षां भगवद्भक्त होऊन भक्तीचा म्हणजेच ब्रह्मरसाचा आनंद चाखणें अधिक चांगले. याच अर्थानें तुकाराममहाराज म्हणतात ( ' मोक्ष तुमचा देवा । दुर्लभ तो तुम्ही ठेवा ॥ ' तुका–६१७८ नलगे मुक्ति धन संपदा । संतसंग देई सदा ॥ ' तुका–९६२ ). अतएव हा मोक्षाचाहि त्याग करतो. **कुळवाडी**–कुळ व मालक असा संबंध, व्यवहार–हुषार मनुष्य जो असतो तो नेहमीं सचोटीचें कुळ पाहून त्याच्याशीं व्यवहार करीत असतो. आपली जमीन वाटेल त्याला खडानें लागवडीस तो देत नाहीं. त्याचप्रमाणें ह्या भक्ताच्या प्रेमानें शाश्वत जो मी त्या कुळाशीं व्यवहार केला. भक्त मला प्रेम देतात व त्याचा मोबदला भक्तिसुख घेतात. पण ह्याचा परिणाम इतका झाला कीं भक्त हे देवाच्या तोडीला येतात म्हणजे ईशकोटींत येतात. ( ' बाप रखुमादेवीवरा विठ्ठलाची भेटी । आपुल्या संव-

साटी करुनि टेला ॥' ज्ञा. गा. ५४ ). याच्या उलट देवाला आपलें निर्गुण निराकार स्वरूप टाकून शरीरधारी व्हावें लागतें म्हणजे मनुष्यकोटींत यावें लागतें ( 'परी अर्जुना तुझेनि वेधें । मियां देवपणाचीं ब्रिरुदें । सांडिलीं गा मी हें आघें । सगळेनि तुवां ॥' ज्ञा.–१८–१३७२ ). वास्तविक परमात्मा हा मोटा व्यापक परंतु त्याला परिच्छिन्न व्हावें लागलें ( 'एवढा प्रभु भावें । तेणें संपुष्टीं राहावे ॥' तुका २९४३. 'गौळणिया गळा बांधिती धारणीं । पायां चक्रपाणी लागे तयां ' तुका–१४ ). देव हा भक्ताला आनंदरूपी खंड मुबलक व सतत देत असतो म्हणून भक्त हा आपल्या प्रेमाचा सर्व व्यवहार भगवंत जें मातबर कुळ त्याच्याशींच करतो.

**ओवी ८२—विकले**-विकलेले-भक्त देवाला आपलें कायावाचामन विकतात. म्ह० अर्पण करतात. परंतु त्याबद्दल त्याच्याजवळ कोणतीहि व्यावहारिक वस्तु मोबदला म्हणून मागत नाहींत ( 'तुका म्हणे जीव भाव देवापायीं । ठेवूनि ते कांहीं न मागती ' तुका–२०८४ ) नाहींतर आपल्या स्वार्थाकरितां भगवंताला शरणागती करणारे आर्तादि भक्त पुष्कळ आहेत ( 'म्हणोनि आपुलाल्या हिताचेनि लोभें । मज आवडे तोहि भक्त शोभे ' ज्ञा. ७--११९). ज्या वेळेस मनुष्य हा खरा अपरिग्रही बनतो त्या वेळेसच तो अनन्य होऊं शकतो. तो भक्त किती अनन्य झालेला असतो तर ज्याप्रमाणें आईच्या गर्भांतील मूल आईशीं सर्व प्रकारानें अनन्य असतें तद्वतच तो भक्त भगवंताशीं अनन्य असतो. ( 'पै सर्व भावेसीं उखितें । जे वोपिले मज चित्तें । जैसा गर्भगोळु उद्यमातें । कोणाही नेणें ' ज्ञा. ९-३३५ ). पतिव्रता ही ज्याप्रमाणें नवऱ्याशीं अनन्य असते त्याचप्रमाणें भक्त हाहि देवाशीं अनन्य असतो ( 'पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हां नारायण तैशापरी ' तुका-४९६ 'मजवरी घाली घण । परी मीं न सोडीं चरण ' तुका. १६६४ 'निष्ठावंत भाव भक्तांचा स्वधर्म । निर्धार हें वर्म चुकों नये ' तुका. ३०५०). अशा अनन्य भक्तांचें संकटांतून तर देव निवारण करतातच ( 'भक्तां समागमें सर्वभावें हरी । सर्व काम करी न सांगतां ' तुका--२०८४ 'उंच निंच कांहीं नेणे हा भगवंत । तिष्ठे भाव भक्ति देखोनियां ' तुका--२९६८ ) पण

त्यांना संसारसागरांतून देव कशाप्रकारें तरून नेतात हें पुढील श्लोकांत भगवंत सांगतात.

**ओंवी ८३—उदरा**—पोटाला. आईचा सख्खा मुलगा, सावत्र किंवा दत्तक घेतलेला नव्हे. **सोयरा**—नातलग, आप्त, आत्मीय, आवडता—आईचें आपल्या मुलावर निर्व्याज प्रेम असतें. कुरूप, पांगळें असें जरी मूल असलें तरी आई त्याला कंटाळत नाहीं. येवढेंच नव्हे तर उलट अशा पंगु मुलावर आईचें अधिक प्रेम असतें. ( 'आंधळें पांगळें मुकें अनर्गळ । परी जीवापरिस बाळ पढियंतें माते ॥ नामा. ६५५ ) 'देवा पांगुळ एकादें विइजे । तरी जन्मोनि जोजारू साहिजे । हे बोलों काय तुझें । तुजचि पुढां' ॥ ज्ञा. ४-३४. ) आई आपल्या मुलास आदळ, आपट न करतां उलट सुखा-समाधानानें त्याचे कष्ट करीत असते. ( 'देह विसरे आपुला । जवळी घेतां सीण गेला.' तुका. २००६. 'तुका म्हणे बाळ माता चुकलिया वनीं । न पवतां जननी दुःख पावे विठ्ठला' तुका. ३८४२. ) मूल जेवलें नाहीं तर आईला करमत नाहीं. **केतुला**—केवढा, कितां.

**ओंवी ८४—जैसे**—जसें. भक्त हा कोणच्या जातीचा आहे, किती शिकलेला आहे किंवा किती वयाचा आहे हें देव पाहात नाहींत. विदुर किंवा चोखामेळा हे हलक्या जातीचे होते पण भगवंतांनीं त्यांचा उद्धार केला. त्याचप्रमाणें गजेंद्रादि पशूंच्या विद्येबद्दल भगवंतांनीं विचार केला नाहीं व ध्रुवादिकांच्या वयाकडेहि लक्ष दिलें नाहीं. ( 'उपमन्यु ध्रुव हे काय जाणती । प्रल्हादाच्या चित्तीं नारायण' ॥ तुका. २९७३. 'व्याधस्याचरणं ध्रुवस्यच वयो विद्या गजेंद्रस्य का । का जातिर्विदुरस्य यादवपतेरुग्रस्य किं पौरुषम् ॥ कुब्जायाः कमनीयरुपमधिकं किं तत् सुदाम्नोर्धनम् भक्त्या तुष्यति केवलं न च गुणैः भक्तिप्रियः श्रीहरिः ॥ ) **तैसियां**—तशांना. भगवंतानें सुदामा जो गरीब ब्राह्मण त्याला आश्रय दिला व त्याला सोन्याची नगरी दान दिली व कान्होपात्रा, पिंगला इत्यादि वेश्यांचाहि उद्धार केला. ( 'मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः । स्त्रियो वैश्या । स्तथा शूद्रास्तेऽपि यांति परां गतिम् ॥ गी. ९-३२ 'म्हणोनि कुळ जाति

वर्ण । हें आघवेंचि गा अकारण । एथ अर्जुना माझेपण । सार्थक एक ' ॥ ज्ञा. ९–४५६ ' तुका म्हणे ऐसा कोण उपेक्षिला ॥ नाहीं ऐकिला ऐसा कोणी ' ॥ तुका. ३०५० ' उपेक्षिला येणें कोणी शरणागत । ऐसी नाहीं मात आईकिली ' ॥ तुका. ३२६० ). भगवंताकरितां जो दीन झाला व अभिमान टाकून जो भगवंताला शरण गेला त्याचा भगवान् उद्धार करतो. ( ' ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वाद्दैन्यप्रियत्वाच्च ' ॥ नारदभक्तिसूत्र–२७. ' देव-सोयरा देव सोयरा । देव सोयरा दीनाचा ' ॥ तुका. २९६३ ). भगवान् जर कांहीं पहात असतील तर भक्ताच्या ठिकाणीं आपल्याबद्दल श्रद्धा किती आहे, विश्वास किती आहे, प्रेम किती आहे, एवढेंच पाहतात. ( ' अंतरींची घेतो गोडी । पाहे जोडी भावाची ' तुका. २९६३. ) देव अशा भक्ताची मरणापर्यंत सेवा करतो. ( ' देह वैकल्याचा वारा । झणें लागेल या सकुमारा । म्हणोनि आत्मबोधाच्या पांजिरा । सूयें तयातें ' ज्ञा.८–१३२.) **कळिकाळ— संकट.**—देवांनीं पांडवांना लाक्षागृहादि अनेक संकटांतून सोडविलें. अर्जुनाचा सारथी बनून त्याचें रक्षण केलें. ( ' पाइकु पाठीसीं घातला । आपण पुढां राहिला ' ॥ ज्ञा. १–१४३ व गजेंद्राला नक्रापासून सोडविलें. **पटा— अधिकार, मक्ता, भार.**—भक्ताच्या रक्षणाचा भार देव आपणांकडे घेतात.

**ओंवी ८५—संसाराची—**प्रपंचाची, घरकामाची.—भगवंत हे प्रसंग-विशेषीं भक्ताची प्रापंचिक अडचण दूर करतात व त्याच्या घरचें कामहि करतात. एकनाथमहाराजांच्या घरीं श्रीखंड्याच्या रूपानें भगवंतांनीं पाणी वाहिलें व जनाबाईचीं त्यानें लुगडींहि धुतलीं. परंतु खरे भक्त जे असतात ते भगवंतावर आपणहून कधींहि प्रापंचिक संकट टाकीत नाहींत. कारण प्रपंचां-तील लाभ व अलाभ यांबद्दल ते उदास असतात. ( ' दैवास्तव देहाचें पाळण । ऐसा निश्चयो परिपूर्ण । जो चिंतीना देहभरण । तो महायोगी जाण दैवयोगें ॥ ज्ञा. ४–१२५. **समर्थाची—** श्रीमंताची, राजाची–राजाची जी पट्टराणी असते तिला कधीं भिक्षा मागण्याचा प्रसंग येत नाहीं. पण त्याची जी नावडती बायको असते तिलाहि भिक्षा मागण्याचें कारण पडत नाहीं. ( प्रीति नाहीं राया वर्जिली ते कांता । परि तिची सत्ता जगावरी ' ॥ तुका.

१४२३ ' राजयाची कांता काय भीक मागे । मनाचिया जोगे सिद्धि पावे ' ज्ञा. गा. २५२. ) **कोरान्न**—कोरडी भिक्षा.

**ओंवी ८६...न लाजे**—लाजत नाहीं, संकोच वाटत नाहीं. स्वतःच्या बायकोचें लुगडें धुण्यास किंवा तिचें कोणतेंहि काम करण्यास नवऱ्याला लाज वाटत नाहीं; एवढेंच नव्हे तर तिच्या लुगड्याची व रक्षणाची काळजी नवऱ्याला असते. ( ' तुका म्हणे नग्न भाज । तरि ते लाज स्वामीसी ' ॥ तुका. ९७३. ) त्याचप्रमाणें भगवंत म्हणतात कीं, मलाहि माझ्या भक्तांचें काम करण्यांत लाज वाटत नाहीं. राजसूय यज्ञामध्यें भगवंतानें उष्टीं काढण्याचें काम केलें व भक्ताकरितां हलके अवतारहि घेतले. ( ' आम्हांसाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर ' ॥ तुका. १२७७ ' तुका म्हणे अर्धनारी । ऐसीं धरी रूपडीं ' ॥ ) तुका. ३४७३. वास्तविक जन्ममरणासारखी लाज दुसरी कोणतीहि नाहीं. परंतु भक्तांकरितां देवांनीं ती पत्करली व गर्भवास सोसले. ( ' अंबऋषीसाटीं जन्म सोसियेलें । दुष्ट निर्दाळीले किती एक ' ॥ तुका. ६८७. ' भक्तांकारणें येणें घेतलीसे आळी । दहा गर्भवास सोशी वनमाळी ' ज्ञा. गा. ४३८. ) **जाणिजे**—जाणलें जावें.

**ओवी ८७—लाटीं**—लाटांनीं. **सृष्टी**—भुवनें, लोक, जग. **झळंबणें**—हेलकावे खाणें, गटंगळ्या खाणें.–या सर्व भुवनांच्या मागें जन्म व मृत्यु म्हणजे उत्पत्ति व लय हे सारखे लागले आहेत. ( ' आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनोऽर्जुन ' गी. ८–१६ ) ' कैसें थोरिवेचें मान पाहें पां । तो सृष्टिबीजाचा साटोपा । परि पुनरावृत्तीचिया मापा । शीग जाहाला ॥ ' ज्ञा. ८–१६६. ' महाकल्पापरौती । कव घालूनि अवचिती । सत्यलोकभद्रजाती । आंगीं वाजे ॥ ' ज्ञा. १३–६१. ' न्याहाळीं पां केवढा । पसरलासे चवडा । करूनियां माजिवडा । आकारगजु ॥ ' ज्ञा. १३–६४ ).

**ओवी ८८—भवसिंधु**—संसारसागर.–ह्या जन्ममृत्युरूपी संसारसागराची मर्यादा फार मोठी आहे. ह्याची व्याप्ति गीतेंतील १३व्या अध्यायांत 'क्षेत्राच्या' रूपकानें सांगितली आहे. परब्रह्म वगळून, तेथपासून तों थेट खालीं स्थावर म्हणजे दगडमातीपर्यंत जें कांहीं उत्पन्न होतें व जातें तें सर्व ह्या संसारसाग-

राच्या हद्दींत येतें ( ' पैं परतत्त्वाअरौतें । स्थावरांता आंतौतें । जें कांहीं होतें जातें । तें क्षेत्राचि हें ॥ ' ज्ञा. १३-१५८ ). १५ व्या अध्यायांत या संसाराचें वर्णन वृक्षाच्या रूपकानें केलेलें आहे. त्यांत ह्या वृक्षाच्या वरच्या शाखा थेट ब्रह्मलोकापर्यंत वर गेलेल्या आहेत, खालच्या शाखा वृक्षादि स्थावरापर्यंत गेलेल्या आहेत; ह्याचें मूळ माया असून तें निराकार ब्रह्मरूपी जमिनींत रुजलेलें आहे व हा वृक्ष मध्येंच मनुष्यरूपी मूळानें फोफावलेला आहे असें म्हटलें आहे. अशाप्रकारचा संसारवृक्ष बळकट व अमर्याद आहे ( ' ऐसा गाढा आणि अफाटु । आतां कोण करी यया शेवटु ॥ ' ज्ञा. १५-२१३ ). अतएव हा दुस्तर आहे. ( ' संसारसिंधु हा दुस्तर । नुल्लघवे उलंघितां पार ॥ ' तुका-४४० ). **माजें**—शोभण्यानें, माजण्यानें, भरतीनें, पूरानें.-गीतेंतील ७ व्या अध्यायांत या भवसागराचें वर्णन ज्ञानेश्वर-महाराजांनीं मायानदीच्या रूपकानें केलेलें आहे. त्यांत त्यांनीं मायानदीला गुणरूपी मेघांचा वर्षाव झाल्यानें मोठा पूर आलेला आहे असें म्हटलेलें आहे. ( ' जे गुणघनाचेनि वृष्टिभरें । भरली मोहाचेनि महापूरें । घेऊनि जात नगरें । यमनियमांचीं ॥ ' ज्ञा. ७-७१ ). हिच्यांत पंचविषय हेच कोणी मोटाले मासे आहेत. व कामक्रोधादिक ह्या सुसरी व मगरी आहेत. हिच्या लाटा थेट सत्यलोकावर येऊन आदळतात. ( पैं पुनरावृत्तीचेनि उभडें । झळंबती सत्यलोकींचे हुडे । घायें गडबडती धोंडे । ब्रह्मगोळकाचे ॥ ' ज्ञा. ७-८० ) **धाकु**—भीति, दहशत, दरारा.-हा संसारसिंधु येवढा दुस्तर आहे कीं त्याच्यांतून तरून जाण्याकरतां जो जो प्रयत्न करावा तो तो मनुष्य त्याच्यांत अधिकच गुरफटला जातो. ( येथ एक नवलावो । जो जो कीजे तरणोपावो । तो तो अपावो । होय तें ऐक ॥ ' ज्ञा. ७-८२ ते ९० ). ह्याच्यांतून केवळ स्वबुद्धीनें किंवा यज्ञयागादि कर्मानें तरून जाणें शक्य नाहीं. मनुष्याला तर या संसारसिंधूची भीति वाटेलच परंतु शुकाचार्यादिकांनाहि ह्याच्या भीतीनें सोडलें नाहीं. ( ' बैसानी खोळी शुक । राहे गर्भी आंधळा । शीणला येरझारी । दुःख आठवी वेळा ' तुका-३५२ ). ज्ञानेश्वरमहाराजांनीं या मायानदींतून तरून जाणें किती कठीण आहे हें वेगवेगळ्या दृष्टांतांनीं सांगितलें आहे. ( ' जरी अपथ्यशीळा व्याधी । कळे

साधूसी दुर्जनाची बुद्धि ॥' ज्ञा. ७–९३ ते ९६ ). हन–पादपूर्णार्थक शब्द.

**ओवी ८९—मूर्ति**-प्रतिमा, शरीर. **मेळावा**-संयोग, समुदाय–भक्तांच्या करतां परमात्मा हा सगुण साकार होतो म्हणजे रामकृष्णादिक अवतार धारण करतो. **धांवत**-पळत, वेगानें, घाईनें–भक्तांवर संकट येण्याचा अवकाश कीं, तावडतोब भगवान् प्रगट होतात. प्रल्हादानें हांक मारल्याबरोबर भगवान् प्रगट झाले. ' हांकेसरिसी उडी । घालूनियां स्तंभ फोडी ' तुका–२२६७ )

**ओवी ९०—सहस्रवरी**-हजारांनीं, सहस्रपर्यंत.–'अनामा' जो परमात्मा (' ते कीर अनाम अजाती ' ॥ ज्ञा. १७-३२९ ) त्यानें भक्ताकरितां आपणाला ' विष्णुसहस्रनामांत ' ग्रथित केल्यासारखीं हजारो नांवें ठेवून घतलीं. ह्या नांवांपैकीं प्रत्येक नांव ही एक एक स्वतंत्र नौका आहे. (' मग दाविलेनि जेणें एकें । ब्रह्म आळविलें कवतिकें । मागां असत टाके । पुढां उभें '॥ ज्ञा. १७–३३३. ) भगवंताच्या नांवाला नौका म्हणण्याचें कारण ज्याप्रमाणें नांव ही बायका, मुलें, गुरेंढोरें इत्यादिकांना तारते, त्याचप्रमाणें भगवन्नामहि सर्वांना तारते (' जैसी नाव स्त्रियां बाळां । तोयतरणी ' ज्ञा. ५–१६. ) भगवत्प्राप्तीचे पुष्कळ मार्ग आहेत परंतु त्या सर्वांत भगवन्नाम हा सोपा व सर्वांना आचरण्यास सुलभ असा मार्ग आहे. कर्म-मार्गांत सर्वांचा प्रवेश होत नाहीं. वेदानें फक्त ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांचाच अंगीकार केलेला आहे. कर्माला काळ वेळ पहावा लागतो व कर्म करण्यापूर्वी स्नान करून शुचिर्भूत व्हावें लागतें. भगवन्नामामध्यें अशा अडचणी नाहींत. शिवाय कर्म काय, अकर्म काय हें ठरविणें फार कठीण आहे. (' कर्म म्हणिजे तें कवण । अथवा अकर्मा काय लक्षण । ऐसें विचारितां विचक्षण । गुंफोनि ठेले ' ॥ ज्ञा. ४–८५. ) कर्मानें साक्षात् मोक्ष मिळत नाहीं. कर्म हे अंतःकरण शुद्धिद्वारा ज्ञानोत्पत्तीला कारणीभूत होतें व अशा प्रकारें परंपरेनें तें मोक्ष देण्यास समर्थ होतें. पण भगवन्नाम हें साक्षात् मोक्षाला देतें. (' नाम जपयज्ञु तो परम । बाधूं न शके स्नानादि कर्म । नामें पावन धर्माधर्म । नाम परब्रह्म वेदार्थें ' ॥ ज्ञा. १०–२३३ ' काळवेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाही उद्धरती ' ज्ञा. गा–७५७. ' मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी

साक्ष बहुतांची ' तुका–२२८९ ) येवढेंच नव्हे तर यज्ञादिक कर्मांची सफलता होण्याकरितां नामाची जरूरी आहे. ज्ञानमार्ग हाहि कठीण आहे. जो साधनचतुष्टयसंपन्न झालेला आहे व ज्याच्या अंतःकरणांतून मल विक्षेप हे दोष गेलेले आहेत तोच ज्ञानाचा अधिकारी आहे–( ' निर्विण्णानां ज्ञानयोगो ' ए. भा. २० श्लो. ७. ) भगवन्नामाचा अधिकारी हा कसाहि असला तरी चालतो. ( ' तुका म्हणे महापातकी पतित । होती जीवन्मुक्त हेळामात्रें ' तुका–५५४. 'तुका म्हणे आसक्त जीव सर्वभावें । तरतील नांवें विठोबाच्या' तुका–२२३९. ' माझिये प्राप्तीलागुनी । भक्ती ज्ञानमार्ग दोन्ही ' ए. भा. ११–१५२७ ते १५३४. ) योगमार्ग हा तर कठीणांतील कठीण मार्ग आहे. ( ' ऐसें हें गहन । अर्जुना माझें भजन ' ज्ञा. ९–२१९. ) त्याचा आरंभ कठीण अशा आसनप्राणायामापासून आहे ( ' नागिणी उत्साहे नवहि द्वारें निरोधुन । नाडित्रयामाजी सुषुम्नासंचरण । न साधे हा मार्ग ऐसें बोलती मुनिजन । नरहरि चिंतनें अहर्निशी मुक्तिस्थान ' ज्ञा. गा.–४४८. ) परंतु भगवन्नाम हे गादीवर पडून घेतां येतें ( ' निजल्यानें गातां उभा नारायण । बैसल्या कीर्तन करितां डोले ' तुका–२२८४. ) तात्पर्य इतर सर्व साधनें हीं कठीण आहेत. ( ' हें अर्जुना सकळ कुवाडें । जे अनुष्ठितां अतिसांकडे । परी जितेंद्रियासीचि घडे । योग्यतावशें ॥ ज्ञा. ४–१४३. ) भगवन्नामाच्या अधिकाऱ्यांत पामरापासून तो मुक्तापर्यंत सर्वांचा समावेश होतो. ( ' यापरी पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना । मातें भजतां सदना । माझिया येती ' ॥ ज्ञा. ९–४७४. ) त्यानें मोक्ष थोड्या कष्टांत व निश्चित मिळतो. येवढ्याकरितां ' नामाला ' नौकेची उपमा दिलेली आहे. **तारू**–तारक, नावाडी.—भगवंत भक्तांना कसें कसें तारतात हें पुढील ओव्यांतून ज्ञानेश्वरमहाराज सांगतात. ( ' तारू भवसागरींचें । उंचनीच अधिकार ' तुका–२१७६. ' तारूं भला पांडुरंग । पाय भिजों नेदी अंग ' ॥ तुका–३०५८.)

**ओंवी ९१—सडे**–एकटे; अपरिग्रही; निःसंग, उपाधिरहित. ( अ. स्प. ओं. २०६ पहा. ) **कास**–काचा, लंगोटी.–जे एकटे म्हणजे परिवाररहित होते त्यांना ध्यानाच्या कासेला लावले. ध्यान होण्याकरितां बाह्य प्रपंचाला

विसरावें लागतें. मनुष्य ध्यानाला बसला तर पूर्वी नसलेल्या कल्पनासुद्धां त्याच्या डोळ्यांपुढें येऊन उभ्या राहतात. ज्याच्या अंतःकरणांतून मल व विक्षेप हे दोष गेलेले आहेत तोच ध्यानाचा अधिकारी होय. एखाद्याला एक पैसा दान केला तर तो मनांतून जात नाहीं मग ज्या बायकापोरांना मनुष्य लहा-नाचीं मोठीं करतो व अनेक जन्मांतून विषय भोगीत येतो त्यांना तो सहजा-सहजीं कसा विसरूं शकेल? ('अनादि संसारमालेच्या ठायीं। नित्य विषय भोगिले पाही। ते ठसावले चित्ताच्याठायीं। वारंवार पाही सेवितां' ए. भा. १३-३७८.) म्हणून ध्यान हें अपरिग्रही माणसाकडूनच होणें अधिक संभवनीय असतें. तरियावरि-नौकेवर, (नामरुपी) नौकेवर-नामजप हें सर्वांत सुलभ साधन आहे. पण ज्यांना नामाचा जपहि करतां येत नाहीं म्हणजे एकाग्रतेनें ज्यांना नामस्मरण करतां येत नाहीं त्यांनीं पहिल्यांदा नामो-च्चार करीत राहावें. ('तें नाम सोपें रे रामकृष्ण गोविंद। वाचेसी सद्गद जपें आधीं' ज्ञा. गा-७६२ 'कळे न कळे ज्या धर्म। ऐका सांगतों रे वर्म। माझ्या विठोबाचें नाम। अट्टाहासें उच्चारा' तुका-२२१४) असा नामो-च्चार करतां करतां वृत्ति आपोआप अंतर्मुख व्हावयास लागते. ('अवचटें तोंडा आल्या हरी। सकळ पातकें संहारी' ए. भा. २-७६७ ते ७७३.

ओवी २२—पेटी-सांगड, भोपळयांची सांगड.—भगवत्प्रेम हें साधन भगवन्नामापेक्षां कठीण आहे. प्रेम हें आणून येत नसतें. भगवंताविषयीं प्रेम प्रत्येकाच्या ठिकाणीं उत्पन्न होईल असें नाहीं. कारण प्रेम हा अंतःकरणाचा जिव्हाळा आहे. प्रेमाची व्याख्या करणें फार कठीण आहे. ('अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम्' । मूकास्वादनवत् ॥ नारदभक्तिसूत्र-५१-५२. 'प्रेम नये सांगतां बोलतां दावितां। अनुभव चित्ता चित्त जाणे' तुका-३२५५.) शुद्ध प्रेम हें गुणत्रयाच्या पलीकडचें असतें व त्याला कामनेचा विटाळहि खपत नाहीं. एखाद्या प्रेमळ भक्ताच्या ठिकाणीं तें आढळतें. प्रेम ही परा भक्ति आहे. अशा प्रकारचें शुद्ध प्रेम गोकुळांतील गौळणींच्या ठिकाणीं होतें. त्यांनीं भगवंताला पाहिलें कीं लगेच त्यांना देहाचा विसर पडत असे. ('एक अंतरीं निश्चळ। जें निहाळितां केवळ। विसरले सकळ संसारजात'॥ ज्ञा. २

१७२ 'मुख डोळां पाहे। तैशीच ते उभी राहे' तुका–१५६.) तात्पर्य प्रेमरूपिणी भक्ति अतिकठीण आहे. ('ज्ञान सांगतां अतिसुगम। भक्ति रहस्य गुह्यपरम। अकृत्रिम उपजे प्रेम। ऐसें हें वर्म लाविल्या न लगे' ए. भा. १४–२४१ ते २४९.) **सायुज्य**–मोक्ष, ब्रह्मस्वरूपता.–सलोकता, समीपता, स्वरूपता व सायुज्यता असे मोक्षाचे चार प्रकार आहेत. (अ. स्प. प्र. २ पहा.)

**ओवी ९३—भक्तांचेनि नांवें**–भक्तांच्या नांवानें, भक्त झाल्यामुळें. **चतुष्पदादि**–पशु इत्यादि.–भगवंतांनीं गजेंद्राचा उद्धार केला. ('कीं तयाचें पशुत्व वावो जाहलें। पावलिया मातें'। ज्ञा. ९–४४२.) ज्याप्रमाणें राजाचा शिक्का एकाद्या चांमड्याच्या तुकड्यावर पडला तर त्या तुकड्यानें सोनेसुद्धां खरेदी करतां येतें, त्याचप्रमाणें ज्याच्यावर भक्त म्हणून एकदां छाप पडला मग तो जरी पशु असला तरी त्याचा उद्धार होतो. ('राजाज्ञेचीं अक्षरें आहाती। तिये चामा एका जया पडती। तया चामासाठीं जोडती। सकळ वस्तु'॥ ज्ञा. ९–४५३.) **वैकुंठ**–विष्णुलोक, विष्णुदेवतेचें निवासस्थान.

**ओवी ९४—चिंता**–काळजी, विवंचना, अडचण.–भक्तांना कोणच्याहि प्रकारची काळजी नसते कारण त्यांचा सांभाळ करण्यास देव सदा तयार असतात. ('मागें पुढें उभा राहे सांभाळीत। आलिया आघात निवारावे' तुका–५६५.) 'देव भक्तांचें दुःख सहन करतो व त्यांना आपलें सुख देतो. ('सुख देवी आम्हांसाठीं। दुःख आपणचि घोटी' ॥ तुका–१२७७)

**ओवी ९५—चित्तवृत्ती**–मन, मनोव्यापार.–ज्या वेळेस पत्नी ही आपलें सर्वस्व नवऱ्याला अर्पण करते त्या वेळेपासूनच नवऱ्याला तिची सर्व प्रकारें काळजी लागते. त्याप्रमाणेंच ज्या वेळेस भक्त देवाला आपलें कायावाचामन अर्पण करतो म्हणजे त्याच्याशीं अनन्य होतो त्या वेळेपासूनच देव सर्व त्याची काळजी वाहतात. ('ते एकवटूनि जिये क्षणीं। अनुसरले गा माझिये वाहणीं। तेव्हांचि तयांची चिंतवणी। मजचि पडली॥' ज्ञा. ९–३३८). देवाचें जशास तसें असें वागणें असतें. ('तुका म्हणे येथे पिसे। तेथे तैसे असेल' तुका–४०७०) अशा भक्ताचा देवाला इतका छंद लागतो कीं देव **स्वतः**

त्याच्यापुढें ज्ञानरूपी मशाल घेऊन चालतात. ('तयां तत्त्वज्ञां चोखटां । दिवी पोतासाची सुभटा । मग मीचि होऊनि दिवटा । पुढां पुढां चालें ॥' ज्ञा. १०–१४२'). **नाटीं**–नादांत, छंदांत. **सूती**–घालतात.

**ओवी ९६—मंत्र**—विचार, रहस्य. **कीजे**—केला जावा. **भजिजे**—सेवावें, धरावें.–भक्ति हा राजमार्ग होण्यास्तव व ह्या मार्गावरून चालणाऱ्या भक्ताचें स्वतः भगवान् रक्षण करणारे असल्यामुळें भगवान् अर्जुनाला तूं ह्या उपासना मार्गाचें अवलंबन कर असें सांगतात.

**ओवी ९७—वृत्तिक**—वतनदार. **निष्टंक**—पूर्णपणें, अखंड. **बुद्धि-निश्चयेंसी**—बुद्धीच्या निश्चयासह.–'संकल्प–विकल्पात्मकं मनः'–संकल्प विकल्प करणाऱ्या अंतःकरणाच्या वृत्तीस 'मन' म्हणतात. केवळ कल्पना हेंच आहे मनाचें स्वरूप. ('वायां मन हें नांव । एऱ्हवीं कल्पनाचि सावेव ॥' ज्ञा. १३–११०). '–निश्चयात्मिका बुद्धिः'–निश्चय करणाऱ्या अंतःकरणाच्या वृत्तीस बुद्धि म्हणतात. योग्य काय व अयोग्य काय याची बुद्धि निवड करते. ('हें सुख हें दुःख । हें पुण्य हें दोष । कां हें मैळ हें चोख । ऐसें जे निवडी ॥' ज्ञा. १३–८३). नुसतें मनच जर परमात्म्याकडे लावलें तर तें परावृत्त होण्याचा फार संभव असतो याकरितां मनाला बुद्धीचें साहाय्य लागतें. ज्या मनाच्या मागे बुद्धीचें साहाय्य नसतें त्या मनाचा संकल्प सिद्धीस जात नाहीं. ('तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दिस जागृतीचा' तुका–३४०४). एवढ्याकरितांच भगवंत अर्जुनाला मन हें बुद्धीच्या निश्चयासह मला अर्पण कर असें सांगतात. मन म्हणजे चित्त तूं मला अर्पण कर असें भगवंतांनीं अर्जुनाला गीतेंत अनेक ठिकाणीं सांगितलें आहे ('मन्मना भव मद्भक्तो' गी. ९–३४. 'किंबहुना आपलें मन । करीं माझें एकायतन ॥' ज्ञा. १८–१३५५. 'तूं मन हें मीचि करीं ।' ज्ञा. ९–५१७). असें सांगण्याचें कारण परमार्थांत मुख्यतः चित्ताचीच जरूरी असते. प्रपंच चांगला चालण्याकरितां वित्त लागतें, शरीर चांगलें राहाण्याकरितां शरीरांत पित्ताचा पुरवठा भरपूर असावा लागतो, त्याचप्रमाणें परमार्थ योग्य होण्याकरितां चित्ताची मदत लागते.

**ओवी ९८—प्रेमेसीं**-प्रेमानें.–मन हें जर आपण नुसतें कोंडायला लागलों तर तें कोंडलें जात नाहीं, उलट उसळी घेतें व अधिक उच्छृंखल होतें. जशी वाफ ही दाबली असतां ती दबत नाहीं, उलट जोरानें वरती उशी घेते. ('जें निरोंधलें घे उवावो। जया संयमुचि होय सावावो ॥' ज्ञा. ६–४१६ ). अशा प्रकारें दुर्दम जें मन त्या मनाला जर एखाद्या विषयाची चटक किंवा गोडी लागली तर तें मात्र त्या विषयाला सोडून जाण्यास तयार होत नाहीं. मनाचा स्वभाव असा आहे कीं, त्याला जी चटक लावावी ती लागते. एवढया-करितांच भगवंत अर्जुनाला सांगतात कीं, 'अर्जुना तू मनाला परमात्मसुखाच्या अनुभवाची चटक लाव. ('कां जे यया मनाचें एक निकें। जे हें देखिलें गोडीचिया टाया सोकें। म्हणोनि अनुभव सुखचि कवतिकें। दावीत जाइजे ॥' ज्ञा. ६–४२० ) **सरिसी**-बरोबर, जोडीनें. **पावसी**–पावशील–वास्तविक चित्त हे चिद्रूप आहे, परंतु त्याच्या ठिकाणीं 'जडत्व' म्हणजे चित्तवृत्तित्व जर कोणत्या कारणामुळे येत असेल तर ते विषयाच्या ध्यासानें; विषयध्यास चित्तातून गेला कीं तें चिद्रूप म्हणजे परमात्मरूप होतें. ('तुका म्हणे मन मुरे। मग जे उरे तेचि तू' तुका–३८०० ) एवढयाकरिता भगवंत अर्जुनाला मन हे आपल्या ठिकाणीं वतनदार करून ठेवण्यास सांगतात.

**ओवी ९९–घर**-राहण्याचे ठिकाण, वास्तव्य –मन हे परमात्म्याच्या ठिकाणीं राहिले म्हणजे ते त्याच्याशी आपोआप तद्रूप होऊन जाते. जसा मिठाचा खडा हा पाण्यात टाकला म्हणजे तो आपोआप त्याच्याशीं तद्रूप होऊन जातो. ह्याचे कारण मिठाचा व पाण्याचा सजातीय संबंध आहे. तसाच चित्ताचा व परमात्म्याचा सजातीय–संबंध आहे. ('जैसें समुद्रीं लवण न पडे। तंव वेगळे अल्प आवडे। मग होय सिंधूचि एवढें। मिळे तेव्हां' ॥ तैसें संकल्पोंनि काढिलें। जयाचे मनचि चैतन्य जाहलें। ज्ञा. ५–३५–३६. यथोदकं शुद्धे शुद्धमासिक्तं तादृगेव भवति ॥ कठ. उ. २,१,१५ मी व तूंचें मूळ, संकल्प आहे. जेथे संकल्प म्हणजे वृत्ति आहे त्या ठिकाणीं 'मी' 'तूं' म्हणजे द्वैत प्रतीति आहे किंवा जगत् प्रतीति आहे. झोपेंत वृत्ति अज्ञानांत लीन होते म्हणून त्या ठिकाणीं जगत् प्रतीति नाहीं. तद्वतच ज्या मनामूळें

संसाराची प्रतीति होते तें मनच जर भगवद्रूप झालें तर मग त्या ठिकाणीं जगताची प्रतीति कोठून येणार ( ' जेथ हें संसारचित्र उमटे । तो मनोरूपु पटु फाटे । जैसें सरोवरू आटे । मग प्रतिभा नाहीं ' तैसें मनपण मुदल जाय । मग अहंभावादिक कें आहे ' ॥ ज्ञा. ५-१५६-१५७. ' सहज मी आंधळा गा । निजनिराकार पंथें । वृत्ति हे निवृत्ति झाली जन न दिसे तेथें । मी माझें हारपलें । ठायीं जेथींच्या तेथें । अदृश्य तेंचि जालें । कांहीं दृश्य जें होतें ' ॥ तुका-३५१. )

**ओवी १००—पालवे**-पदरानें मालवितो. **रविबिंबासवें**-सूर्यबिंबाबरोबर.-प्रकाशरूप जीं किरणें तीं सूर्याला सोडून कधींहि मागेंपुढें राहात नाहींत ( ' सूर्याच्या होण्या होइजे कां सूर्यासवेंचि जाइजे । हें विकलेपण साजे । प्रभेसि जेवीं ' ज्ञा. १३-६०८ ' तरि अस्तुगिरीचिया उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं । रश्मी जैसे किरीटी । सचरती ' ज्ञा. १२-३५. )

**ओवी १०१—उचललेया**-जावयास निघालेल्या;-प्राण हा शरीरांत मुख्य आहे. प्राण गेला कीं बाकीचीं इंद्रियें निर्माल्यवत् होतात. एकदां प्राण व इंद्रियें यांच्यामध्यें श्रेष्ठ कोण म्हणून तंटा लागला, तेव्हां प्रत्येक इंद्रिय आळीपाळीनें एका शरीरांतून बाहेर पडलें परंतु शरीराची हालचाल थांबली नाहीं. ज्या वेळेस प्राणानें शरीराचा त्याग केला, त्या वेळेस शरीर जमिनीवर जड होऊन पडलें म्हणून प्राण हा सर्व इंद्रियांमध्ये श्रेष्ठ आहे. प्रत्येक इंद्रियांतील क्रियाशक्ति ही प्राणाची आहे. ज्याप्रमाणें एका मोठ्या चाकावर गिरणींतील बाकीचीं लहान चाकें चालतात, त्याचप्रमाणें शरीरांतील सर्व इंद्रियरूपी चक्रें हीं प्राणरूपी मोठ्या चाकानें चालतात. अतएव प्राणाच्या जाण्यांत सर्व इंद्रियांचें जाणें आपोआप येतें. **पाशीं**-जवळ-ज्याप्रमाणें इंद्रियांतील क्रियाशक्ति ही प्राणावर अवलंबून आहे; त्याचप्रमाणें अहंकार हा मनबुद्धीच्या साहाय्यावर अवलंबून असतो. नुसता संकल्प उत्पन्न होण्यांत जीवदशा येत नाहीं; जसें झोंपेंत शरीर आहे, सूक्ष्म संस्कार आहेत, सूक्ष्म संकल्पहि आहेत; पण त्या वेळेस ते बाधक होत नाहींत. पण ज्या वेळेस मनाचे संकल्प वाढतात व त्या संकल्पांना बुद्धीचें साहाय्य प्राप्त होतें त्या वेळेस अहंकाराची वाढ होऊन

आत्मा हा शरीराशीं तादात्म्य करतो व मग तो जीवत्वदशेला येतो. ( ' ऐसें शरीराचि येवढें । जें आत्मज्ञान वेगळें पडे । तें माझा अंशु ऐसें आवडे । थोडेंपणें ' ॥ ज्ञा. १५-३४३. ) जीवत्वदशेला कारण आहे अहंकार. तो अहंकार गेला कीं त्याच्याबरोबर जीवत्व दशाहि जाते ( ' तैसा देहाहंकारु नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला । आधींचि आहे ' ॥ ज्ञा. ६-८४, हा अहंकार कशानें जातो ? तर त्या अहंकाराला जें मनबुद्धीचें बल असतें तें बल नाहींसें झालें कीं तो आपोआप नाहींसा होतो, ( ' हा विचारूनि अहंकार सांडिजे । मग असतीच वस्तु होइजे ॥ ' ज्ञा. ६-७१. ) ज्या प्रमाणांत विचार कमी त्या प्रमाणांत देहतादात्म्यहि कमी असतें. जसें लहान मुलाच्या जवळ साप आला तर तें मूल भीत नाहीं त्याचें कारण त्याच्या ठिकाणीं देह तादात्म्य कमी असतें, त्याचप्रमाणें लहान मुलांचीं भांडणेंहि लवकर मिटतात. मनबुद्धीनें शरीराचें चिंतन करण्याचें सोडून ती भगवंताचें चिंतन करूं लागली कीं, आपोआप अहंकार नाहींसा होऊं लागतो.

**ओवी १०२—निक्षेपीं**—ठेव. मनबुद्धि तूं माझ्या ठिकाणीं ठेव याचा अर्थ तूं मनानें व बुद्धीनें माझाच संकल्प कर. ( बुद्धिनिश्चयें आत्मज्ञान । ब्रह्मरूप भावी आपणा आपण । ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण । तत्परायण अहर्निशीं । ' ज्ञा. ५-८७. ) मन व बुद्धि हीं जीं शरीराशीं आसक्त झालीं आहेत तीं त्यापासून विचारानें काढून माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं ठेव म्हणजे बुद्धीच्या निश्चयानें ' मी ब्रह्म आहे ' असे ठरव व मनानें ' मी ब्रह्म आहे, मी ब्रह्म आहे ' असें ध्यान कर. ध्यानानें विपरीत भावना म्हणजे ' मी देह आहे ' अशी जी भावना ती नाहींशी होते व जीव हा परमात्म्याशीं समरस होतो. ( ' एवं वस्तूसि जाणों जातां । जाणणेंचि वस्तु तत्वतां । मग जाणणें आणि जाणता । कैसा उरे । अमृ. ५-१८. ) **सर्वव्यापी**-सर्वव्यापक.-परमात्मा हा सर्वव्यापक होण्यास्तव त्याच्या ठिकाणीं मनबुद्धि ठेविली असतां हळूहळू जीव हा परमात्मा मीच आहे अशा व्यापक बोधावर येतो व जेवढा परमात्मा तेवढाच तो आपल्याला पाहूं लागतो. ( आणि पूर्ण अहंता वेंठलों ।

सैंघ आंम्हीच दाटलों । मा लोपलों ना प्रकटलों । कोणा होऊनी ' । अमृ. १०–१५.

**ओवी १०३—अनारिसें**-निराळें, भिन्न, अन्यथा. ज्या वेळीं आपल्या सांगण्यावर लोकांचा विश्वास बसणार नाहीं असें बोलणाऱ्यास वाटतें त्या वेळेसच तो शपथ घेऊन सांगत असतो. वास्तविक परमात्मप्राप्तीचा मार्ग आक्रमण करणें म्हणजे धार लावलेल्या वस्तऱ्यावर उघड्या पायानें चालण्यासारखें कठीण आहे. ( क्षुरस्यधारा निशिता दुरत्यया दुर्ग पथस्तत्कवयो वदन्ति । कठ. १–३–१४. ) पण या ठिकाणीं भगवंत अर्जुनाला परमात्मप्राप्तीचा फार सोपा मार्ग सांगून राहिले आहेत. तेव्हां आपल्या बोलण्यावर कदाचित् अर्जुनाचा विश्वास बसणार नाहीं येवढ्याकरितां भगवंत या ठिकाणीं शपथ वाहून सांगतात.

**ओवी १०४—चित्त**-अंतःकरण. ( अ. स्प. प्र. २ पहा. ) **अचुंबित**-निर्मळ, निर्लेप, वासनारहित, पूर्णांशानें, समग्र–भगवंताला चित्त अर्पण करणें ही फार कठीण गोष्ट आहे. त्यांतल्यात्यांत पापवासनारहित असें शुद्ध चित्त अर्पण करणें तर त्याहूनहि कठीण आहे. मनुष्याचें मन सर्व ठिकाणीं जातें पण भगवंताकडे जात नाहीं, कारण त्याच्याकडे जाण्यांत मनाचें मरण आहे म्हणजे त्याच्याकडे गेल्यानंतर मन हें मनरूपानें रहात नाहीं. जशी माशी ही सर्व पदार्थांवर बसते परंतु विस्तवावर बसत नाहीं, कारण तसे बसण्यांत तिचें मरण आहे; तद्वतच मन काय किंवा चित्त काय भगवंताला अर्पण केलें असतां तें त्याच्याशीं तद्रूप होऊन जातें म्हणून तें परमात्म्याकडे जात नाहीं. ( ' तैसिया योगिश्वरांचिया मती । मिळणींसवें एकवटती । परी जे विचारूनि पुनरावृत्ति । भजतीचि ना ' । ज्ञा. २–१७६. ) तुकाराम महाराज म्हणतात– ' काय करूं आतां या मना । न संडी विषयवासना । प्रार्थितांही गहेना । आदरें पतना नेऊं पाहे ' तुका. १५३४. खुद्द अर्जुन देवाला म्हणतो, देवा, तुम्ही साम्याची प्राप्ति करून घेण्यास मला मोठ्या कळकळीनें सांगतां ही गोष्ट खरी. परंतु हें मन आवरलें जात नाहीं त्याला काय करावें. ( ' म्हणोनि मन एक निश्चळ राहेल । मग आम्हांसि साम्य येईल । हें विशेषेंहि न

घडेल । याचिलागीं ' । ज्ञा. ६–४१७. ' आकाश करवेल चौघडी । महा-मेरू बांधवेल पुडीं । शून्याची मुरडवेल नरडी । परी मनाच्या ओढी अनि-वार । ए. भा. २९–५४. ) मोठमोठ्या पंडितांनाहि मन आवरणें फार कठीण जातें. ( ' तुका म्हणे येणें । बहू नाडिले शाहाणे ' तुका. ३११६. ' चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ' गी. ६–३४. ) मन हें नेहमीं सात्विक धैर्याच्या आड येत असतें. मन हें फार चंचल असल्यामुळें त्याचा निग्रह करणें फार कठीण आहे. ( ' तेथ चांचल्य निखळ । एकलें ठेलें निढाळ ' ज्ञा. १३–१०८. ) विमानांतून एखाद्या ठिकाणास जावयास वेळ लागेल पण मन हें त्याच्या अगोदर जाऊन येतें. ( ' बहुत चंचळ चपळ । जातां येतां नलगे वेळ ' । तुका. १५३६. ' न पुरती भ्रमणा दाही दिशा । सप्तही पाताळें आकाशा ' कान्होबा. ४५०७. ) मन हें नाना प्रकारच्या वासनांमुळें मलीन झालेलें असतें. विषयांचा उपयोग घेतला असतां ते विषय वासनांच्या रूपानें अंतः-करणाला जडतात व त्यामुळें मन मलीन होत असतें. ( ' तैसेंचि विषय पाहीं । प्रवेशले चित्ताच्या ठायीं । वासनारूपें जडले तेही । निघों कहीं नेणती ' ए. भा. १३–२७५ ते २७७. ) अशा प्रकारचें मलीन मन शुद्ध करण्याचें चार मार्ग आहेत. ते म्हणजे निष्कामकर्म, उपासना, योग व ज्ञान. सर्वांत सोपा मार्ग उपासना हा आहे. ( ' महामळें मन होतें जें गांदलें । शुद्ध चोखाळलें स्फटिक जैसें ' तुका. १८२८. ) शुद्ध चित्त झालें असतां भगवंत त्यांत येऊन वास करतात. ( ' तुका म्हणे चित्त करावें निर्मळ । येऊनि गोपाळ राहे तेथें ' तुका. २४७३ ' तरी जयांचे चोखटें मानसीं । मी होऊनि असें क्षेत्रसंन्यासी ' । ज्ञा. ९–१८८ ) परंतु असें मन शुद्ध करून भगवंताला अर्पण करणें हें फार कठीण होण्यास्तव भगवंत अर्जुनाला तें मन स्थिर करण्याचा उपाय पुढील ओव्यांतून सांगतात.

**ओंवी १०५—पाहार**-प्रहर, सबंध दिवसाचा आठवा भाग, तीन तास—भगवंत चित्त आवरण्याचा फारच सुलभ उपाय सांगत आहेत; चार प्रहर दिवस व चार प्रहर रात्र असते; अशा आठ प्रहरांमधून भगवंत फक्त त्यांना

एक क्षणभरच अंतःकरण द्यावयास सांगत आहेत; अशा प्रकारें भगवंतांनीं मनुष्यप्राण्यांना मोठी सवलत दिली आहे; **मोटकें**-मोजकें, परिमित, थोडें; **निमिष**-निमिख, डोळयाच्या पापण्या मिटण्यास लागणारा वेळ, क्षण.

**ओवी १०६—अरोचक**-अरुचि, अनावड, वीट—एखाद्या सामान्य विषयाची गोडी लागली व त्या विषयापासून सुख प्राप्त होऊं लागलें तर मनुष्य इतर विषयांची उपेक्षा करतो; मग परमात्म्याचें सुख तर 'महासुख'च आहे. म्हणून त्याची गोडी लागली असतां विषयसुखाविषयीं अरुचि उत्पन्न व्हावी यांत मुळींच आश्चर्य नाहीं. ज्याच्या तोंडाला साखर लागली त्याला ज्याप्रमाणें पेरू फिका लागतो त्याचप्रमाणें ज्याला परमात्मसुखाचा लाभ झाला त्याला विषयसुखाबद्दल आपोआपच अनावड उत्पन्न होते. ('जंव तुझें रूप नोहे दिठे । तंव जगासि संसारिक गोमटें । आतां देखिलासि तरी विषयविटें । उपनला त्रासु' ज्ञा. ११—३२१ 'दृष्टे भवति प्रभवति न भवति किं भवतिरस्कारः' आचार्यकृत—षट्पदी. 'ब्रह्मरसें गेलें भरूनियां अंग । आधील तो रंग पालटला' तुका. ३६३०. 'आतां कोठें धांवे मन । तुझे चरण देखिलीया' तुका. १५४९. 'याचें सुख तुम्हां कळालियावरी । मग दारोदारीं न फिराल' तुका. २३.)

**ओवी १०७—शरत्कालु**-शरद् ऋतु. **रिगे**-प्रवेश होतो. **वोहटु**-ओसरू. पावसाळयांत नदीचें पाणी दिवसेंदिवस वाढत असतें 'कां वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पांडुसुता' ज्ञा. १२—३६ ) परंतु शरदृतूंत म्हणजे आश्विन व कार्तिक या महिन्यांत तें दिवसेंदिवस कमी होत जातें.

**ओवी १०८—पुनव**-पौर्णिमा.

**ओवी १०९—निगतां**-निघत निघत—हा 'क्रमयोग' आहे. एकदम विषयांतून चित्त निघणें फार कठीण आहे. अभ्यासानें तें हळूहळू काढावें लागतें. ज्याचें मन सहजगत्या भगवंताकडे जात नाहीं त्याला तें पहिल्यांदा बळेंच त्याच्याकडे लावावें लागतें. एकदां त्या मनाला परमात्मसुखाची गोडी लागली मग तें आपोआप त्याच्याकडे जाऊं लागतें. जसें पूर्वीं मुलींचीं लग्नें त्यांच्या लहान वयांतच होत असत. मुलगी आठ वर्षांची झाली कीं तिचें लग्न

करीत. तिच्याबरोबर सासरीं पाठराखण म्हणून तिची एखादी बहीण धाडीत. ती ज्या वेळीं सासरी जाई त्या वेळीं तिला सारखी माहेरची ओढ असे; पण पुढें ती मोठी झाली, तिला मुलें वगैरे झालीं व तिला सासरची गोडी लागली, मग तिला माहेरीं येण्याबद्दल जरी पत्र पाठविलें तरी ती येत नाहीं उलट पत्रानें बापालाच आपल्या घरीं बोलावतें. अशीच गोडी परमात्मसुखाबद्दल लागण्याकरितां प्रथमतः मनाला हळूहळू परमात्म्याकडे न्यावें लागतें. ('शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया' गी. ६-२५ 'तुका म्हणे यासी न चले तांतडी। अनुभवें गोडी येईल कळों' तुका. ३७५६.) मीचि-मद्रूप.-चित्ताचा व परमात्म्याचा सजातीय संबंध होण्यास्तव चित्त हें संकल्पनाशांत परमात्मस्वरूपच होऊन जातें. ('ना तें समुद्रचि होऊन ठेलें। तेविं चित्ताचें चैतन्य जाहालें। जेथ यातायात निमालें। घनानंद जें॥' ज्ञा. ८-८५).

ओवी ११०—म्हणिजे-म्हटला जातो. जाणिजे—समजला जावा. न निपजे-उत्पन्न होत नाहीं.-अभ्यासानें या जगतांत सर्व गोष्टी प्राप्त होतात. ('अगा उपायबळें पंगु। पहाड ठाकी' ज्ञा. ८-८१. 'ओलें मूळ भेदी खडकाचें अंग। अभ्यासासी सांग कार्यसिद्धि' तुका ३४२० 'असाध्य ते साध्य करितां सायास। कारण अभ्यास तुका म्हणे' तुका-३१३६).

ओवी १११—एका-एकांना. गति-गमन, गमनसामर्थ्य. अंतराळें-आकाशांतून.-योगाभ्यासानें योग्यास 'अणिमा, गरिमा, लघिमा इत्यादि अष्ट-महासिद्धि प्राप्त होतात. त्याला मग आकाशांतून चालता येतें. ('पवनाचा वारिका वळघे। ज्ञा. ६-२७०) मच्छिंद्रनाथांचे शिष्य गोरखनाथ यांची अशी एक गोष्ट सांगतातः—ते एकदां गांवांत भिक्षा मागावयास गेले असतां त्यांना कोणीहि भिक्षा घाली ना. तेव्हां त्यांनीं पतंगाचा दोरा घेऊन तो आकाशांत उडवून दिला व त्याच्या वरच्या टोंकाला ते आकाशांत मांडी घालून स्थिर बसले. तो चमत्कार पाहून सर्व गांव तेथें लोटला व मग त्यांना लोकांनीं पुष्कळ फळें व धान्य अर्पण केलें. प्रांजळे-सरळ, नम्र.-सर्कसीमध्यें एका

थाळींत जन्मतः हाडवैर असलेले असे सिंह, हत्ती, वाघ, गाय इत्यादि प्राणि एकत्र पाणी पितात.

**ओंवी ११२—आहारीं पडे**—पचनीं पडते.–कित्येकांना दररोज अफू खाण्याची संवय असते. पुढे पुढे अभ्यासाने ते एका वेळेस एक तोळ्यापर्यंत अफू खाऊं शकतात. ( ' साधूनी बचनाग खाती तोळा तोळा । आणिकातें डोळां न पाहवे ' तुका–३१३६ ) **थोकडें**–अल्प, ल्हान–वेद हे अनंत आहेत ' अनंता वै वेदाः .' परंतु ब्राह्मण ते पाठ करून मुखोद्गत करतात म्हणजे त्यांना आटोक्यात आणतात. ( ' ऋग्वेदादि तिन्ही प्रतिष्ठीजती वाग्भुवनीं । केली जैसी वदनीं ब्रह्मशाळा ' ज्ञा. १७–२१२. ' जेथ अखंड वसिजे यागीं । जे वेदांची वज्रांगीं ' ज्ञा. ९–४७६.

**ओंवी ११३—दुष्कर**—कठीण, अप्राप्य. **अभ्यासें**—अभ्यासानें–परमार्थाच्या बाबतींत आळस करूं नये व माझ्या प्रारब्धात परमार्थ नाहीं असें म्हणूं नये ( ' येथे न घलीं न घलीं आड । संचितसा शब्द नाड ' तुका–२४०३ ) उलट सतत अभ्यास करावा ( ' तेविं सदभ्यासे निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर । लावी मग शरीर असो अथवा जावो ' ज्ञा. ८–८२ ). या जन्मात जरी यश आले नाहीं तरी सदभ्यास हा कधींहि फुकट जात नाहीं. ( ' न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ' गी. ६–४० ).

**ओंवी ११४—कसु**—बळ, शक्ति, सामर्थ्य–भगवंत हे आत्यंतिक कारुणिक असल्यामुळें ते भगवद्प्रातीचे निरनिराळे मार्ग सांगत आहेत. मनाचें आकलन करून तें बुद्धीसह परमात्म्याला अर्पण करण्यास ' यमनियम ' हे लागतात. शिवाय मन एकाग्र होण्याकरितां एकांतांत जाऊन बसावें लागतें. ( ' काळ सारावा चिंतने । एकांतवासीं गंगास्नानें ॥ तुका–३०६४. ) त्याचप्रमाणें रोज नियमानें, क्षणभर कां होईना, भगवंताचें मनानें चिंतन करणें हेंहि कठीण आहे. अशा प्रकारचा अभ्यास सामान्य लोकांकडून होणें शक्य नसतें. ( ' आणि यमनियमांचे डोंगर । अभ्यासाचे सागर ॥ ज्ञा.५–१५९.) येवढयाकरितां भगवंत त्या दोहोंपेक्षां सुलभ असा मार्ग सांगत आहेत. **भंगी**–रीत, वळण, स्थिति.–तूं ज्या स्थितींत म्हणजे ज्या कुळांत असशील व

वर्णाश्रमधर्मांप्रमाणें जीं कर्मे तुझ्या वांट्याला आलीं असतील त्यांतच तूं समाधानानें रहा. बायका, पोरें, घरदार इत्यादिकांचा त्याग करण्याची जरूरी नाहीं.

**ओवी ११६—चाळीं**-चालव.-गृहस्थाश्रम टाकण्याची मुळींच जरूरी नाहीं ( ' कां सांडिसी गृहाश्रम । कां सांडिसी क्रियाकर्म । कां सांडिसी कुळींचे धर्म । आहे ते वर्म वेगळेंचि ' ज्ञा. गा.-४६६ ) एवढेंच नव्हे तर तूं आपले कुळधर्म चालू ठेव. फक्त स्वैराचरण करूं नकोस मग तुला उद्योग वगैरे करण्यास पूर्ण मोकळीक आहे. **सरळी**-मोकळीक.

**ओवी ११७—व्यापारू**-कर्म. **न म्हणें**-म्हणूं नकोस.-तूं कर्तेपणाचा अभिमान घेऊं नकोस. कर्मांमध्यें कर्तृत्वमद व फलास्वाद हीं बाधक असतात, भगवंत हीं तूं घेऊं नकोस असें सांगतात. ( ' तैसा कर्तृत्वाचा मदु । आणि कर्मफळाचा आस्वादु । या दोहींचें नांव बंधु । कर्माचा कीं' ज्ञा. १८-२०५)

**ओवी ११८—चळतसे**-चालते-परमात्म्याच्या सत्तेखेरीज जगतांत एकहि गोष्ट होत नाहीं. ( ' गतिर्भर्ताप्रभुः साक्षी ॥ निवासः शरणं सुहृत् ' गी.९ -१८ ' तैसीं ईश्वरसत्तायोगें । चेष्टती भूतें ' ज्ञा. १८-१३११. ' चाले हें शरीर कोणाचिये सत्ते । कोण बोलवितें हरीविण ' तुका-३७१५. ) जेथें आग्रह असतो त्या ठिकाणीं दुःख संभवतें. मी अमुक एक गोष्ट करीनच किंवा करणार नाहीं असा आग्रह धरूं नकोस. जें काय परमात्मा करील त्यांतच आपलें हित आहे असें समजून रहा.

**ओवी ११९—उणेया**-अपूर्णता, न्यूनता, असांग. **पुरेया**-पूर्णता, सांगता. कर्मांच्या सांगतेबद्दल व असांगतेबद्दल मनाचा समतोलपणा राहणें हेंच बुद्धियोगाचें अथवा निष्कामकर्मयोगाचें सार आहे ( ' देखें संतासंतीं कर्मीं । हें जें सरिसेपण मनोधर्मीं । तेचि योगस्थिती उत्तमीं । प्रशंसिजे ' ज्ञा. २-२७२.) अशा वृत्तीनें राहाणाऱ्या माणसास सुखदुःखाचे आघात कमी बसतात. व्यवहारामध्यें प्रयत्न करून मनुष्याच्या मनासारखी गोष्ट झाली नाहीं म्हणजे तो आपलें प्रारब्ध फुटकें आहे असें समजतो व त्यामुळें खिन्न होतो. मनासारखी गोष्ट झाली म्हणजे म्हणतो कीं, मी होतों, म्हणून काम झालें व त्यामुळें

फुगून जातो. वास्तविक परमेश्वराचें जें सूत्र आहे त्याच्यांत आपली क्रिया बसली म्हणजे यश येतें व नाहीं बसली तर अपयश येतें. एवढ्याकरितां भक्त जो आहे तो कर्माची अहंता आपणांकडे घेत नाहीं. करता करविता नारायणच आहे असें तो समजतो ('करिता नारायण एवढें वेचितां वचन । तुका–३७२४.) कर्माचा आरंभ करणे हें मनुष्याच्या हातातलें आहे व तत्सिध्यर्थ प्रयत्न करणें हेंहि त्याचें कर्तव्य आहे. परंतु असा दीर्घ प्रयत्न करूनहि यश येईलच असें मात्र सांगतां येणार नाहीं ( चुकलीया चुके । आपादिलिया भलें होय । तरी दुःख दारिद्र भोगी कवण । तरि अवघेचि विश्व कां सुखी नव्हे रया ।। ज्ञा. गा. ४९९ ) एवढ्याकरतां मनुष्यानें प्रयत्न करावा परंतु त्यांत यश आले नाहीं तर खिन्न न होतां परमेश्वर जें करील त्यांतच आपलें हित आहे अशी वृत्ति ठेवावी. ( ' जें कांहीं करितो तें माझें स्वहित । आली हे प्रचित कळों चित्ता ' तुका–१८७५. )

**ओवी १२०—जेउतें**-जिकडे.–माळी हा पाण्याचा पाट कधीं उंसाला, कधीं मिरच्यांना, कधीं कांद्याबटाट्याकडे लावतो. परंतु पाणी कधी माझा पाट उंसाकडेच लाव मिरच्याकडे लावू नकोस असा आग्रह धरीत नाहीं त्याचप्रमाणें प्रपंचामध्यें परमात्मा ठेवील तसें समाधानतेनें राहावें. ( ' उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ' तुका–३७४२. ' ठेविलें अनंतें तैसेंचि राहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ' तुका. ३७१०.) समाधानीनें राहावें ह्याचा अर्थ आळशी बनावें असा नव्हे. प्रयत्न आवश्य करावा परंतु यशापयशाला परमेश्वर कारण आहे असें समजावें. तात्पर्य, प्रारब्धवाद व प्रयत्नवाद या दोहोंपेक्षां ईश्वरकारणवाद (Divine Determination) हाच अधिक श्रेष्ठ आहे.

**ओवी १२१—सुभटा**-चांगल्या योध्या (अर्जुना) **खटपटा**–खटपट, दगदग, वाटाघाट.

**ओवी १२२—वोझीं**-ओझीं, भार.–मी कर्म करीन किंवा कर्म करणार नाहीं या वृत्तींना भार असें म्हणण्याचें कारण, कर्म करणारा हा आत्मा नसून शरीरादि संघात आहे. मनुष्याला आपल्या डोक्याचा किंवा अवयवाचा भार

वाटत नाहीं. कारण तो त्याच्या शरीराचाच भाग आहे. नेहमीं विजातीय गोष्टींचाच भार वाटत असतो. जीव हा मूळचा आत्मस्वरूप आहे म्हणून कर्माचा कर्ता जीवहि होऊं शकत नाहीं. कर्में हीं अंतःकरणांत ज्या ज्या गुणांचा उत्कर्ष होतो तदनुसार मनबुद्ध्यादि इंद्रियांकडून व शरिराकडून होतात. सत्वगुणाचा उत्कर्ष झाला असतां सात्विक क्रिया होतात. रजोगुणाचा उत्कर्ष झाला असतां राजस क्रिया होतात व तमोगुणाचा उत्कर्ष झाला असतां तामसिक क्रिया होतात. ('इंद्रियें गुणाधारें । राहाटती निजव्यापारें । तें परकर्म बळात्कारें । आपादी जो' ज्ञा. ३–१८५.) त्यांत आत्म्याचा व कर्माचा मुळींच संबंध नाहीं. ('तरि सत्यचि गा धनुर्धरा । सर्व कर्मांचा उभारा । होतसे बाहिरबाहिरा । करणीं पांचे' ज्ञा. १८–३०४ 'येर आत्मतत्व उदासीन । ते ना हेतु ना उपादान । ना तें अंगें करी संवाहन । कार्यसिद्धीचें' ज्ञा. १८–३०६.) पण जीव हा अज्ञानामुळें बुद्धीपासून देहापर्यंतचा सर्व संघात मीच आहे असें समजून त्याच्याशीं तादात्म्य करतो व त्यामुळें कर्माचा कर्ता मीच आहे असें तो समजतो. वास्तविक कर्माचा कर्तेपणा अगर अकर्तेपणा हा संघाताचा आहे. जीव हा निष्कारण तो आपल्याकडे घेतो म्हणून ह्या ठिकाणीं या वृत्तींना 'ओझीं' असें म्हटलें आहे. **अखंड**-निरंतर. ('आम्हीं विष्णुदासीं देव ध्यावा चित्ते । होणार तें होतें प्रारब्धें ॥ तुका. १८५६)

**ओवी १२३—थोडें बहु**-कमीअधिक, सांग असांग, पूर्ण अपूर्ण. **न म्हणिजे**-म्हणूं नयें.-कर्म हें परमात्म्याला अर्पण करण्यांत त्याची पूर्णता आपोआपच होते. कर्ता हा जोंपर्यंत अपूर्ण आहे तोंपर्यंत त्याचीं कर्में हीं नेहमीं अपूर्णच होणार. कर्में पूर्ण होण्याकरितां कर्ता हा पूर्ण म्हणजे ब्रह्मानुभवी व्हावा लागतो. **अर्पिजे**-अर्पण केलें जावें.

**ओवी १२४—भावना**—भक्ति, श्रद्धा, निष्ठा. ज्ञानेश्वरांच्या मतें विहित कर्म करून तें ईश्वराला अर्पण करणें ही अखंड होणारी भक्ति आहे. ('हेंचि ईश्वरीं कर्मयोगें । भजनकथनाचें खागें ।' ज्ञा. १८–१४४३–४४. 'हें विहित कर्म पांडवा । आपुला अनन्य वोलावा । आणि हेचि परम सेवा ।

**मज** सर्वात्मकाची ॥' ज्ञा. १८-९०६ ). **सायुज्यसदना**—सायुज्यरूपी घराला, ऐक्यरूपी घराला.-सायुज्य म्हणजे ब्रह्मरूपता. यालाच चौथा मोक्ष म्हणतात. ('यया ब्रह्मत्वासीचि पार्था । सायुज्य ऐसी व्यवस्था ॥' ज्ञा. १४-४०१ ). कर्म भगवंताला अर्पण करण्यांत भक्ताला सायुज्यता मुक्ति मिळते म्हणजे पुन्हां जन्म घ्यावा लागत नाहीं, ह्याचें कारण जन्म देणारें जे कर्म ते त्यानें भगवंताला अर्पण केल्यामुळें भोग देण्यास तें शिल्लक राहात नाहीं. ('अगा कर्में जें उरावें । तें तिहीं सुखदुःखीं फळावें । आणि तयातें भोगावया यावें । देहा एका ॥' 'तें उगाणिलें मज कर्म । तेव्हांचि पुसिलें मरण जन्म । जन्मासवें श्रम । वरचिलहि गेले ॥' ज्ञा. ९-४०३-४०४). कर्म अर्पण करण्यांत भक्तांकडून क्रियमाण कर्म होत नाहीं.

**ओंवी १२५—नेदवे**—देववत नसेल.-विहित कर्म अहंकारमद म्हणजे कर्तृत्व टाकून ईश्वरार्पण बुद्धीनें म्हणजे फलत्यागपूर्वक करणें शक्य होत नसेल तर भगवान् आणखी एक मार्ग सांगतात. शास्त्रोक्त कर्म होणे फार कठीण आहे. कित्येक वेळां कर्म काय व अकर्म काय हें ठरविणेंच कठीण जातें. ('कर्म म्हणिजे तें कवण । अथवा अकर्मा काय लक्षण । ऐसे विचारितां विचक्षण । गुंफोनि ठेले ॥' ज्ञा. ४-८५ ) शिवाय कर्तृत्वमद व फलास्वाद टाकणें हेंहि कठीण आहे. **भज**-आचरण कर, अनुष्ठान कर.

**ओंवी १२६—बुद्धीचिये**—बुद्धीच्या, संकल्पाच्या. **पाठीं**—मागें म्ह. पूर्वी **पोटीं**—पुढें, अंतीं. **मातें बांधणें**—मला गोवणें, माझें स्मरण करणें, मला अर्पण करणें.-संकल्पाच्या पूर्वी म्हणजे 'संकल्पाचा प्रेरक परमात्मा आहे असें समजणें.' ('बुद्धीचा जनिता लक्ष्मीचा पति । आठवितां चित्तीं काय नव्हे ॥' तुका १८४५ ). व संकल्पाच्या अंतीं म्हणजे 'संकल्प-सिद्धीनंतर' परमात्म्याचा आठव करणें हें जर तुला शक्य नसेल; त्याचप्रमाणें कर्माच्या आरंभीं म्हणजे 'कर्म करण्यास प्रेरणा देणारा हा परमात्माच आहे' व कर्माच्या अंतीं म्हणजे 'कर्म सिद्धीस' नेणाराहि तोच आहे असें समजणें जर तुला कठीण वाटत असेल तर हीं दोन्ही राहूं दे. **दुवाड**-द्वाड, कठीण.

**ओंवी १२७—हेंहि**—हेंसुद्धां.-कर्माचें कर्तृत्व व कर्माची फलसिद्धि **हीं** दोन्हीं परमात्म्याचींच आहेत अशी तुझी समजूत होत नसेल तर हेंहि राहूं **दे. अतिसो**—आग्रह, हव्यास. **सांडीं**—सोडून दे. **संयतिसीं**—निग्रहाचें ठिकाणीं. **बुद्धि वसो**—बुद्धि राहूं दे.—कर्माबद्दल कर्तृत्वमद व फलास्वाद न घेण्याविषयीं तुझ्या बुद्धीचा निग्रह राहूं दे.

**ओवी १२८—घडतीं**—घडतात.

**ओवी १२९—लोटती**—टाकून देतात, उपभोग घेत नाहींत. **निपजलीं**—झालेलीं. **सिद्धें**—पूर्ण, सफल.

**ओवी १३०—धरावें**—स्मरावें. **शून्यीं**—आकाशांत. **शून्यीं जाऊं दे**—आकाशांत जाऊं दे म्हणजे निष्फल होऊं दे.—कर्माचें कर्तत्व व फलास्वाद **तूं** आपल्याकडेहि घेऊं नकोस व मलाहि अर्पण करूं नकोस. तर हीं दोन्हीं तशींच राहूं दे.

**ओवी १३१—वर्षलें**—वृष्टि झाली. **मानीं**—लेख, समज. **देखिलें**—पाहिलें.

**ओवी १३२—आत्मजेच्या**—मुलीच्या. **जिवु**-( बापाचा ) जीव म्हणजे मन. **निराभिलाषी**—कामनारहित.—बाप हा जसा आपल्या मुलीविषयीं विषयवासना-रहित असतो, येवढेंच नव्हे तर तिच्या पैशाचीहि तो अपेक्षा करीत नाहीं.

**ओवी १३३—वायां**-व्यर्थ. **क्रिया**—कर्म. **जिरों दे**—नष्ट होऊं दे.

**ओवी १३४—आवडे**—वाटतो. **कीर**—खरोखर. **धुरेचा**—अग्रभागाचा, पहिल्या प्रतीचा, श्रेष्ठ, अग्रगण्य—यथासांग कर्म करून तें आकाशांत दवडणें अशा प्रकारचा योग, हा भगवंताला कर्म अर्पण करण्यापेक्षां श्रेष्ठ आहे. कारण जी वस्तु अर्पण करावयाची तिच्यावर आपली सत्ता लागते. ती वस्तु आपल्या मालकीची असावी लागते. आपल्या घराच्या समोर असलेलें दुसऱ्याच्या मालकीचें घर जर आपण दान केलें तर तें योग्य होणार नाहीं कारण तें घर आपल्या मालकीचें नाहीं. तद्वतच जें कर्म आपण भगवंताला अर्पण करतो त्याचे मालक आपण नाहीं; त्या कर्माचा मालक देहादि संघात आहे. कर्माचे कर्ते आपण नसल्यामुळें आपल्याला कर्म भगवंताला अर्पण करण्याचा हक्क

पोहचत नाहीं; तेव्हां कर्माचें कर्तृत्व न घेणें व कर्म भगवंताला अर्पण होवो असेंहि न म्हणणें ही उच्च कोटी ठरते. **असलग**–सोपा–अशा प्रकारचा फलत्याग हा सोपा आहे असें वाटतें परंतु खरें तसें नाहीं. अशी वृत्ति येणें ही कठीणांतील कठीण गोष्ट आहे. ज्यावेळेस कर्ता हा ब्रह्मरूप होतो म्हणजे स्थूल सूक्ष्म संघातापासून ( 'प्रकृतिपासून' ) आपल्याला वेगळा समजून 'मी ब्रह्म आहे' असें समजतो त्यावेळेस त्याच्याकडून खरा कर्माचा त्याग होतो. ( 'आणि कर्माची जन्मभोये । प्रकृति जे कां आहे । ते आपण याहूनि बहुवे । देखसी दूरीं' ।। ज्ञा. १८–१२६३. 'घडे ज्ञानप्रधानु हा ऐसा । संन्यासु जया वीरेशा । तोचि फळभोग सोसा । मुकले गा' ज्ञा. १८–२६१. 'सर्व कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते' ।। गी. ४–३३ ). अशाप्रकारचा कर्मत्याग ब्रह्मज्ञानानंतरच संभवतो. ज्ञानी भक्त प्रकृतिपासून उत्पन्न होणाऱ्या कर्माचा अभिमान घेत नाहीं व तीं कर्महि भगवंताला अर्पण करीत नाहीं. कर्म स्वभावतःच ईश्वरार्पण होत असतें कारण तें त्याच्या सत्तेनेंच होतें. ( आहे तें सकळ कृष्णासी अर्पण । न कळतां मन दुजें भावी' ।। तुका. ३७७८. )

**ओवी १३५—न विरूढे**–उगवत नाहीं.–कर्म पुन्हा जन्म देण्यास उरत नाहीं. कर्ता हा ब्रह्मरूप झाल्याकारणाने त्यांचीं कर्महि ब्रह्मरूप होतात. ( 'ब्रह्मस्वरूपाचीं कर्मे ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ' तुका. ३७६८ ).

**ओवी १३६—येरझारे**–( जन्ममृत्युरूपी ) येण्याजाण्याला.–जीवाच्या मागें जन्ममृत्युरूपी अनिष्ट चक्र अनादि कालापासून लागलेलें आहे. ( 'किती वेळां जन्मा यावें । किती व्हावें फजीत' तुका, १७५७. 'जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च' गी. २–२७. 'उपजे ते नाशे । नाशिलें पुनरपि दिसे । हे घटिकायंत्र तैसें परिभ्रमे गा' ज्ञा. २–१५९. 'क्षण एक तोही नाहीं विसावा । लक्षचौऱ्याशीं घेतल्या धांवा' तुका. ४६३. ) वारंवार जन्मणें व वारंवार मरणें ह्यालाच 'येरझारा' म्हणतात. **सरे**–संपते.–भक्त हा कर्माचा कर्तृत्वमद व फलास्वाद घेत नाहीं म्हणून तें त्याला पुनर्जन्माला कारणीभूत होत नाहीं ( ' त्यांची सरली येरझार । जाला सफळ व्यापार' तुका. २९६५.) **चिरा पडे**–दगड पडतो, बंद होते.–भक्ताकडून क्रियमाण कर्म होत नाहीं

प्रारब्धकर्म प्रस्तुत जन्मांत भोगून संपतें. संचित कर्म हें त्याला जें ब्रह्मज्ञान प्राप्त झालेलें असतें त्यामुळें तें दग्ध होतें म्हणून तेंहि त्याला उत्तर जन्माला कारणीभूत होत नाहीं. यामुळें देहपातानतर तो पुन्हां जन्माला येत नाहीं.

**ओवी—१३७ ठाकिजे**–प्राप्त होते. **पाउटीं**–पायरीनें.–हळुहळू प्रपंचांतून मन काढून तें भगवंताकडे लावणें हाच आहे अभ्यास ( ' अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे ' ज्ञा. १२–११० ) अशा अभ्यासाच्या योगानें हळूहळू चित्तशुद्धि होते. व त्यामुळें सत्संगतीची आवड उत्पन्न होते. सत्संगतीनें मनुष्य शास्त्राभ्यास करूं लागतो व शास्त्राभ्यासानें भगवंताचें परोक्षज्ञान प्राप्त होतें. ध्यानाला परोक्षज्ञानाची आवश्यकता आहे. ध्यान कोणाचें करावयाचें व कसें करावयाचें हें परोक्षज्ञानानें कळतें. ध्यानामध्यें गुरूनें ज्या ' तत्त्वमसि ' महावाक्याचा उपदेश केलेला असतो त्या महा-वाक्याचें ठिकाणीं धारणा करावी लागते. ( ' गुरुवाक्यें उठविला । बोधीं निश्चयो आपुला । न्याहाळीं हातीं घेतला । आरिसा जैसा ॥' ज्ञा. १८–१०३२,) आत्मप्राप्ति करिता ' अहंग्रह ' ध्यान करावें लागतें. ध्येय स्वरूप जें ब्रह्म त्याच्याशीं जीवानें आपला अभेद करून चिंतन करणें ह्यालाच ' अहंग्रह ' ध्यान म्हणतात.

**ओवी १३८—खेंव**–आलिंगन. **भाव**–मनोवृत्ति. **दूरी ठाके**–बाजूला राहतें, सुटतें, थांबतें.–इंद्रियांचे सर्व व्यापार हे मनावर अवलंबून असतात. इंद्रियांकडून कोणतीहि क्रिया होण्यापूर्वी तिचा संकल्प पहिल्यांदा मनांत उत्पन्न व्हावा लागतो. ( ' आवडे ते वृत्ती किरीटी । आधीं मनौनी उठी । मग ते वाचे दिठी । करांसि ये' ज्ञा. १३-२९८) मन जर एखाद्या विषयांत निमग्न असलें तर इतर इंद्रियांकडून त्यांचीं आपआपलीं कामें योग्य रीतीनें होत नाहींत. रस्त्यावरून जरी चौघडा वाजत गेला तरी त्याचें भान नसतें. गोकुळांतील गौळणींची स्थिति भगवंताच्या वेधामुळें अशी झाली होती. ( 'दंतधावनाचा मुखामाजी हात। वाद्यें वाजती नायके जनमात' तुका–१३१) त्याचप्रमाणें भक्ताचें चित्त भगवद्ध्यानांत लीन झाल्याकारणानें त्याचें कर्म आपोआप सुटतें. ( ' अनुहातीं गुंतला नेणे बाह्य रंग । वृत्ति येतां मग बळ

लागे ’ तुका–३६०२, ‘ जें नानागतीतें पाववितें । तें चित्त वरील आत्मयातें । मग कवण आठवी देहातें । गेलें कीं आहे. ’ ज्ञा. ८–८३, )

**ओवी १३९—दुरावें**–थांबतें.–ज्या वृत्तीनें कर्माचा अभिमान धरावयाचा किंवा कर्मफलाचा त्याग करावयाचा तीच वृत्ति ध्यानाच्या योगानें परमात्म्यांत विलीन झाल्यानंतर कर्ता हा कर्तारूपानें वेगळा शिल्लक राहत नाहीं. कर्ता हाच ब्रह्मरूप झाल्याकारणानें त्याच्या ठिकाणीं कर्ता. कर्म व क्रिया ही त्रिपुटी राहात नाहीं. **संभवे**–संभवतो, घडतो. **आंगवे**–स्वाधीन होते, प्राप्त होते. **शांति**–ब्रह्म, ब्रह्मस्थिति–सत्त्वगुणाच्या वृद्धीनें मनुष्याला शांति म्हणजे सहनशीलता प्राप्त होते, ती शांति येथें अभिप्रेत नाहीं, येथें शांति याचा अर्थ ‘ ब्रह्मस्थिति ’ असा आहे. ( ‘ तैसी ज्ञेया देतां मिठी । ज्ञातृत्वही पडे पोटीं । मग उरे तेंचि किरीटी । शांतीचें रूप ’ ज्ञा. १६–१४० ).

**ओवी १४०—शांति**–ब्रह्म.–जीवात्मा हा वाढत वाढत शेवटीं ब्रह्मस्वरूप होतो. त्याच्यापुढें जीवाची वाढ होत नाहीं. ( ‘ सा काष्ठा सा परा गतिः कठ-उ. १–३–११ ) ‘म्हणौनि ब्रह्मज्ञानापरौतें । वाढणें नाहीं जीवातें । तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं’ ॥ ज्ञा. १५--२०३. ‘देउळाचिया कामा कळसु’॥ ज्ञा. १८–९८१ ते ९८३. )

**ओवी १४१—गहन**–कठीण, खोल.–अभ्यासापेक्षां म्हणजे हळू हळू मन परमात्म्याकडे लावण्यापेक्षां शास्त्राभ्यास कठीण आहे. शास्त्राभ्यासाकरितां बुद्धि चलाख असावी लागते. शास्त्राभ्यासापेक्षां ध्यान अधिक कठीण आहे. कारण ध्यानाकरितां मनुष्य हा ‘सडा’ म्हणजे अपरिग्रही लागतो. (‘ सडे जे देखिले । ते ध्यानकासे लाविले ’ ॥ ज्ञा. १२–९१. ) शिवाय ध्यानांत भूतप्रतिबंध वर्तमान प्रतिबंध व भावी प्रतिबंध हे आड येतात. भूतप्रतिबंध म्हणजे पूर्वींचे भुक्त विषय–उदाहरणार्थ स्त्री, घरदार वगैरे डोळ्यासमोर येणें; वर्तमान प्रतिबंध म्हणजे विषयासक्ति व बुद्धिमांद्य व भाविप्रतिबंध म्हणजे अनेक शरीरारंभक प्रारब्ध कर्म.

**ओवी १४२—चांग**–चांगला, श्रेष्ठ. ध्यानाची परिपक्व अवस्था म्हणजे कर्मफल त्याग; ह्या अवस्थेंत कर्ता हा ब्रह्मरूप होऊन जातो. **भोग**–अनुभव.–

ध्यानामध्यें ‘ मी ब्रह्म आहे ’ असें स्फुरण असतें. ब्रह्मानुभव ही त्याच्या पलीकडची स्थिति आहे.

**ओवी १४३—पेणा**–मुक्काम, टप्पा. **माजिवटा**–मध्यभाग.

**ओवी १४४—जो**–जो ( प्राप्त पुरुष ).–या ओवीपासून उपासनाकांड संपून ज्ञानकांडास आरंभ झालेला आहे. जो शांतिप्रत प्राप्त झालेला आहे. म्हणजे जो आत्मानुभवी पुरुष आहे तो ओळखावयाचा कसा, हें समजण्याकरितां भगवान् या ठिकाणीं अद्वैतानुभवी भक्ताचीं चिन्हें म्हणजे लक्षणें सांगतात. सज्जन कोण व दुर्जन कोण हें त्या त्या व्यक्तीच्या आचारावरून व बोलण्यावरून कळत असतें. त्याचप्रमाणें अंतःकरणांत आत्मज्ञानाचा झालेला उदय हा त्या पुरुषाच्या इंद्रियांच्या व्यापारावरून कळत असतो. ( ‘ तैसें हृदयींचेनि ज्ञानें । जियें देहीं उमटती चिन्हें । ज्ञा. १३–१८३. ) ज्याप्रमाणें वसंतऋतूचा आगम हा झाडांना नवी पालवी फुटली म्हणजे कळून येतो. ( ‘ पैं वसंताचें रिगवणें । झाडांचेनि साजेपणें । जाणिजे तेवीं करणें । सांगती ज्ञान ’ ॥ ज्ञा. १३-१७८. ) त्याचप्रमाणें बोधवान पुरुषाच्या इंद्रियव्यापारावरून हा ज्ञानी पुरुष आहे असें कळून येतें. ( ‘ सर्वेंद्रियांच्या आंगणीं । विवेक करी राबणी । साचाचि करचरणीं । होती डोळे ’ ॥ ज्ञा. १४–२०६. ) **आपपरु**–आपला व दुसरा, द्वैतभाव.–ह्याला हाणून पाडावें किंवा त्याला उचलून धरावें अशा प्रकारची द्वैतभावना भक्ताच्या ठिकाणीं नसते. देवाचें वर्णन करतांना नेहमीं भक्ताची व भक्ताचें वर्णन करतांना नेहमीं देवाची उपमा देत असतात; कारण ह्यांची तुलना करण्याकरितां तिसरी योग्य वस्तुच सांपडत नाहीं; म्हणूनच या ठिकाणी सर्वव्यापी असणाऱ्या चैतन्याची उपमा दिलेली आहे; द्वैतभाव किंवा आपपरपणा हा नेहमीं परिच्छिन्नाच्या ठिकाणीं संभवतो. भक्त हा सर्वव्यापी जें चैतन्य तद्रूप झाल्याकारणानें त्याच्या ठिकाणचा द्वैतभाव नाहींसा झालेला असतो. ( ‘ एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा ’ ॥ ज्ञा. ५–९५. ) रस्त्यानें चालत असतांना दुसऱ्याचा धक्का लागून जर मनुष्य पडला तर तो दुसऱ्यावर रागावतो. परंतु केळ्याच्या सालींवर पाय पडून घसरल्यामुळें जो स्वतःच पडतो तो आपल्या पायावर रागावत नाहीं

किंवा तो तोडण्यासहि प्रवृत्त होत नाहीं. अथवा चावतां चावतां दांताखालीं जीभ चावली गेली तर मनुष्य दातहि पाडीत नाहीं व जीभहि तोडीत नाहीं कारण हीं दोन्हीं इंद्रियें त्याचींच असतात. ( आपली जिव्हा आपले दांतीं। रगडिली होय अवचितीं । तया कोपाची अतीप्राप्ती । कोणाप्रती करावी ' ए. भा. २३–७७७ ते ७८०. ) त्याचप्रमाणें ह्याचा आत्मभाव सर्व ठिकाणीं विकसित झाल्याकारणानें हा भक्त सर्वांना आपणच समजतो म्हणून त्याच्या ठिकाणीं दुजाभाव नसतो. ( ' तया बंधु कोण कह्याचा । द्वेषिया कवणु तयाचा। मीचि विश्व ऐसा जयाचा । बोधु जाहला ' ज्ञा. ६–९५ )

**ओवी १४५—धरिजे**–धरावे, भार सहन करावा. **नेणिजे**–जाणलें जात नाहीं.

**ओवी १४६—कृपाळू**–दयाळू.–श्रीमंताच्या किंवा राजाच्या घरीं वाटेल तसें खावयास मिळतें म्हणून राजाचे आयुष्य जरी संपलें तरी त्याच्या ठिकाणीं अधिक वेळ राहावें असा प्राण विचार करीत नाहीं. त्याचप्रमाणें गरिबाच्या घरीं खाण्याची सदा ददात असते म्हणून त्याचें आयुष्य संपण्याचे पूर्वीं त्याच्या शरीराचा तो त्यागहि करीत नाहीं. **चाळूं**–चालवावा, चलनवलन करावें. **परौतें**–पलीकडे, दूर. **गाळूं**–सोडावें, टाकून द्यावें.

**ओवी १४७—हरूं**–हरावी, नाहींशी करावी. **का**–पादपूरणार्थक अव्यय.

**ओवी १४८—एकपणें**–सारखी.–परळी वैजिनाथ येथें जगामित्र नागा म्हणून साधु होऊन गेले. त्यांच्याशीं व्याघ्रादि हिंस्रपशु खेळत असत. ( ' परळी वैजनाथीं जगमित्र नागा ' नामा. २१९१ ). **धात्री**–पृथ्वी, जन्मभूमि, आधार.–भक्ताच्या ठिकाणीं अमुप कृपा असते. ( ' जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥ ' तुका १९६२ ' दयार्णवत्वें द्रवली दृष्टी । तनु मन धन वेंचूनि गांठी । अनाथावरी करुणा मोठी । उद्धरी संकटीं दीनातें ॥' ए.भा.१०४६. ' कृपेसी स्वतंत्र जन्म नाहीं । ' ए.भा. ११--८२९ ). संत हे इतके कृपाळू असतात कीं ते स्वतः दुःख भोगतात व दुसऱ्याला सुख देतात.

**ओवी १४९—भाष**--भाषा, बोलणें. **माझें**–स्वतःचें.–' तूं 'च्या सापेक्ष ' मी ' असते. जसें प्रतिबिंबाच्या सापेक्ष बिंबाला ' बिंब ' हें नांव येतें. ज्याच्या

ठिकाणीं 'तूं' नाहीं त्याच्या ठिकाणीं 'मी' हि नसते. ( आणि तो हे भाष जेथ जाये । तेथें मी हें कोण्हासी आहे ॥' ज्ञा. १८--१२१० ) जेथें द्वैत असतें त्या ठिकाणीं 'तूं मी' ही भाषा संभवते व तेथेंच 'मी व माझें' असें असतें. परंतु सर्वच ठिकाणीं ओतप्रोत मीच मी भरलेला आहे अशा व्यापक अनुभवावर तो भक्त आल्याकारणानें त्याच्या ठिकाणचें द्वैतच नाहींसें झालेलें असतें. ( 'तुका म्हणे मी हें माझें न यो वाचे । येणें नांवे साचे साधुजन' तुका--३७८७ ) जाणणें--जाणीव, ज्ञान.--सुख किंवा दुःख ह्याचें ज्ञान चित्ताला होतें. ( देखावें नेत्रीं बोलावें मुखें । चित्ता सुखदुःखें कळों येती' तुका–२९८९. ) झोंपेंत चित्त अज्ञानांत लीन होतें म्हणून त्या वेळीं सुखदुःख, हर्षशोक इत्यादिकांचा अनुभव येत नाहीं. ( 'पैं निद्रिताचेनि आंगेंशीं । साप तैशी उर्वशी' ॥ ज्ञा. १४–३५४ ) त्याचप्रमाणें भक्ताचें चित्त आत्मबोधांत म्हणजे आत्मस्वरूपीं लीन झाल्याकारणानें त्याच्या ठिकाणीं सुखदुःखाची खबरहि नसते. ( 'चित्त महासुखीं पहुडलिया । चेवोचि नये' ॥ ज्ञा. ६–३७० ) ज्या ठिकाणीं देहतादात्म्य असतें त्या ठिकाणीं सुखदुःखाचें भान असतें. जसें गुंगींत देहतादात्म्य नसल्यामुळें सुखदुःखाचें संवेदन नसतें. ( 'एऱ्हवीं तरी सहजें । सुखदुःख तैंचि सेविजे । देहजळीं होइजे । मासोळी जैं ज्ञा. १४–३५१' )

**ओवी १५०—क्षमेलागीं**–सहनशीलतेसंबंधीं.–पृथ्वीला लोक भाजतात, खणतात पण ती कधींहि क्षुब्ध होत नाहीं. अशा प्रकारची 'अनाक्रोश' क्षमा भक्ताच्या ठिकाणीं असते. ( 'शांति म्हणजे ते ऐशी । सागरीं अक्षोभता जैसी' ए. भा.–७–१३६ ) ह्याचें कारण त्याच्या ठिकाणीं द्वैत नसतें. ( 'आंगा जें पातलें । तें करूनि घाली आपुलें । तेथ साहतेनि नवले । घेपिजेना' ॥ ज्ञा. १३–३५१. ) **पवाडु**–मोठेपणा, थोरपणा.– संतोष म्हणजे प्रसन्नता हें साधूचें 'ठळक' लक्षण आहे. ( आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं.' गी. २–७० 'जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें म्हणे ।' ज्ञा. २–३६३. ) त्याची प्रसन्नता खंडित नसते म्हणून त्रिविध दुःखाचे आघात जरी त्याच्यावर आले तरी त्याची प्रसन्नता बिघडत नाहीं. ( 'त्रिविध मुख्य आघवे ।

उपद्रवांचे मेळावे । वरि पडिलिया नव्हे । वांकुडा जो ' ॥ ज्ञा. १३-३४३)
**उत्संग**-मांडी. **घर**-आश्रय, स्थान.

**ओवी १५१—वार्षिया**-पावसाळा; वर्षाऋतु. **वीण**-शिवाय, वांचून-पाऊस पडला तरी समुद्र वाढत नाहीं व नाहीं पडला तरी तो आटत नाहीं. तर समुद्र हा स्वभावतःच जलसंपत्तीनें पूर्ण असतो, त्याची पूर्णता पावसाळ्यावर अवलंबून नसते. तद्वतच भक्त हे सदा आपल्या आनंदानेंच संतुष्ट असतात. **निरुपचारु**-निर्निमित्त, कारणाशिवाय; **उपचार**-( सेवापूजादि ) बाह्य साधनें, वस्तु. वास्तविक जीव हा मूळचाच आनंदरूप आहे. त्याला आनंद प्राप्त करून घेण्याकरितां कोणत्याहि इतर गोष्टीवर अगर निमित्तावर अवलंबून राहण्याचें कारण नाहीं. परंतु ही जीवाची आनंदरूपता नाहींशी होण्याचें कारण जीवानें आपलें मूळचें जें परमानंदरूपी राहण्याचें ठिकाण, ( ' ज्ञानदेवाघर चिदानंदीं । ज्ञा. गा. २१८ ' नारायणीं वसले घर । निरंतर आनंद तुका.-३६२० 'नारायणे तुरीयाख्ये । ए. भा. १५-१६ ) त्याचा अहंकाराला वश झाल्यामुळें, त्याग केला, व तो शरीररूपी गांवांत रहावयास आला म्हणजे त्यानीं शरीराशीं व इंद्रियांशीं तादात्म्य केलें. त्याचा परिणाम असा झाला कीं, त्याची सदासर्वकाळ निर्निमित्त असणारी संतुष्टता गेली व ती संतुष्टता आतां त्याची बाह्य विषय प्राप्तीवरच अवलबून राहिली. परंतु इंद्रियांचा व विषयांचा संयोग २४ तास राहूं शकत नाहीं व जरी कदाचित् टिकला तरी २४ तास विषय भोगण्याची इंद्रियांत ताकदहि नसते. याशिवाय विषयांतहि विपुल सुख देण्याचें सामर्थ्य नसतें. ( 'जयां विषयांच्या ठायीं । एकनिष्ठता कहीं नाहीं । तेथ दुःख आणि कांहीं । सुखहि दिसे ॥ ज्ञा. २-११३ ) म्हणून जिवाला अखंडित व निर्मळ सुख प्राप्त होत नाहीं. जोंपर्यंत सुख हें दुसऱ्यावर अवलंबून ठेवलें आहे तोंपर्यंत जिवाला दुःख हें होणारच ( ' गां दुग्धदोहामसतीं च भार्यां देहं पराधीनमसत्प्रजां च । वित्तं त्वतीर्थीकृतमंग वाचं हीनां मया रक्षति दुःखदुःखी ॥ ए. भा. ११-१९ ' ज्याचें देह पराधीन । तो जीवें सदा दीन । पराधीना समाधान । नव्हे जाण कल्पांतीं । ए. भा. ११-५६५ ' सांडोनि आपुली निजसत्ता । ज्यासी लागली पराधीनता । तो स्वप्नींहि सुखाची वार्ता

न देखे सर्वथा निश्चित । ए. भा. ११-५६६ ) असा नियम आहे "यत्तु स्वायत्तम् तत् सुखम्, यत्तु परायत्तम् तत् दुःखम्" परंतु या भक्तानें आत्मानात्मविवेक केला व विचाराच्या योगानें शरीरादिकांचे तादात्म्य टाकून दिलें, (देह नव्हे मी जडमूढत्वें । इंद्रियें नव्हें मी एकदेशत्वें । प्राण नव्हें मी चपलत्वें । मन चंचलत्वें कदा मी नव्हें । ए. भा. २५-३५३ चित्त नव्हे मी चेतकत्वें । बुद्धि नव्हें मी बोधकत्वें । अहं नव्हें मी बाधकत्वें । मीं तो आदि अनादिसिद्ध । ए.भा.२५-३५४ ) व त्यानें आपली वृत्ति अंतर्मुख केली, व तो आत्मस्वरूपाशीं तद्रूप झाला. ( ' मनें मन घालूनि मागें । विश्रांति जालिया आंगें । ते देहीं देहाजोगे । होतीचि ना । ज्ञा. १४-५० ) ह्याचा परिणाम असा झाला कीं तो आनंदरूप झाला. कारण आत्मा हा आनदरूप आहे. (तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्वसुखाचा आरामु । कीं भ्रांतासि कामु । विषयावरी । ज्ञा. ९-६० ) ( ' सर्व सुखाचें आगर । बाप रुखुमादेवीवर । ज्ञा. गा. १८ ' संतं समीपे रमणं रतिप्रदं । वित्तप्रदं नित्यमिमं विहाय ॥ अकामदं दुःखभयादि-शोकमोहप्रदं तुच्छमहं भजेऽज्ञा ॥ ए. भा. ८-३१ ) अर्जुना अनंत सुखाच्या डोहीं । एकसरा तळुचि घेतला जिहीं । मग स्थिराऊनि तेही । तेंचि जाहले ॥ ज्ञा. ५-१४४ ) म्हणून लौकिक बाह्य विषय प्राप्त होवो किंवा न होवो त्याची आनंदता कधींहि बिघडत नाहीं. ( देखें ऋद्धिसिद्धि तयापरी । आली गेली से न करी । तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं । ज्ञा.२.३६२ ) अशा प्रकारचें भक्त सदा सर्वकाळ आनंदरूप असतातच, परंतु त्यांच्याजवळ जे जातात तेहि आनंदरूप होतात. ( 'एवं व्रतः स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्त उच्चैः । हसत्यथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः । ए. भा. २-४० त्याचें गाणें ऐकतां । सुखरूप होय सज्ञान श्रोता । मुमुक्षां होय परमावस्था । जरी तो अवचिता गावों लागे । ए. भा. २-५६९ 'अनवरत आनंदे । वर्षतिये । ज्ञा. १२-१ )

**ओवी १५२—धरी**-धरतो, ताब्यांत ठेवतो-भक्ताच्या ताब्यांत अंतःकरण म्हणजे मन असतें, ह्याच्या उलट बाकी सर्व माणसें मनाच्या ताब्यांत असतात. जो मनाला जिंकील तोच खरा शूर, नाहीं तर अलेक्झांडरनें सर्व जग जिंकलें

परंतु शेवटीं आतां जिंकावयास कांहीं नाहीं म्हणून तो रडत बसला, कारण त्याला लोभ जिंकतां येई ना. तद्वतच नेपोलियननें जवळजवळ सर्व युरोप पादाक्रांत केला, पण तो आपल्या बायकोच्या पूर्ण अधीन असे, असें म्हणतात. यावरून त्याला काम जिंकतां येई ना. परंतु या भक्तानें सर्व विकारांच्यावर प्रभुत्व मिळविलें. खुद्द देवादिकांनाहि मनाला जिकतां आलें नाहीं. ( 'इंद्रा पडलीं भगें चंद्र झाला काळा । नारद चुकला चाळा भजनाचा–चांगदेव ) पण भीष्मादिकांनीं मनाला जिंकलें. वास्तविक भीष्मांचें पूर्वीचें नांव देवव्रत, परंतु त्यांनीं मनाला जिंकले म्हणून त्यांना भीष्म म्हणूं लागले ( मनोवशेऽन्ये ह्यभवन्स्म देवा मनश्च नान्यस्य वश समेति । भीष्मो हि देवः सहसः सहीयान् युंज्याद्वशे तं स हि देवदेवः । ए. भा. २३–४८ ) दुर्जय असें जें मन ( तुका म्हणे येणें । बहु नाडिले शहाणे तुका ३११६ ) ( चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ गी. ६–३४ ) तें महात्म्यांच्या पूर्ण ताब्यांत असतें ( ऐसया अंतःकरण । बाह्य येतां तयाची आण । न मोडी समर्था भेण । दासी जैसी ॥ ज्ञा.१८–९६० ) त्यांचें मन बहिःप्रवृत्त न होण्याचें कारण त्याच्या मनाला विषयांची अनित्यता व दुःखरूपता ही अपरोक्षरीत्या पटलेली असते. साचपण–खरेपणा–संत जे असतात ते कसलाहि प्रसंग आला तरी आपल्या नियमापासून ढळत नाहींत ( तुका म्हणे आम्हां । टळणेचि नाहीं नियमा ४८३ ) गोरोबाकाका कुंभाराकडून त्याचें मूल, भजनाच्या आनंदांत देहभान विवर्जित झाल्याकारणानें पायाखालीं तुडवलें गेलें. पुढें त्यांचें कुटुंब त्यांच्यावर रागावलें व तिनें त्यांना सांगितलें कीं तुम्ही माझ्या अंगाला स्पर्श करूं नका. त्यांनीं स्पर्श करण्याचें सोडून दिलें. पुढें गोरोबा झोंपेंत असतां त्यांच्या बायकोनें त्यांचे दोन हात आपल्या अंगावर ओढून घेतले, पुढें गोरोबांनीं आपले दोन्ही हात तोडून टाकले. ( ' वैराग्याचा मेरु । तो हा गोरा कुंभारु ' नामा. ६६४ ) संत हे आपला नियम मोडीत नसल्यामुळें निश्चयाचें खरें स्वरूप म्हणजे निश्चय कसा असतो हें त्यांच्या ठिकाणीं पाहावयास सांपडतें. निश्चयाला खरेपणा त्यांच्यामुळें प्राप्त होतो.

**ओवी १५३—जीवु परमात्मा**-आभास व कूटस्थ. ( अ. स्प. प्र. २ पहा ) वेदानें जीव व परमात्मा ( म्हणजे 'आभास' व कूटस्थ' ) हे दोन पक्षी एकाच शरीररूपी वृक्षावर व हृदयरूपी किंवा अंतःकरणरूपी घरट्यांत राहतात ( सुपर्णावेतौ सदृशौ सखायौ यदृच्छयैतौ कृतनीडौ च वृक्षे । एकस्तयोः खादति पिप्पालन्नमन्यो निरन्नोऽपि बलेन भूयान् ॥ ए. भा. ११-६ ) असें वर्णन केलें आहे. दोघेहि वास्तविक चिद्रूप म्हणजे ज्ञानरूप आहेत ( 'तुका म्हणे कैचीं कींव । कोठें जीव निराळा । तुका. ३५६३ ) परंतु चिदांश जो जीव तो चिद्रुप असतांना अज्ञानाला वश झाला व त्यानें देहाशीं भ्रांतिज तादात्म्य केलें. मीच देह असें तो समजूं लागला व त्याबरोबर मीं कर्म करणारा व मी कर्मफल भोगणारा असें समजूं लागला. सर्व परमात्मा असतांना परमात्म्याच्या ठिकाणीं तो प्रपंच पाहूं लागला, व त्यामुळें जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांत सांपडला. बुद्धीशीं म्हणजे शरीराशीं तादात्म्य करणारें जें चैतन्य त्यालाच 'जीव' म्हणतात ( ऐसे शरीराचि येवढें । जैं आत्मज्ञान वेगळें पडे । तैं माझा अंशु ऐसें आवडे । थोडेपणें । ज्ञा. १५-३४३ ) **ऐक्यासनी**-ऐक्यरूपी आसनावर-आतां या जीवाला जर 'शिव' म्हणजे परमात्मा व्हावयाचें असेल तर दुसरें कांहींहि करावयास नको, फक्त शरीराशीं व मनबुध्यादि संघाताशीं जें त्यानें तादात्म्य केलेलें आहे तें टाकलें म्हणजे झालें. ज्याप्रमाणें आकाशांतील सूर्यास पाण्याचें डबकें खालीं आणतें त्याचप्रमाणें अज्ञानाला वश झालेल्या अंतःकरणानें परमात्म्याला जीवत्वदशेला आणल्यासारखें दिसतें. ( हो कां गगनींच्या सूर्यासी । थिल्लर आणी अधोगतीसी । तेवीं नित्यमुक्त आत्मयासी । आणी जीवत्वासी निजकल्पना । हस्तामलक-१६८ ) ह्या अंतःकरणानें मी शरीर आहे ही कल्पना टाकली कीं जीव हा परमात्माच बनतो. ( ' जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरें तेंचि होये । तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥ ज्ञा. ६-८२ पैं बुद्धिभेदाचा आरिसा । तया हातोनि पडिला वीरेशा । म्हणौनि प्रतिमुखाभासा । मुकला तो ॥ ज्ञा. १४-१०४ ) या महात्म्यानें विचाराच्या योगानें स्थूल सूक्ष्म व कारण या तीन देहांचा निरास केलेला असतो. ( अ. स्प. प्र. २ पहा ) यामुळें तो कर्तृत्व, भोक्तृत्व

सुखदुःख हे धर्म बुद्धीचे आहेत; ' आभासाचे ' म्हणजे ' जीवाचे ' नाहींत असें जाणतो (जीवाचें सांडोनि अज्ञानत्व । शिवाचें सांडूनि सर्वज्ञत्व । दोहींचें शोधित जे लक्ष्यत्व । ऐक्यें निजतत्व साधिती ॥ ए. भा. २१-४७८ ) व म्हणून तो जीव परमात्म्याचें ऐक्य पाहतो. अशा प्रकारें ह्याच्या अंतःकरण-रूपी घरांत जीव व परमात्मा हे ऐक्यासनावर बसलेले असतात म्हणजे त्यांचें ऐक्य झालेलें असतें. ( ' नळिकेवरूनि उठिला । शुक शाखे बैसला । तैसा मूळ-अहंतें वेढिला । तो मी म्हणौनि । ज्ञा. १४-३०२ ) **हृदयभुवनीं**-अंतः-करणरूपी घरांत-अंतःकरण जर नसलें तर कूटस्थाचें व आभासाचें स्वरूपच सिद्ध होणार नाहीं. ( अंतःकरणाला अधिष्ठान जे चैतन्य त्याला कूटस्थ म्हण-तात व त्याचें अंतःकरणांत पडलेलें जे प्रतिबिंब त्याला आभास म्हणतात ) म्हणून अंतःकरणरूपी घराचें रूपक केलें आहे.

**ओंवी १५४—योगसमृद्धि**-ऐक्यरुपी योगाच्या ऐश्वर्यानें-येथे ' योग ' शब्दाचा अर्थ जीवपरमात्म्याचें ऐक्य असा आहे. **निरवाधि**-अखंड, निरंतर. **अर्पी**-अर्पण करतो-वास्तविक हा आत्मरूप झाला म्हणजे विचाराच्या योगानें जेवढा परमात्मा व्यापक तेवढाच तो आपणाला समजू लागला ( मी जैसा अनंतानंदु । जैसाचि सततसिंधु । तैसेचि ते भेदु । उरेचि ना । ज्ञा. १४-५३ ) असें असतांनासुद्धां तो आपली मनबुद्धि भगवंतालाच अर्पण करतो म्हणजे भगवंताची सेवा करतो. ( येणें बोधें आम्ही असो सर्व काळ । करोनि निर्मळ हरिकथा । तु. गा. ५६२ ) असें करण्याचें कारण तो ज्या भक्तीच्या योगानें ह्या उच्चस्थितीला प्राप्त झाला त्या भक्तीशीं हा कृतघ्न होत नाहीं. एवढेंच नव्हे तर त्याच्या ठिकाणचें भक्तीचें प्रेम हें दिवसेंदिवस वृद्धिंगतच होत असतें. (शंकराचार्य म्हणतात 'सत्यपि भेदापगमे नाथ तवाऽहं न माम-किनस्त्वम् ' आचार्यकृतषट्पदी ). ( ज्ञानाचा उद्बोध । भक्तिप्रेमाचा कल्लोळ । नाथ-३७०२ ) खुद्द ज्ञानेश्वरमहाराज म्हणजे ज्ञानियांचे राजे ' आम्हांलागीं गुरुदेवें । आम्हीच केलों । ' अमृ० ८-१ असें म्हणणारे, पण तेहि म्हणतात ( माझें जीवींचीं आवडी । पंढरपुरा नेईन गुढी । ज्ञा. गा. ६१ ).

**ओंवी १५५—आंतु बाहेरी योगु**-आंत बाहेर योग-बाहेरचा योग

म्हणजे ज्यांनीं शरीर व इद्रियें ह्याच्यावर भक्तीच्या योगानें ताबा मिळविला व तीं भगवंताला अर्पण केलीं ( शरीर वाचा मानस । पियालीं कृतनिश्चयाचा कोश । एक मीं वाचूनि वास । न पाहती आन । ज्ञा. १३–६०४ ) व अंतर्योग म्हणजे ज्यांनीं अंतःकरणांतील वासना घालवून ( मनोजय वासना तोडुनि केली बीमोडी । नाथ–३७०५ ) कामक्रोधादिक विकार घालविले व अशा प्रकारें अंतःकरण शुद्ध करून ज्यानीं ते भगवंताशीं समरस केलें. अशा प्रकारें आत्मैक्य प्रतीति प्राप्त होऊन पुन्हा ते भगवंताचीच सेवा करतात. ( 'ऐसे मीच होऊनि पांडवा । करिती माझी सेवा । परि नवलावो तो सांगावा । असे आइक । ज्ञा. ९–१९६ ) **निर्वाळलेयाहि**–शुद्ध झाला असतां, सिद्ध झाला असतां. **अनुराग**–प्रेम, आवड, निष्ठा.

**ओवी १५६—योगी**–भक्त–योगी, भक्त व ज्ञानी हे सर्व शब्द एकच स्थितीवाचक आहेत. ब्रह्मानुभवानें प्राप्त होणारी जी आत्मस्थिति तीच ते दाखवितात. योग ह्या शब्दाचा अर्थ ( 'तेवी पिंडाचेनि मिषें । पदीं पद प्रवेशें । तें एकत्व होय तैसे । पंडुकुमरा । ज्ञा. ६–३०८ ) परमात्म्यापासून आपणांस विभक्त न समजणे. भगवंताशीं स्वरूपसमरसता प्राप्त होणें ह्याला भक्ति म्हणतात ( ऐसेनि मातें जाणिजे । ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे । येथ भेद कांहीं देखिजे । तरी व्यभिचारु तो । ज्ञा. १४–३८१ पैं स्वरूप समरसें । तयाही गा जाले तैसें । तेथ किं धर्म हे कैसें । नेणे देह । ज्ञा. १४–३१४ ) व भगवंतापासून आपण वेगळे नाहीं अशी जी दृढ समजूत त्यालाच ज्ञान म्हणतात ( हो कां तरंगु लहानु । परि सिंधूसि नाहीं भिन्नु । तैसा ईश्वरीं मी आनु । नोहेंचि गा । ज्ञा. १४–३८६ ) ही एकच स्थिति पण भिन्न भिन्न मार्गांनीं प्राप्त करून घेतल्यामुळे योगी, भक्त व ज्ञानी अशीं वेगवेगळीं नांवें प्राप्त झालीं. **वल्लभा**–पत्नी. **पढियें**–आवडतो–भगवंताला भक्त इतका प्रिय असतो कीं त्याच्यापुढें त्याला ब्रह्मादिक देवहि इतके प्रिय नसतात ( न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शंकरः । न च संकर्षणो न श्रीर्नैवाऽऽत्मा च यथा भवान् ॥ ए. भा. १४–१५ ).

**ओवी १५७—पाडें**–तुल्यतेनें, योग्यतेनें, बरोबरीनें–वरच्या ओवींतील

दृष्टान्त ज्ञानेश्वरांना थोडा कमी योग्यतेचा वाटला कारण 'वल्लभा व कान्त' यांच्यामध्यें एखादे वेळेस वितुष्ट येण्याचा संभव आहे; म्हणून या ओवींत पूर्ण दृष्टांत देतात. भक्त हे ज्ञानाच्या योगानें भगवंताशीं समरस झाल्याकारणानें त्यांच्यामध्यें आतां भिन्नताच शिल्लक राहिलेली नसते; ('आणि ज्ञानाचेनि उजिडलेपणें । मी आत्मा ऐसें तो जाणे । म्हणऊनि मीहि तैसेंचि म्हणें । उचंबळला सांता । ज्ञा. ७–११७ तेवीं आम्हां तयां परस्परें । बाहेरी नामाचींचि अंतरें । वांचूनि आंतुवट वस्तु विचारें । मी तेचि ते ॥ ज्ञा. ९–४११) याच अर्थानें ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात कीं मला परमात्मा जीवापेक्षां अधिक आवडतो ('तुझी आण वाहीन गा देवराया । बहु आवडसी जिवापासोनियां' ज्ञा. गा.–१५६) **थोकडें**-थोडें, अपुरें-मनुष्याचें जिवावरहि प्रेम औपचारिक असतें कारण अब्रू जाण्याचा प्रसंग आला म्हणजे कित्येकवेळां माणूस विष घेऊन जीव देतो; परंतु आत्म्यावरचें प्रेम हें निरुपचारिक असतें (आणि निरुपचारा प्रेमा । विषय होय जें प्रियोत्तमा । तें दुजें नव्हे कीं आत्मा । ऐसेंचि जाणावें । ज्ञा. १८–१३४६) एवढ्याकरितां भगवंत 'भक्त हा जिवासारखा मला प्रिय असतो' असें म्हणणें यथार्थ वर्णन होत नाहीं असें म्हणतात.

**ओवी १५८—पढियंतेयाची**-आवडत्या माणसाची; **भारणी**-मोहनी.

**ओवी १५९—वेगां**-झपाट्यानें, चटकन्. **अनुवाद्**-बोलणें-प्रेमाचें वर्णन करतां येत नाहीं; (प्रेम नये सांगतां बोलतां दावितां । तु. गा. ३२५५ अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम् । ना. भ. सू. ५१) अशा प्रकारचें शुद्ध प्रेम हें गुणत्रयाच्या पलीकडचें व कामनारहित असें असतें म्हणून त्याचें वर्णन करतां येत नाहीं.

**ओवी १६०—प्रियाचिया**-प्रियकराच्या, प्रिय माणसाच्या. **थांव**-बळ.

**ओवी १६१—विपायें**-कदाचित्, क्वचित्. **संवादिया**-संवाद करणारा; चर्चा करणारा.-आपल्याच आवडीचा व प्रेमांतला श्रोता भेटला म्हणजे मग चर्चेला एक विशेष प्रकारची गोडी येत असते. ह्याच्या उलट विजातीय श्रोता भेटला असतां असलेला रस वितळतो (विषमाची शंका वाटे । सारखे भेटे

तरी सुख । तु. गा. १५३ ) गाणाऱ्याला गाणारा मिळाला म्हणजे त्यांचा आनंद वाढत असतो, त्याचप्रमाणें भक्ताला भक्त भेटला असतां 'अव्यवहारी' जी परमात्मवस्तु तिच्या संबंधींहि चर्चा करतां येते. ( ' आणि संवादाचेनि मिषें । जे अव्यवहारी वस्तु असे । तेचि भोगिजे कीं जैसें । आरिसां रूप ' । ज्ञा. १८·८१. ' मग तया बोधाचेनि माजें । नाचती संवादसुखाचीं भोजें । आतां ऐकमेकां घेपे दीजे । बोधचि वरी । ' ज्ञा. १०-१२० ) **कांटाळे**—कांटा, माप, तुलना, उपमा.

ओवी १६२—**प्रसंगें**—प्रसंगानें; ओघानें. **प्रिय**—आवडता—अर्जुनावर भगवंताचें निरतिशय प्रेम होतें. ( हो कां आत्मनिवेदनातळींची । जे पीठिका होय सख्याची । पार्थु अधिष्ठात्री तेथिंची । मातृका गा । ज्ञा. ६-१२७ ' देवी लक्ष्मीयेवढी जवळिक । परी तेहि न देखे या प्रेमाचें सुख । आजि कृष्णस्नेहाचें पिक । यातेंचि आथी । ज्ञा. ४-९ )

ओवी १६३—**बोलों**—आम्हीं बोलतों. **भलेंया**—मोठ्या. **म्हणत खेवों**—म्हणतांक्षणींच.

ओवी १६४—**जाण**—समजून घे. **बैसों**—बसावयास.

ओवी १६५—**माजें**—क्षोभानें, भरतीनें—समुद्रास अमावास्येस व पौर्णिमेस भरती येते पण त्या भरतीनें माणसांना भीति वाटते, पण समुद्रांतील मासे कधीं भीत नाहींत व भीतीमुळें तीरावर येऊन बसत नाहींत, तसेंच जळचरामुळें समुद्रालाहि त्रास होत नाहीं. **नुबुजे**—कंटाळत नाहीं—भक्तांचें पोट समुद्रासारखें मोठें असतें म्हणजे त्यांचें अंतःकरण सुपासारखें असतें. ते कधीं दुष्टांचा किंवा अज्ञ लोकांचा अव्हेर करीत नाहींत. उलट त्यांचा उद्धार करतात. ( पुनीत केले विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी । तु. गा. १९८९ )

ओवी १६६—**उन्मत्तें जगें**—मस्त लोकांमुळें. **खंती**—खेद—साधकदशेंत जो असतो त्याला वाईट आचरण करणारा पाहिला म्हणजे राग येतो व प्रसंगविशेषीं कित्येक लोक दुष्टांचा नाश करण्यासहि प्रवृत्त होतात. परंतु त्याला दुसऱ्याचें वाईट आचरण पाहून खंती तर वाटत नाहींच परंतु त्याबरोबरच डोळ्यांवर कातडें ओढून तो पळूनहि जात नाहीं. उलट तो कसा सुधारेल

ह्याचीच काळजी त्याच्या ठिकाणीं निरंतर असते ( तैसीं आंधळीं सांडित । बुडालीं काढित । सांकडीं फेडित । आर्तांचिया । ज्ञा. १६–२०१ ) **आंगें**–मुळें (तृतीया विभक्तीचें अव्यय) **न शिणें**–कष्ट पावत नाहींत–लोकहि त्याला त्रासत नाहींत उलट हा लोकांचा आवडता होऊन बसतो. देवाला दुष्ट व राक्षस भितात कारण देव त्यांचा संहार करतो. पण ह्यांच्याजवळ दुष्ट यावयास भीत नाहींत; व हेहि त्यांचा उद्धार करतात व त्यांना सुख देतात ( गुण दोष याती न विचारितां कांहीं । ठाव दिला पायीं आपुलिया । तुका. २०२५ जे हिताहित देखती । हानि कणवा घेपती । पुसोनि शिणु हरिती । देती सुख । ज्ञा. १३–१०४२ सुख या संतसमागमे–तुका–४६८ )

**ओवी १६७—जीवपणें**–आत्मत्वानें, आपणच सर्वांचा प्राण असल्यामुळें-ज्याप्रमाणें शरीर व अवयव ह्यांत फरक नाहीं ( तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुखदुःख जीव भोग पावे ॥ तुका. ३७२७. अवयव आणि शरीर । हे वेगळाले काय कीर । कीं रसु आणि नीर । सिनानीं आथी । ज्ञा. १३–२९४ ) त्याचप्रमाणें त्याचा आत्मभाव इतका विकसित झाला कीं सर्व जगच तो आपुलें स्वरूप समजूं लागला. ( हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर । किंबहुना चराचर । आपण जाहला । ज्ञा. १२–२१३ 'जिवा ऐसे देखे आणिकां जिवांसी ' तु. गा. २१४३ ) आपल्या शरीराला विकार झाला म्हणजे आपण शरीराचा त्याग न करतां तो विकार सुधारण्या-करितां जशी खटपट करतो त्याचप्रमाणें जगत् हें त्याला त्याच्या शरीराप्रमाणें झाल्याकारणानें तो जगताचें दुःख निवारण करण्यकरितां खटपट करीत असतो. ( पैं पायी कांटा नेहटे । तंव व्यथा जीवीं उमटे । तैसा पोळे संकटें । पुढि-लांचेनि ' । ज्ञा. १६–१५९. )

**ओवी १६८—प्रियाप्रियें**–आवडतें व नावडतें. **अमर्ष**–क्रोध, संताप, राग–हर्ष व क्रोध कां गेले तर त्यांना कारण असणारें जें द्वैत त्याचाच भक्तानें सकारण त्याग केलेला असतो ( येथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा । तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषम काई । ज्ञा. ५–९५ ) ज्याच्या ठिकाणीं अहंकार असतो म्हणजे परिच्छिन्नता असते

त्याच्याच ठिकाणीं लहानमोठा हा भेद असतो. मनुष्य जेव्हां आपल्याला शरीराइतकाच परिच्छिन्न समजतो त्याच वेळेस त्याच्या ठिकाणीं आपपर भाव उत्पन्न होतो. परंतु हा जरी भक्त बाह्य दृष्टीनें शरीराइतकाच म्हणजे साडे तीन हाताचा दिसत असला तरीपण अनुभवाच्या दृष्टीनें तो इतका व्यापक झालेला असतो कीं तो सर्व चराचरच आपण आहोंत असें समजतो ( किंबहुना चराचर । आपण जाहला । ज्ञा. १२–२१३ ). त्यामुळें त्याच्या ठिकाणचें द्वैत गेलें व म्हणून ज्यांच्यावर रागावावयाचें तेहि आपणच आहोंत असा आत्मभाव त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाल्याकारणानें त्याच्या ठिकाणचा राग जातो. ( देखती जे डोळे । रूप आपुलेंचि खेळे ॥ तु. गा. ३६७८ कामक्रोधा नाही चाली । मूर्ती झाली समता । तु. गा. १९४० ) भिक्षूला राग आणण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केला पण तो रागावला नाहीं; कारण त्याच्या ठिकाणची भेदप्रतीति गेली होती. ( आंगा जें पातलें । तें करुनि घालीं आपुलें । तेथ साहतेनि नवलें । घेपिजेना । ज्ञा. १३–३५१ ) एकदां ज्ञानेश्वरांना राग आला तेव्हां मुक्ताबाईनें त्यांना उपदेश केला कीं, महाराज आपण रागावतां तरी कोणावर ? रागावयास जागाच शिल्लक राहिली नाहीं. ( ' रागे भरावें कवणासी । आपण ब्रह्म सर्व देशी । ' मुक्ताबाई )

**ओवी १६९—द्वंद्वनिर्मुक्त**-द्वंद्वापासून सुटलेला-द्वंद्व म्हणजे सुखदुःख, शीतउष्ण, पापपुण्य इत्यादि जोड्या. सुखदुःखाला कारण जें द्वैत तें त्याच्या ठिकाणचें गेल्याकारणानें त्याला सुखदुःखें सुखदुःखरूपानें प्रतीत होत नाहींत ( अगा सुखदुःखाकारें । द्वंद्वें देहीं जियें गोचरें । तियें जयां कां समोरें । होतीचिना । ज्ञा. १५–२९३ ) **भय**-भीति-भयाला नेहमीं द्वैत लागतें. ( भयं द्वितीयाभिनिवेशतः । ए. भा. २–३७ दुजे जंव जंव घडे । तंव तंव संसारभय जोडे । ज्ञा. १७–३७६ ) पण ह्याच्या ठिकाणचें द्वैत गेल्याकारणानें ह्याच्या ठिकाणीं मुळींच भीति नसते ( भयातें नेणे कहीं । परिपूर्ण तो । ज्ञा. २–२९५ ) 'आम्हां हरिदासां कांहीं । भय नाहीं त्रै लोकीं । तु. गा. ३७२८ ) सर्वांत भय जास्त कशाचें असेल तर तें ' जन्ममृत्यूचें' हें जन्ममृत्यूचें भय त्यानें दोन प्रकारांनीं घालविलेलें असतें, एक तो जन्ममृत्यूला

देणारें जें क्रियमाण कर्म तेंच करीत नाहीं म्हणजे तो काम्य व निषिद्धकर्में करीत नाहीं; विहित कर्में करतो परंतु त्याच्याबद्दल अहंकारमद व फलास्वाद घेत नाहीं व तीं ईश्वरार्पणबुद्धीनें करतों. अशा प्रकारे त्याच्याकडून क्रियमाण कर्म होत नाहीं व म्हणूनच त्याला पुन्हां जन्म मिळत नाहीं ( तैसा कर्माकर्मा-चिया मोहरा । उठूं नेदूनि अहंकारा । संसाराचा दरारा । सांडणे येणें । ज्ञा. १६-७० ) अथवा विचाराच्या योगानें तो द्वैत नाहींसें करतो म्हणजे अनु-भवाच्या योगानें तो परमात्म्याइतका व्यापक होतो, व त्याच्याशीं समरस होऊन जातो. त्यामुळें भिण्याकरितां त्याला त्याच्याहून दुसरें वेगळें असें कांहींच राहात नाहीं ( अथवा ऐक्यभावाचेनि पैसें । दुजे मानूनि आत्मा ऐसें । भयवार्ता देशें दवडणें जें । ज्ञा. १६-७१ ) उद्वेग—काळजी, खिन्नता, चिंता;—चिंतेला किंवा काळजीला सुद्धां द्वैत लागतें ( 'तत्र को मोहः कः शोक एकत्व-मनुपश्यतः' ईश. उ. ७ ' चिंता ते पळाली गोकुळाबाहेरी । प्रवेश भीतरीं केला देवें । तु. गा. ११ ) भक्त—उपासक, अनन्य-भक्त येवढ्या उच्च स्थितीला प्राप्त झाला तरी तो भजनपूजनादि टाकत नाहीं. नाहींतर कित्येक शब्दज्ञानी, भजन वगैरे टाकून देतात. ( जीवन्मुक्त ज्ञानी जरी झाले पावन । तरी देव तीर्थभजन न संडीती । नामा ६१२ ' मग याहीवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था । तरी तयाते मी माथां । मुकुट करीं । ज्ञा. १२-२१४ ऐसें मीच होउनि पांडवा । करिती माझी सेवा । परि नवलावो तो सांगावा । असे आइक । ज्ञा.९-१९६ ) 'शिवो भूत्वा शिवं यजेत्' खऱ्या भक्तीचा आनंद हा भगवंताशीं समरसता प्राप्त झाल्यावरच आहे. जोंपर्यंत ईश्वर हा शाळेंतील मास्तराप्रमाणें शिक्षा करण्याकरितां कांठी घेऊन बसलेला आहे अशी द्वैत भावना आहे तोंपर्यंत खऱ्या भक्तीचा आनंद प्राप्त होत नाहीं. ( पावावया उपासना ब्रह्मस्थानीं प्रस्थान तु. गा. ३५९३ )

**ओंवी १७०—मोहो**—माया, प्रेम—एकदां रुक्मिणीनें भगवंतांना विचारलें कीं, आपणांस सर्वांत प्रिय कोण आहे ? त्या वेळेस भगवंतांनीं सांगितलें कीं मला ज्ञानवानापेक्षां भक्त अधिक प्रिय आहे. ज्ञानवानाला मी सायुज्यता मुक्ति देऊन बाजूला सारतों ( सायुज्यता मुक्ति देवुनि । ज्ञानी ते निर्गुणा

बुडविले । नामदेव ६५८ ) परंतु भक्तांच्यावर फार प्रेम करतो ( आवडते हे माझे भक्त परम सखे । जे सब्राह्य सारिखे सप्रेमळ । नामदेव ६५९ **माझेनि जीवें**–माझ्या प्राणानें, माझ्या जगण्यानें;–मी सगुण रूपानें असतो म्हणूनच भक्त जिवंत असतात. माझ्या असण्यानें त्यांना सेवेचा आनंद मिळतो. माझें नित्य अनुसंधान हेंच भक्तांचें जीवन असतें ( जया ऐसे लाभे तरी जिणे । एऱ्हवी मरण ज्ञा. ९–४४७ ‘ भजनीं विक्षेप तेंचि पैं मरण । न जावां क्षण एक वांया तुका ४०४८ ) **जीवो**–जिवंत ( असतो ).

**ओवी १७१—निजानंदें**–आत्मानदानें–ही ओवी पुढच्या श्लोकाची अवतरणिका किंवा उपक्रम आहे. आत्मा हा आनंदरूप आहे ( जो आंगाथिला आनंदु । सुरतेंविण । ज्ञा. १५–७४ ) ( ‘ रसो वै सः तै. उ, २, ७ ’ आनन्दो ब्रह्मेति व्यजानात्–तै. उ. ३, ६ ) ( तैसा हृदयामध्यें मी रामु । असतां सर्व सुखाचा आरामु ॥ ज्ञा. ९–६० ) आत्म्याच्या ठिकाणीं अनुपम आनंद आहे ( देशें काळें वेदानुवादा । ज्या सुखाची न करवे मर्यादा । त्या सुखाची सुखसंपदा । मद्भक्त सदा भोगिती ॥ ए. भा. १४–२०१ ) आत्मा हा आनंदरूप असतांना जीवाला त्या आनंदाचा लाभ होत नाहीं याचें कारण जीव हा अज्ञानाला वश झाल्याकारणानें आपला आपल्याला विसरतो ( म्ह० मी आत्मा आहे असें विसरतो.) व देहाशीं व इंद्रियांशीं तादात्म्य करून देहादि संघात मीच आहे असा अहंकार घेतो. तो अहंकार आत्मानंदावर आवरण घालतो व म्हणून जीवाच्या ठिकाणीं विषयासक्ति उत्पन्न होते. ( अहंकार खवळल्या जाण । करी आनंदाचें आवरण । बुडे परमात्मस्फूर्तीचें स्फुरण । देहाचें मीपण वाढवी ॥ ए. भा. १३–४३३ ) मग अनुकूल विषयाच्या प्राप्तींत आनंद आहे असें त्याला वाटूं लागतें व त्या अनुकूल विषयांच्या प्राप्तीकरितां रात्रंदिवस तो खटपट करूं लागतो. पण आनंद हा विषयांत नाहीं, तो आत्म्याचाच आनंद आहे. ( ‘एतस्यैवानन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति’ बृह. उ. ) जीवाला माझा आत्मा आनंदरूप आहे असें ज्ञान नसल्यामुळें त्याला विषयाची इच्छा होते व त्यामुळें अंतःकरणाची स्थिरता बिघडते. मग तो विषयप्राप्तीच्या खटपटीस लागतो. तो विषय प्राप्त झाला कीं इच्छेची निवृत्ति होते,

मग लगेच अंतःकरणाची स्थिरता होते व त्यांत आत्मानंदाची अभिव्यक्तता होते. अनुकूल विषय प्राप्ति, इच्छेची निवृत्ति, अंतःकरणाची स्थिरता व त्यांत आत्मानंदाचे भान ह्या सर्व गोष्टी युगपत् होत असल्यामुळें जीवाला विषयप्राप्तीनें आनद झाला असे वाटतें. वास्तविक आनंद हा आत्म्याचाच असतो. विषयांत आनंद नसून केवळ इच्छेच्या निवृत्तींतच आनंद आहे ही गोष्ट सूक्ष्म विचार केला असतां मनुष्याला सहजच पटण्यासारखी आहे. जसें एखाद्याला पायाला गळू झालेलें असतें व त्यामुळें त्याला चालतां येत नाहीं. मग त्याला अशी इच्छा होते कीं आपणांस निदान दोनचार पावलें तरी चालतां यावें. त्याला भेटण्याकरितां दोन मैलांवरून चालत एखादा गृहस्थ येतो. मग त्या गृहस्थास तो गळू झालेला गृहस्थ आनंदानें सांगतो कीं मी आज या दिवाणखान्यांत स्वतःच्या पायानें दोनचार फेऱ्या घालूं शकलों. आतां याला चार फेऱ्या घातल्यानें आनंद झाला व दुसरा दोन मैल चालून आला तरी त्याला आनंद झाला नाहीं. याचें कारण पहिल्याला आपणांस चालतां यावें अशी इच्छा होती. व ती इच्छा निवृत्त झाल्याकारणानें त्याला आनंद झाला. पण वृत्तिद्वारा प्राप्त होणारें सुख हें नेहमीं मर्यादितच असतें व म्हणूनच विषय सेवनानें जीवाची पूर्ण तृप्तता कधींच होत नाहीं. ज्यावेळेस वृत्तीचा पूर्ण लय होतो त्यावेळेस अमर्याद आनंद प्राप्त होतो. वृत्तीचा लय होणें म्हणजे पुन्हा वृत्तीवर न येणें, व ही स्थिति केवळ आत्मलाभांतच प्राप्त होते. या भक्ताला आत्मलाभ झाल्याकारणानें हा सदा निजानंदानें तृप्त असतो. ( ' सहजें स्वसुखाचेनि अपारें । सुरवाडें अंतरें ' । रचिला म्हणऊनि बाहिरें । पाऊल न घली ' ॥ ज्ञा. ५–१०६ ) **परिणाम**–ब्रह्म. **पूर्णते**–पूर्णावस्थेचा. **वल्लभु**–प्रिय पति.–आत्मा हा ' पूर्ण ' होण्यास्तव व भक्त त्याच्याशीं समरस झाल्याकारणानें तोहि पूर्णच होतो. ( आणि पूर्ण अहंता वेटलें । संघ आम्हीच दाटलों । लोपलों ना प्रगटलों । कोण्हा होऊनी । '–अमृ–१०–१६ ' तेवीं आम्हां तया स्परस्परें । बाहेरी नामाचींचि अंतरें । वांचुनि आंतुवट वस्तू विचारें । मी तेंचि ते ॥ ज्ञा. ९–४११. ' तो ब्रह्मचि मनुष्यवेखें । ओळख तूं । ' ज्ञा. ४–१०५

ओवी १७२—अपेक्षा-इच्छा. रिगावा-प्रवेश,शिरकाव-इच्छा ही नेहमीं परिच्छिन्नाच्या ठिकाणीं म्हणजे द्वैतांत संभवते. आपणाहून जेव्हां विषय भिन्न दिसतो तेव्हांच इच्छा उत्पन्न होते ( इंद्रिया विषयांचिये भेटी । सरसीच वेगें उठी । कामाची बाहुटीं । धरूनियां ॥ ज्ञा.-१३-१२३ ) भक्त हा अनुभवाच्या योगानें व्यापक झाल्याकारणानें त्याच्या ठिकाणीं द्वैतच स्फुरत नाहीं म्हणजे विषय हा विषयरूपानें त्याला प्रतीतच होत नाहीं. अतएव त्याच्या ठिकाणीं इच्छा संभवत नाहीं. ( पैं आघवेंचि आपुलेपणें । नुरेचि जयां अभिलाषपणें । जैसें येथूनि पऱ्हां जाणें । आकाशा नाहीं ॥ ज्ञा-१५-३०० 'भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनी ॥ तुका-१९९७ ) चढावा-वाढ, भरती. असणें-अस्तित्व.-ज्याचे अस्तित्व हें सुखाच्या उत्कर्षास कारणीभूत असतें. अमूप सुखाचें राहाण्याचें ठिकाण तो पुरुष असतो. जितक्या प्रमाणांत आशा कमी तितक्या प्रमाणांत सुख अधिक. ( आशा हि परमं दुःखं । नैराश्यं परमं सुखं ॥ ए. भा-८ श्लो. ४४ ज्याची आशा निःशेष जाये । तोचि परमसुख लाहे ॥ ए. भा. ८-३१४ ) भक्ताच्या ठिकाणीं आशेचा पूर्ण अभाव असतो म्हणून त्याच्या ठिकाणीं अमर्याद सुख असतें. 'निरपेक्षता' हें साधूचें मुख्य लक्षण आहे. ( निरपेक्षं मुनिं शांतं निर्वैरं समदर्शनम् ॥ ए. भा.-१४-श्लो. १६ 'परमार्थामाजी बीक । निरपेक्षता हें नासिक ॥ रुक्मिणिस्वयंवर ).

ओवी १७३—वेंचणें-खर्च करणें. काशी-काशी क्षेत्र. साधूचें पावित्र्य किती असतें ह्याची कल्पना येण्याकरितां साधूच्या पावित्र्याची तुलना, ज्ञानेश्वर-महाराज 'काशी, हिमालयपर्वत, व गंगेच्या' पावित्र्याशीं करतात. काशी ही पवित्र आहे व मनुष्याला ती मोक्ष देते परंतु जो काशींत मरेल त्यालाच ती मोक्ष देते. ( 'काश्यां मरणान्मुक्तिः' 'मरणमुक्ति वाराणसी । पितृऋण गया नासी ॥ तुका-२३९८.) मरणाच्या वेळेस काशींत श्रीमहादेव मनुष्याच्या कानांत भगवन्नामाचा उपदेश करतात व मेल्यानंतर तो मनुष्य मुक्त होतो असा काशीक्षेत्राचा महिमा आहे. ( उपदेश करी विश्वनाथ कानीं । वाराणसी प्राणी मध्यें मरे ॥ तुका-३५५.) जन्मभर जरी मनुष्य काशींत राहिला

परंतु मरणाच्या वेळेस तो काशीच्या बाहेर येऊन मेला तर त्याला मोक्ष मिळत नाहीं. पण संतांच्याजवळ कायमचें येऊनहि राहावें लागत नाहीं व मरावेंहि लागत नाहीं. साधूंना केवळ आलिंगन देण्यांत मोक्ष प्राप्त होतो. आलिंगन देणें ह्याचा अर्थ साधूंच्या बोधांत समरस होऊन जाणें. साधु हे आपणाजवळ येणाऱ्या साधकाला आत्मज्ञान देतात व त्या आत्मज्ञानाच्या योगानें त्याला जीवन्मुक्तीचा लाभ होतो. ज्ञानाचें सामर्थ्यच असें आहे कीं त्याच्यापुढें संसार हा टिकतच नाहीं ( भरुनि प्रपंचाचा घोंटु । कीजे देखतयाचि देखता द्रष्टु । आनंदसाम्राज्यीं पाटु । बांधिजे जीवा ॥ ज्ञा–१६–५०) असे ज्ञानदाते संत असतात. ज्ञान हें साधूंच्याच ठिकाणीं असतें ' गुरु तेथ ज्ञान ' ज्ञा. १८–१६३६ ' सत तेथें विवेका । असणें कीं जी ' ॥ ज्ञा. १८–१६३२ ' गुरुरित्याख्यया लोके साक्षाद्विद्या हि शांकरी । अमृ. १–श्लो. २ ' अनंत भक्तराशी तरले ते वानर । ज्ञानदेवा घर चिदानंदीं ' । ज्ञा. गा.–२१८ ' खग, मृग, सर्प पावले मातें । मा मानव तंव सहजें सरते । वैश्य शूद्र स्त्रियादि समस्ते । पावले मातें सत्संगें ॥ ए. भा. १२–६६ )

**ओवी १७४—हानि**–नाश–हिमालय पर्वत हाहि पवित्र आहे व तोहि मोक्ष देतो. परंतु ज्याला हिमालयावर मरण येतें त्यालाच मोक्ष मिळतो. याशिवाय हिमालयाची यात्रा करण्याकरितां अंगांत ताकद लागते व तेथील पाण्यांत वाळू असल्यामुळें तें पाणी जर गाळून घ्यालें नाहीं तर त्यापासून शरीराला पीडा होण्याचा बराच संभव असतो. ( केदरींचें उदकपान । करी पीडन देहासी ' ॥ नाम. ९७३ ) संताचें पावित्र्य हिमालयापेक्षां श्रेष्ठ आहे, कारण त्यात जीविताची हानी होत नाहीं.

**ओवी १७५—शुचि**–पवित्र–गंगास्नान हें ज्ञात व अज्ञात दोष घालविणारें आहे. सर्व पापांचें क्षालन करण्याचें सामर्थ्य गंगेच्या पाण्यांत असल्यामुळें गंगास्नानाला ' साधारण प्रायश्चित ' म्हणतात. गंगेमध्यें देहाचें विसर्जन झाल्याखेरीज मनुष्याला मोक्ष मिळत नाहीं, परंतु संतांच्या जवळ येऊन बुडावें लागत नाहीं. केवळ संतांच्या संगतींत मोक्ष मिळतो म्हणून संतांचें पावित्र्य

गंगेपेक्षां श्रेष्ठ आहे. **ताप**-दाह, त्रिविध ताप-अध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक. **बुडणें**-बुडून मरणें.

**ओवी १७६—रोकडा**-प्रत्यक्ष, रोखठोक, हातोहातीं-साधूच्या पावित्र्याशीं गंगेच्या पावित्र्याची तुलना केली असतां ती फार कमी पडते. तीर्थांच्या ठिकाणीं स्नान फलदायी होण्याकरतां श्रद्धा लागते ( ‘ तीर्थीं भाव फळे । येथें आनाड तें वळे ॥ ’ तुका. ३३३० ) श्रद्धा नसतांना कित्येक परदेशांतील लोक गंगेंत स्नान करतात, परंतु त्यांना गंगास्नानाचें पुण्य लागत नाहीं. पण संतांच्या जवळ येण्यांत नसलेली श्रद्धा उत्पन्न होते. दुसरी गोष्ट गंगास्नान किंवा तीर्थस्नान मनुष्यास मेल्यानंतर त्याला उत्तम गति प्राप्त करून देण्यास समर्थ होतात, परंतु साधूची संगति ह्याच जन्मांत मोक्ष देण्यास कारणीभूत होते. ( ‘ याचि देहीं याच डोळां । भोगिजे मुक्तीचा सोहळा ॥ ’ ए. भा. आनंदलहरी-१२५ ) गंगास्नान हें ‘ अदृष्टफलसूचक ’ आहे म्हणजे पुण्यरूप अदृष्टफलाला देणारें आहे. संत संगति ही ‘ दृष्टफलसूचक ’ आहे म्हणजे याच जन्मांत मोक्ष प्राप्त करून देणारी आहे. अजामेळ, वाल्याकोळी इत्यादि दुष्ट लोकांचा संतांच्या संगतीनें उद्धार झालेला आहे. पण अशा दुष्ट लोकांना उद्धरण्यास केवळ गंगा-स्नान उपयोगी पडलें नसतें ( ‘ पुनीत केले विष्णुदासीं । संगें आपुलिया दोषी ॥ ’ तुका १९८९ ‘ अंध्रिरेणु ज्यांचा उद्धरितो पतिता । ’ ज्ञा. गा. २१७ ) **खोलिये**-खोलीचा. **पारु**-अंत-भक्तांच्या ठिकाणीं असलेल्या ज्ञानाचा ठाव लागत नाहीं ( ‘ तुका म्हणे नेणें युक्तीची ते खोली । म्हणोनी ठेविली पायीं डोई ॥ ’ तुका ३९२८ ) जो स्वतः भक्त असतो तोच भक्तांचा महिमा जाणूं शकतो. ( ‘ भक्तांचा महिमा भक्तचि जाणती । दुर्लभ या गति आणि-कांसी ॥ ’ तुका. १९९८ ‘ संतांचा महिमा तो बहु दुर्लभ । शाब्दिकांचें काम नाहीं येथें ॥ ’ तुका. २०३९ ) **न बुडिजे**-बुडत नाहीं-संतांच्या जवळ जो जातो त्याचा नाश होत नाहीं. तो संसारसागरांतून तरून जातो ( ‘ ज्ञान-देव म्हणे तरलों तरलों । आतां उद्धरलों गुरुकृपें ॥ ’ ज्ञा. गा. २५२. ‘ मज हृदयीं सद्गुरु । जेणें तारिलों हा संसारपुरु ॥ ’ ज्ञा. १-२२.

**ओवी १७७—अंगलगें**-अंगस्पर्शानें. **जिणणें**-जिंकणें, नाहींसें करणें-

ज्यावेळेस भगीरथानें गंगेला स्वर्गांतून मृत्युलोकांत आणलें त्या वेळेस गंगेनें विचारलें कीं माझ्यांत पापी लोक स्नान करून मला जें पातक लागेल त्यांतून मी कशानें मुक्त होईन ? त्या वेळेस भगीरथानें सांगितलें कीं तुझ्यांत साधुलोक स्नान करतील व त्यांच्या स्पर्शानें तूं पापमुक्त होशील. एकदां पुंडलीकराय आपल्या आईबापांना घेऊन यात्रा करीत असतांना त्यांचा मुक्काम कुक्कुट स्वामींच्या आश्रमांत पडला. त्यावेळेस त्यांना दररोज पहाटे तीन मलीन स्त्रिया स्वामींचा मठ झाडीत असतांना दिसत. झाडून झाल्यानंतर त्या स्फटिकासारख्या शुभ्र व सुंदर होऊन परत जात. एकदां त्यानें त्यांना विचारलें कीं आपण कोण आहांत ? त्या वेळेस त्यांनीं सांगितलें कीं आम्ही गंगा, यमुना व सरस्वती अशा तीन नद्या आहोंत. आमच्यांत पापी लोक स्नान करतात, त्यामुळें आम्ही मलीन व काळ्या होतो व स्वामींचा मठ झाडल्यानें त्या पापांतून मुक्त होऊन पुन्हां शुभ्र व स्वच्छ होतो. तात्पर्य खुद्द गंगेचें पातक संतांच्या अंगस्पर्शानें नाहींसें होतें. गंगेला पावित्र्य भगवंताच्या चरणस्पर्शानें आलें आहे; कारण गंगा ही भगवंतांच्या पायापासून निघालेली आहे, ते भगवंतसुद्धां संतांच्या चरणरजाची इच्छा करतात व त्यानें आपण पवित्र झालों असें मानतात. ( ‘ देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें’ । तुका. १९८६ ‘अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंघ्रिरेणुभिः ॥ ए. भा. १४ श्लो. १६ ) एकदां सत्यभामेच्या मंदिरांत नारद आले तेव्हां सत्यभामेनें विचारलें कीं नारदा, मला श्रीकृष्ण पति नेहमीं मिळावा असें वाटतें याला काय करावें ? नारद म्हणाले कीं आपण ह्या जन्मांत जी वस्तु दान करतों ती आपल्याला पुढच्या जन्मांत प्राप्त होते. त्यावर सत्यभामेनें नारदांच्या हातावर भगवंताचें उदक सोडलें. नारद तसाच ओला हात घेऊन भगवंतांच्या दरबारांत गेले व भगवंताला म्हणाले कीं आजपासून आम्ही तुमचे मालक आहोंत व तुम्ही आमचे सेवक आहांत. भगवंत ‘ तथास्तु ’ म्हणाले व नारदांच्या पायांतील खडावा त्यांनीं आपल्या डोक्यावर घेतल्या व नारदांच्या पाठीमागें चालूं लागले ( ‘ सत्यभामा दान करी । उजुर नाहीं अंगीकारी । सेवकाच्या शिरीं । धरुनी चाले पादुका ’ ॥ तुका. ४५४ ) म्हणूनच संत हे

भगवंतापेक्षांहि अधिक पवित्र आहेत. संतांची पवित्रता सांगावी तेवढी थोडी आहे. त्यांच्या ठिकाणीं अविद्येचा मल तर नसतोच पण विद्येचा जो मल 'शिवोऽहं' तेही स्फुरण त्यांच्या ठिकाणीं नसतें. ('जें शिवपणहि वोविळें। अंगी न लवी'। अमृ–२–११ 'जयजय देव निर्मळ'। ज्ञा. १८–१)

**ओवी १७८—कुवासा**–आश्रय–भक्त हा तीर्थांना तीर्थ होतो. तीर्थ म्हणजे पवित्र नद्या. त्या त्यांच्या ठिकाणीं पापी लोकांच्या स्नानानें आलेला अपवित्रपणा घालविण्याकरिता संतांचा आश्रय करतात. (तीर्थे तया ठाया येती पुनीत व्हावया। पर्वकाळ पायांतळीं वसे वैष्णवां॥' तुका. २१६८ 'तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि' नारद भक्तिसूत्रें ६९ 'तीर्थे पावन जिहीं धर्म केला घडौती।' ज्ञा. गा. २१७ 'पवित्र सोंवळीं। एक तींच भूमंडळीं॥' तुका ३३२६). **मनोमळ**–मनाचे मळ, पापवासना.–भक्त हे आत्मज्ञान-संपन्न असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कोणचाहि पापमळ राहू शकत नाहीं, कारण ज्ञानाच्या पुढें कोणच्याहि मळाचा टिकाव लागत नाहीं. ('देखे विश्वभ्रमा-ऐसा। जो अमूर्ताचा कडवसा। तो जयाचिया प्रकाशा। पुरेचिना॥ ज्ञा. ४–१७४. 'तया कायसे हे मनोमळ।' ज्ञा. ४–१७५). **उल्लंघाविले**–पलीकडे जावयास लावले.

**ओवी १७९—चोखाळ**–निर्मळ, शुद्ध.–शुद्धता दोन प्रकारची असते. एक अंतःशुद्धि व दुसरी बाह्यशुद्धि. आंतबाहेर शुद्ध असणारे पुरुष फार विरळे. एखाद्याचें अंतःकरण पापवासनारहित असे शुद्ध असतें, परंतु त्याची बाह्य वागणूक 'स्नानसंध्यादि' नित्यकर्मरहित असते. कित्येक लांब लांब भस्माचे पट्टे ओढतात, परंतु मन सर्व विकारांनीं भरलेले असते. कापूर ज्याप्रमाणे आंत बाहेर शुद्ध असतो त्याचप्रमाणें भक्ताचे बाह्य आचरण हें वेदविहित कर्मानु-रूप असतें व अंतःकरण 'मल, विक्षेप व आवरण' दोषरहित असतें ('म्हणे शुचित्व गा ऐसें। जयापाशीं दिसे। आंग मन जैसें। कापुराचें॥' ज्ञा. १३–४६१ 'बाहेरी कर्में क्षाळला। भितरीं ज्ञानें उजळला। इहीं दोहीं परी आला। पाखाळा एका॥' ज्ञा. १३–४९३). भक्ताच्या ठिकाणीं अशा प्रकारची अंतर्बाह्य शुद्धि असते. **पायाळु**–पायांकडून जन्मलेला.–अशा मनु-

घ्याला डोळ्यांत विशिष्ट अंजन घातलें असतां जमिनींत पुरलेलें धन अमुक ठिकाणीं आहे असें सांगतां येतें. आपल्या दृष्टींत व पायाळूच्या दृष्टींत फरक आहे. आपल्याला वरवरचें दिसतें, परंतु पायाळू जो असतो त्याची दृष्टि खोल जमिनींत जाते. त्याचप्रमाणें ह्या भक्ताची दृष्टि पायाळूसारखी खोल जाणारी असते. ह्या जगद्रूपी उपाधीच्या आंत झांकलेलें जें परमात्मवस्तुरूपीं निधान तें त्याला दिसतें. ('या उपाधिमाजीं गुप्त। चैतन्य असे सर्वगत। तें तत्वज्ञ संत। स्वीकारिती ॥' ज्ञा. २-१२७). भक्त राजहंसाप्रमाणें असतो. राजहंस ज्याप्रमाणें असार पाणी टाकून सार दूध घेतो, त्याचप्रमाणें हा भक्त उपाधिरूप अनात्म-वस्तूंचा त्याग करतो व साररूप जी आत्मवस्तु तिचें ग्रहण करतो. ('सलिलीं पय जैसें। एक होऊनि मीनलें असे। परी निवडूनि राजहंसें। वेगळें कीजे ॥' ज्ञा. २-१२८ 'तैसें विचारितां निरसलें। तें प्रपंचु सहजें सांडवलें। मग तत्वता तत्व उरलें। ज्ञानियांसी ॥' ज्ञा. २-१३१) देखणा-पाहणारा, द्रष्टा.

**ओवी १८०—उदास**-निरपेक्ष, अलिप्त.-आकाशाच्या ठिकाणीं देशपरिच्छेद नाहीं. ('अगा आकाश कें नाहीं। हें न रिघेचि कवणे ठायीं। परि कायिसेनी कहीं। गादिजेना जैसें' ॥ ज्ञा. १३-१११९). तें जरी सर्व वस्तूंत असलें तरी तें त्यांच्या गुणदोषांनीं लिप्त होत नाहीं. त्याचप्रमाणें भक्त हा लोकरूढीप्रमाणें सर्व व्यवहार करतो, परंतु तो कोठेंहि आसक्त नसतो. एवढेंच नव्हे तर त्या सर्व क्रियांचें कर्तृत्वहि तो आपणांकडे घेत नाहीं. यामुळें कर्मांपासून उत्पन्न होणारीं जीं सुखदुःखें अगर पापपुण्यें त्यांपासून तो अलिप्त असतो. ('आणि तयां करणेयाआंतू। घडो तिहीं लोकां घातू। परी तेणें केला हे मातू। बोलोंचि नये' ॥ ज्ञा. १८-४४८.

**ओवी १८१—संसारव्यथा**-संसारदुःख, जन्ममरणादि-दुःख. **फिटला**-मुक्त झाला, मोकळा झाला.-शास्त्रकार 'बायका, पोरें, घरदार' इत्यादि जो पसारा त्याला 'संसार' म्हणत नाहींत. वारंवार 'जन्मणें व मरणें' हें जें जीवाच्यामागें अनादि कालापासून लागलेलें चक्र त्या 'जन्ममृत्युरूपी चक्रासच' शास्त्रकार संसार म्हणतात. ('पुनरपि जननं पुनरपि मरणं पुन-

रपि जननीजठरे शयनम् । इह संसारे' शंकराचार्य. 'किती वेळां जन्मा यावें किती व्हावें फजीत ' ॥ तुका. १७५७. ) जगतांतील जेवढीं म्हणून दुःखें आहेत त्या सर्वांचा समावेश 'जन्ममरणाच्या' दुःखांत होतो. ( 'तेथ सकळ-दुःखधामें । भुंजीजती जियें मृत्युजन्में ' । ज्ञा. १८-१२७० ) जन्माच्यापूर्वी जीव आईच्या गर्भांत राहतो, त्यावेळेस त्याला भयंकर दुःख होत असतें ('काय सांगों गर्भींची यातना' । तुका. ४६१ 'प्रथम केला गर्भीं वास । काय ते सांगावे सायास ' ॥ तुका-४६२ 'मातेचिया उदरकुहरीं । पचूनि विष्ठेच्या दाथरीं । उकडूनि नवमासवरी । जन्मजन्मोनि मरती ' ॥ ज्ञा. ९-३३१ 'म्हणे पूय-गर्ते रिगाला । अहा मूत्ररंध्रें निघाला। कटा मिया चाटिला । कुचस्वेदु ॥ ' ज्ञा. १३-५३९ ) जन्मतांना जीवाला स्वतःला दुःख होतें व त्याच्या आई-लाहि फार दुःख होत असतें ( 'नवमास कष्टलासी । दहाव्यानें प्रसूत झाली । ' ज्ञा. गा. ७३२ ) ज्या मृत्युलोकांत तो जन्म घेतो तो मृत्युलोकहि अनित्य व नश्वर असल्यामुळें जीवाला अनेक दुःखें भोगावीं लागतात. ( 'अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् । ' ज्ञा. ९-श्लो. ३३ ) तात्पर्य जीवाला जें अविनाशी व निर्मळ सुख पाहिजे असतें तशा प्रकारचें सुख त्याला मृत्यु-लोकांत मिळत नाहीं, उलट दुःखच त्याला अधिक भोगावें लागतें. ( 'म्हणोनि मृत्युलोकीं सुखाची कहाणी । ऐकिजेल कवणाचिये श्रवणीं ' ज्ञा. ९-५०१ 'सुख नाहीं कोठें आलिया संसारीं । वायां हांवभरी होऊं नका ' । तुका. ३००३ ) त्याचप्रमाणें मरतांनाहि जीवाला युगांताइतकें दुःख होत असतें. ('एऱ्हवीं आयुष्याचें सूत्र बिघडतां । भूतांची उमटे खडाडता । काय न मरत-याहि चित्ता । युगांतु नोहे ' । ज्ञा. ७-१८२ ) हीं सर्व 'जन्ममृत्यु, जरा, व्याधि ' वगैरे जीं दुःखें आहेत तीं दुःखें जो शरीराला येतो व शरीराच्या उत्पत्तिबरोबर 'मी जन्मास आलों' व शरीराच्या नाशाबरोबर 'मी मेलों' असें समजतो अशा जीवालाच होतात. अशी जी समजूत त्याला 'संसार' म्हणतात ( 'अगा उपजणें निमणें । हें साचचि जें कां मानणें । तो जीवलोकु मी म्हणें संसारु हन ' ॥ ज्ञा. १५-३४७ ) तात्पर्य, आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक हीं त्रिविध दुःखें व अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभि-

निवेश' हे पंचक्लेश जो शरीराला येतो व शरीराशीं तादात्म्य करतो त्यालाच भोगावे लागतात. परंतु या भक्तानें विचाराच्या योगानें देहतादात्म्य टाकलेलें असतें ('आतां ते तंव तेणें सांडिलें । आहे स्वस्वरूपेंसीचि मांडिलें । सस्यांतीं निवडिलें । बीज जैसें' । ज्ञा. १४-३५२ ) तो शरीररूपी 'नळिका' टाकून 'मी ब्रह्म आहे' ह्या मूळ अहंकारावर आरूढ झालेला असतो. ('नलिकेवरूनि उठिला । जैसा शुक शाखे बैसला । तैसा मूळ अहंते वेढिला । तो मी म्हणौनि' ।। ज्ञा. १४-३०२). म्हणून त्याला प्रस्तुत जन्मांतील संसारदुःखे भोगावीं लागत नाहींत. त्याशिवाय त्याचें अंतःकरण वासनारहित झाल्याकारणाने देह-पातानंतर त्याला जन्म घ्यावा लागत नाहीं. अशा प्रकारें तो 'संसारव्यथेंतून' मुक्त झालेला असतो. **नैराश्य**-निराशा, निर्वासना, निरिच्छता-उत्तर जन्माला कारण 'वासना' असते. ( ' जन्म घेणें लागे वासनेच्या संगें । नाथ-११२१ ' आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीतें पावे ' ।। ज्ञा. ८-७५ ) ती वासना त्याच्या ठिकाणची निःशेष गेलेली असते. वासनेला म्हणजे इच्छेला जन्म देणारे देहतादात्म्य आहे ('जैं अहंकारतनूंसी । वालभ पडिलें' ।। ज्ञा. ७-१६५. ' तैं इच्छा हे कुमारी जाली ' । ज्ञा. ७-१६६ ) असें जें देहता-दात्म्य तें त्याच्या ठिकाणचें गेल्यामुळें त्याच्या ठिकाणीं वासनेचा त्याग सकारण झालेला असतो. (' यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः ।। अथ मर्त्योऽ मृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ।। कठ-उ. २-६-१४) **विनटला**-शोभला, सिद्ध झाला.

**ओवी १८२**— **टवंच**-टोंचणी, दुःख, त्रास-जेथें देह तादात्म्य असतें तेथें दुःख असतें ( ' देहबुद्धीचिया नरा । थोर चिंतेचा अडदरा । ' ए. भा. २-२८१ ) **सुखे**-सुखी असतो.-ह्याच्या ठिकाणचें देहतादात्म्य गेल्याकार-णानें त्याच्या आनंदाला पारावार राहत नाहीं ( ' आतां उभयां उभेपण नाहीं जयाचें ' ।। ज्ञा-८-६३ ' असों ऐसा कोठें आठवही नाहीं । देहींच विदेही भोगूं दशा ' तुका-३५५२ ' आनंदाचे डोहीं आनंदतरंग । आनंदचि अंग आनंदाचें ' । तुका. ३६३८ ) त्याला आतां संसार हा संसाररूपानें प्रतीतच होत नाहीं ( ' जीवनाचा जाला ओलावा अंतरीं । विश्व विश्वंभरीं सामावलें ' ।

तुका. ३५४० ' अवघाचि संसार केला ब्रह्मरूप । विठ्ठल स्वरूप म्हणोनियां ' ॥ तुका. १८६९ ' तैसा बुद्धयादिकांपुढां । असतु विश्वाभासु हा येवढा । तो न देखे कवणीकडां । आकाश जैसें ' ॥ ज्ञा. १८–२११ ). **गतायुषें**– मेलेल्या माणसाकडून **नेणिजे**–जाणली जात नाहीं.

**ओवी १८३—अहंकृती**–अहंकार –कोणतेहि कर्म करण्याकरितां अहंकार लागतो. मी ब्राह्मण आहे अशी जोंपर्यंत अहंता आहे तोंपर्यंत त्याच्याकडून स्नानसंध्यादि कर्मे होतील. परंतु देहाशीं तादात्म्य करणारी जी परिच्छिन्न अहंता ती ह्या भक्तानें घालविली व व्यापक जो परमात्मा त्याच्याशीं हा तद्रूप झाला आतां त्याच्याकडून कर्मे कशीं काय होणार ? हा ' नाहं मनुष्यो नच देवयक्षो । न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः ' । ए. भा. हस्तामलक श्लो. २ अशा अनुभवावर आला म्हणून तो कर्मांच्या अतीत झाला. उंसाची साखर बनल्यावर त्या साखरेचा ज्याप्रमाणें पुन्हां ऊंस तयार करतां येत नाहीं त्याचप्रमाणें ज्यानें देहावरची अहंता काढून आत्म्याशीं ती समरस केली तो पुन्हां देहतादात्म्यावर येत नाहीं ( ' नातरी साखरेचा माघौता । बुद्धिमंतपणेंही करितां । परि ऊंस नव्हे पंडुसुता । जियापरी ' ॥ ज्ञा. ८–२०० ' सेवावया स्वानंदनव्हाळी । प्रथम उसांची पानें साळीं । ' ए. भा. २८–२२२–२२४ ) आतां ज्ञानवान् पुरुषाकडून कर्मे झालेलीं दिसतात त्याला कारण त्याचे ' पूर्वसंस्कार ' होत ( ' मुक्ताचें देह तैसें । हालत संस्कारवशें । ' ज्ञा. १८–४४७ ). **निरिंधन**—सर्पणाविरहित, काष्ठरहित.—जोंपर्यंत दाह्य सर्पण असतें तोंपर्यंत अग्नि जळत असतो. त्याचप्रमाणें जोंपर्यंत अहंकाररुपी इंधन आहे तोंपर्यंत मनुष्य सारखा क्रिया करीत असतो. क्रियारूपी अग्नि टिकण्याकरितां अहंकाररूपी लांकडाचा सारखा पुरवटा पाहिजे, तो अहंकार कमी होत चालला कीं क्रियाहि आपोआप थांबत जाते. ( ' फळली केळी उन्मळे । तैसी आत्मलाभें प्रबळें । जयांची क्रिया ढाळें–ढाळें । गळती आहे ' ॥ ज्ञा. १५–२८७ )

**ओवी १८४ उपशम**—शांति—अहंकाराच्या निरासाअंतीं राहिलेली जी केवळ ' निष्कामना स्थिति ' किंवा ' अकर्तव्यता स्थिति ' त्या स्थितीला ' उपशम ' म्हणतात. याच स्थितीवर येऊन तुकाराममहाराज म्हणतात.

(‘ काम नाहीं काम नाहीं । जालों पाहीं रिकामा ।। फावल्या त्या करूं चेष्टा । निश्चळ द्रष्टा बैसोनी ।। तुका–३५८८ ‘ तुका म्हणे लाभ अकर्तव्या नांवें । शिवपद जीवें भोगिजेल।।’तुका–३७७७). अशा प्रकारची ‘निष्कामना स्थिति’ प्राप्त झाली असतां मोक्ष हमखास मिळतो. **आंगा**—बाजूला, खात्याला.

**ओवी १८५ ठावोवरी**—ठिकाणापर्यंत, टप्प्यापर्यंत. **सरोभरी**—खच्चून भरल्यामुळें, पूर्ण बाणल्यामुळें. **पैलतीरीं**—पलीकडच्या कांठावर—तो भक्त द्वैताच्या पलीकडची जी अद्वैतस्थिति त्या स्थितिप्रत प्राप्त झाला. त्याच्या अद्वैतानुभवांत सर्व त्रैलोक्याची आटणी झाली. (‘ एकवीस स्वर्ग दळियले चौदाभुवनांसहित ’ नाथ—१७६ ). त्याला विषय हे विषयरूपानें प्रतीत होत नाहींत (‘ तो दिठीं जें पाहे । तें आपणाचि होऊनि जाये । ज्ञा.४·११० ‘ आतां आमोद सुनास जालें । ’ अमृ. ९–१ ) सर्व ठिकाणीं सर्व रूपानें मीच मी ओतप्रोत भरलेला आहे अशा व्यापक बोधावर तो आल्याकारणानें त्याच्या ठिकाणीं द्वैतप्रतीति राहिलीच नाहीं.

**ओवी १८६ —भक्तिसुखालागीं**-भक्तिसुखाकरतां.–वास्तविक भक्ताला प्राप्तव्य असें कांहींहि राहिलेलें नसतें. (‘किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत्.’ पंचदशी ) ‘ म्हणौनि ज्ञानिया पुरुषा । कृत्य करूं सरलें देखा । ऐसा अनाथांचा सखा । बोलिला तो ।।’ ज्ञा. १५–५८७ ) असें असतांना तो भक्तिसुखाचा आनंद भोगण्याकरितां आपल्यालाच ‘ देव व भक्त ’ अशा दोन भागांत वांटतो म्हणजे द्वैत करतो. कोणतीहि क्रिया होण्याकरितां द्वैत असावें लागतें. भजनाचा आनंद हा वृत्तिशून्यावस्थेंत प्राप्त होत नाहीं (‘ जळ न खाती जळा । वृक्ष आपुलिया फळा । भोक्ता निराळा । तेणें गोडी निवडिली ।। तूं स्वामी मी सेवक ।।’ तुका. ९१० ) खऱ्या भक्तीचा प्रारंभ हा भगवद्रूपता प्राप्त झाल्यानंतरच होतो. ज्याप्रमाणें राजा हा स्वतः राजा झाल्याखेरीज राजेपणाचा आनंद भोगूं शकत नाहीं त्याचप्रमाणें खऱ्या भक्तीचा आनंद भगवंताशीं समरस झाल्याखेरीज भोगतां येत नाहीं (‘ हां गा राजन्यत्व नव्हतां आंगीं । रावो रायपण काय भोगी । कां आंधारु हन आलिंगी । दिनकरातें ।।’ ज्ञा. १८–११४४ ). कित्येक लोक अद्वैतांत भक्ति होत नाहीं

असें म्हणतात. परंतु तें त्यांचें म्हणणें योग्य नाहीं. ज्याप्रमाणें गंगा ही समुद्राला मिळते व लाटेच्या रूपानें त्याच्यावर खेळत असते ( 'घडोनि सिंधूचिया आंगा । सिंधूवरी तळपे गंगा । तैसा पाडू तया भोगा । अवधारी जो ॥' ज्ञा. १८-११३८ ). किंवा एकाच दगडावर ज्याप्रमाणें राम व मारुती हे दोघेहि कोरून काढतां येतात ( 'देव देऊळ परिवारू । कीजे कोरूनि डोंगरू । तैसा भक्तीचा वेव्हारू । कां न व्हावा ॥' अमृ. ९-४२ '. त्याचप्रमाणें अद्वैतांत भक्ति होणें संभवनीय आहे. ( 'तैसी क्रिया कीर न साहे । तऱ्ही अद्वैतीं भक्ति आहे । हें अनुभवाचिजोगें नव्हे । बोला-ऐसें ॥' ज्ञा. १८-११५१ ). भक्तांमध्यें दोन वर्ग आहेत. कांहीं योगमार्गानें निर्गुण साक्षात्कार करून घेतात, दुसरे सगुण परमात्म्याची भक्ति करून निर्गुण साक्षात्कार प्राप्त करून घेतात. ह्यांपैकीं दुसरे भक्त जे आहेत त्यांनाच भक्तिसुखाचा आनंद मिळतो ( 'भक्तिप्रेमसुख नेणवे आणिकां । पंडित वाचकां ज्ञानियांसी ॥' तुका ३२१५ ). योगीजनांना भक्तीचा आनंद प्राप्त होत नाहीं. मुदलांत तोटा न येता जर शेकडां एक रुपयाप्रमाणें व्याज मिळत असेल तर पैसे घरीं ठेवणें ज्याप्रमाणें वेडेपणाचें होईल त्याचप्रमाणें अद्वैत अनुभवांत किंचित् मात्र बिघाड न होतां भक्तिसुखाचा आनंद मिळत असतांना तो आनंद न घेणें हें योग्य ठरणार नाहीं ( 'अहो ऐक्याचें मुद्दल न ढळे । आणि साजिरेपणाचा लाभु मिळे । तरी स्वतरंगाचीं मुकुळे । तुरुंबु कां पाणी ॥' अमृ. १-५९ ). श्रीमच्छंकराचार्य, श्रीज्ञानेश्वरमहाराज, तुकाराममहाराज, नामदेवादिक ही जी संतमंडळी आहेत ती अद्वैतानुभव प्राप्त झाल्यानंतर भक्तिसुख भोगणारी आहेत. श्रीमच्छंकराचार्य म्हणतात ' सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ॥ ' ३ आचार्यकृत षट्पदी. ज्ञानेश्वरमहाराज हेहि सगुणप्रेमी होते ( 'माझे जीवींची आवडी । पंढरपुरा नेईन गुढी । ज्ञा. गा. ६१ ). **दोही भागीं**-दोन भागांत-**सेवकै**-सेवकपणा. **बाणी**-स्थापितो, घेतो, स्वीकारतो.

**ओवी १८७—भजती**-भजण्याची. **वोज**-रीत, मार्ग. ज्याप्रमाणें नावेंतून नदीच्या पैलतीरावर गेल्यानंतर आपलें कार्य झालें म्हणून ती नौका जाळूं नये ( 'जाळूं नये नाव पावलेनि पार । मागील आधार बहुतांचा ।' तुका.

३१०८ ). त्याचप्रमाणें ज्या भक्तीच्या योगानें हे भक्त पैलतीराला गेले ती भक्तिरूपी नाव ते टाकून देत नाहींत. लोकांना भक्तिमार्ग कळावा येवढ्या: करितां ते त्याचें आचरण करीत राहतात. ( ' तैसे संत जगीं । क्रिया करूनि दाविती अंगीं ॥ ' तुका. १९२८ ).

**ओवी १८८—व्यसन**-छंद-भक्ताला देवापासून कांहींहि मिळवावयाचें नसतें. त्याचें भगवंतावर निर्व्याज प्रेम असतें. देवहि अशा भक्तांकरितां अगदीं वेडा होऊन जातो ( 'एवढा त्यांचा छंद देवा । काय सेवा भक्ती ते ' तुका. २९७५ ' वेडा झाला वेडा झाला । लांचावला भक्तीसी ' तुका. २९५० ' वैष्णवाघरीं देव सुखावला । बाहीर न वजे दवडोनि घातिला ' नाथ. १७४१ ). **किंबहुना**-फार काय सांगावें.

**ओवी १८९**—रूपा येणें-आकाराला येणें, अवतार घेणें-भक्त हे व्यावहारिक सत्तेंत असल्यामुळें देवालाहि भक्तांचें कार्य करण्याकरितां व्यावहारिक सत्तेंत यावें लागतें. येवढ्यांकरितां देव आपलें निर्गुणनिराकार स्वरूप टाकून सगुणसाकार होतो. ( ' आम्हांसाठीं अवतार । मत्स्यकूर्मादि सूकर । ' तुका. १२७७ ' मी अजन्मा त्यांचेनि जन्म धरीं । ' ए. भा. १४-२७६ ). **लोण कीजे**-ओवाळून टाकावें.

**ओवी १९०—सारिखे**-समान, सादृश.-आत्मप्राप्तीइतकी लाभदायक दुसरी कोणतीहि गोष्ट भक्ताला वाटत नाहीं. याचें कारण भक्ताला आत्म्याच्या ठिकाणीं असलेलें जें अपार, अविनाशी व अखंड सुख तें अपरोक्षरीत्या अनुभवास आलेलें असतें ( ' देशेंकाळें वेदानुवादा । ज्या सुखाची न करवे मर्यादा । त्या सुखाची सुखसंपदा । मद्भक्त सदा भोगिती ॥ ' ए. भा. १४-२०१ ). एवढेंच नव्हे तर जगतांत आनंद देणाऱ्या जेवढ्या म्हणून वस्तु आहेत त्यांच्या ठिकाणीं जो आनंद आहे तो आत्म्याचाच आहे ' एतस्यैवानन्दस्यान्यानि भूतानि मात्रामुपजीवन्ति ' बृह. उ. ४, ३, ३२ ' यो भूमा स सुखं नाल्पे सुखमस्ति ' पंचदशी. ज्याप्रमाणें एखाद्या कोट्याधीश माणसाला दोन कवड्या दान केल्या तर त्याला आनंद होणार नाहीं त्याचप्रमाणें भक्ताला अमुप असा आत्मानंद प्राप्त झाल्यामुळें त्याला त्याच्यापुढें ऐहिक व पारत्रिक

भोगाची मुळींच किंमत वाटत नाहीं. ( 'जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें म्हणे । तो केवी रंजे पालिवणें । भिल्लांचेनि ॥' ज्ञा. २-३६३. 'तेसें आत्मसुख उपाइलें । जयासि आपणपांचि फावलें । तया विषय सहज सांडवलें, म्हणों काई ॥' ज्ञा. ५-१०८ 'याचें सुख तुम्हां कळलियावरी । मग दारोदारीं न फिराल' तुका. २३ ) **भोगविशेखें**-भोगाच्या आधिक्यानें, विशेष भोगानें, उत्तम भोगानें. **हरिखेजेना**-आनंद होत नाहीं.

**ओवी १९१—जाहला**-झाला, बनला.-तो भक्त शरीराच्या दृष्टीनें जरी साडेतीन हातांचा असा परिच्छिन्न दिसत असला तरीपण अनुभवाच्या दृष्टीनें जेवढा परमात्मा व्यापक तेवढा तो व्यापक झाला. याचें कारण त्याच्या ठिकाणचा संकल्प गेला. ('तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं' ज्ञा.६-१८२) वास्तविक जीव हा मूळचा परमात्माच आहे, पण त्यानें शरीराशीं भ्रांतिज तादात्म्य केल्यामुळें तो जीवत्वदशेला आला यामुळें तो आपल्याला शरीरा-इतका मर्यादित समजूं लागला. या भक्तानें तें शरीरतादात्म्य टाकल्यामुळें तो परमात्मा बनला. ( 'देह नव्हे मी हें सरे । उरला उरे विठ्ठल' तुका. ३७३८ ) त्याचा परिणाम असा झाला कीं तो परमात्म्याएवढा व्यापक झाला. ( 'लेणें सोनेंचि जो जाणें । तो लेणेंपण तें वावो म्हणे । तेवीं मी जाणोनि जेणे । वाळिला भेदु" ॥ 'मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वतःसिद्धु । जो आपणेनसीं भेदु । नेणोनि जाणे" ॥ ज्ञा.१५-५६१ ५६२ 'अगा हे जेवढी माझी व्याप्ति । तेव्हढीचि तयांची प्रतीती" ॥ ज्ञा.९-२५८ 'तैसें संकल्पोनि काढिलें । जयाचे मनचि चैतन्य जाहलें । तेणें एकदेशियें परी व्यापिलें । लोकत्रय' ज्ञा. ५-३६ ). **भेदभाव**-द्वैत-भेदाला म्हणजे द्वैताला कारण जी अल्प अहंता तीच त्याच्या ठिकाणची गेलेली असते. ( 'एथ भेदु तरी कीं देखावा । जरी अहंभाव उरला होआवा । तो आधींचि नाहीं आघवा । आतां विषम काई' ज्ञा. ५-९५ ). मी अमुक एक आहे अशी कल्पना जेव्हां असते तेव्हांच आपल्याला आपल्याहून दुसरें कांहीं भिन्न प्रतीत होत असतें. पण सर्व ठिकाणीं मीच मी ओतप्रोत भरलेला आहे अशा व्यापक अनुभवावर जो भक्त आला त्याच्या ठिकाणीं द्वैत राहणें शक्य नाहीं.

( 'तुका म्हणे जेव्हां गेला अहंकार । तेव्हां आपपर बोळविले' तुका. ३६०० 'एक आपणपेंचि पां जैसें । ते देखती विश्व तैसें' ॥ ज्ञा. ५–८९ ) **ठेला**–राहिला, थांबला, नष्ट झाला–द्वैताबरोबर द्वेषहि नाहींसा होतो, कारण आपल्यापासून वेगळें त्याला कांहीं दिसावें मग त्यानें त्याच्यावर रागवावें ? ( 'कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं झाली समता ' तुका १९४० )

**ओंवी १९२—साचें**–खरें–तो भक्त शरीराला 'मी' समजत नाहीं तर तो आपलें खरें स्वरूप जो आत्मा तो मी आहें असें समजतो ( 'मग इदंतेसि वाळलें । जे मीपणेवीण डाहारलें । तें रूप पाहिजे आपलें । आपणचि ' ज्ञा. १५–२६७ ) आत्मा हा सृष्टीबरोबर उत्पन्न होत नाहीं व सृष्टीच्या नाशाबरोबर त्याचा नाशहि होत नाहीं. ( ' अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः' ज्ञा. १३ श्लो. ३१ 'सृष्टीचा होणा न रचे । सर्व संहारें न वेंचे । आथीनाथी या दोहींचें । पंचत्व तो' ज्ञा. १३–१११२. 'देशेंकालें स्वभावें । वेंचु जया न संभवे' ज्ञा. १८–१२५८ ). अशा प्रकारचा जो अविनाशी आत्मा तो आपलें सत्स्वरूप आहे असें त्याच्या अनुभवाला आल्याकारणानें तो इतर नाश पावणाऱ्या वस्तूंबद्दल शोक करीत नाहीं. **गताचें**–गेलेल्याचा, नष्ट झालेल्याचा–भक्ताच्या ठिकाणीं 'नित्यानित्यवस्तुविवेक' असतो, म्हणून तो नाशिवंत वस्तुबद्दल शोक करीत नाहीं ( 'आणि शरीरजात आघवें । हें नाशवंत स्वभावें' । ज्ञा. २–१३६ 'ठाउकाचि आहे संसार दुःखाचा । चित्तीं सीण याचा वाहों नये' तुका २२५३ ). श्रीप्रभु रामचंद्रानें वालीची बायको जी तारा, ती वाली मरणानंतर शोक करूं लागली असतां तिला अशा प्रकारचाच उपदेश केला आहे "तारे, वालीला जर तूं शरीर समजत असशील तर तो मृत शरीराच्या रूपानें तुजजवळ पडलेला आहे. बरें, त्याला तूं आत्मा समजत असशील तर तो अविनाशीच आहे, अतएव तुला शोक करण्याचें मुळींच कारण नाहीं." सामान्यतः लोक चालत्या बोलत्या देहालाच आत्मा समजतात म्हणून त्यांना मरणाच्या वेळीं शोक करण्याचा प्रसंग येतो. वास्तविक आत्म्याचा व देहाचा अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं ( 'या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा । पैं नित्य सिद्ध आपैसा । अनादिपणें ' ज्ञा. १३–११०६ ). भक्त हा

मी आत्मा आहे असें समजतो म्हणून तो कोणत्याहि वस्तूबद्दल केव्हांहि शोक करीत नाहीं.

**ओवी १९३—जयापरौतें**-ज्याच्यापलीकडे—परमात्म्याच्या पलीकडे जगतांत दुसरें प्राप्तव्यच नाहीं ('सा काष्ठा सा परागतिः' कठ–उ–१–३–११) ज्याप्रमाणें देऊळाच्या कामाची शेवटची मर्यादा म्हणजे कळस, किंवा नदीची शेवटची हद्द समुद्रप्रवेश, किंवा सोन्याच्या कसांतील शेवटचा कस म्हणजे शंभर नंबरी कस त्याचप्रमाणें 'ब्रह्मरूपता' ही जीवाच्या वाढीची शेवटची मर्यादा आहे. ('देउळाचिया कामा कळसु। परम गंगेसी सिंधु प्रवेशु। कां सुवर्णशुद्धी कसु। सोळावा जैसा।' ज्ञा. १८–९८१ 'म्हणौनि ब्रह्मेशाना-परौतें। वाढणें नाहीं जीवातें। तेथूनि मग वरौतें। ब्रह्मचि कीं' ज्ञा–१५–२०३.) **तें**-तें (ब्रह्म) **आपणपेंचि**-आपणच. **आपल्या ठायीं**-स्वतः-च्याच ठिकाणीं. **जाह्ला**-झाला. **यालागीं**-म्हणून.

**ओवी १९४—नुमटे**-प्रगट होत नाहीं, दिसत नाहीं.-मनुष्य ज्यानें 'लाभ' होतो त्याला 'गोमटें' म्हणजे चांगलें म्हणतो व ज्यानें 'अलाभ' होतो त्याला 'वोखटें' म्हणजे वाईट म्हणतो. सूर्याच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें अंधकार व प्रकाश ह्या दोन्ही कल्पना नाहींत ('अगा रात्री आणि दिवो। हा तंवचि द्वैतभावो। जंव न रिगिजे गांवो। गभस्तीचा'॥ ज्ञा.–१८–१२५६). त्याचप्रमाणें सर्व ठिकाणीं मीच मी आहे अशा भूमिकेवर तो भक्त आल्याकारणानें त्याच्या दृष्टीला ह्या जगतांत लाभ व अलाभ अशा गोष्टी प्रतीत होत नाहींत (तैसें शुभाशुभ ऐसें। हें तंवचिवरी आभासे। जंव येकु न प्रकाशे। सर्वत्र मी'॥ ज्ञा.–१८–१२५५ 'तुका म्हणे हरिच्या दासा। शुभकाळ अवध्या दिशा' तुका–१९२९). **न घटे**-घडत नाहीं, होत नाहीं.

**ओवी १९५—बोधुचि**-बोधरूपच, ज्ञानरूपच. **निष्कलु**-पूर्ण–तो केवळ बोधरूप म्हणजे ज्ञानघन असतो अशा अद्वैत अनुभवावर येऊनहि तो भजनशील असतो ('गाय वासुदेव वासुदेवा। भिन्न नाहीं आणिक नांवा'। तुका–३४५ 'ज्ञानाचा उद्बोध। भक्तिप्रेमाचा कल्लोळ' नाथ. ३७०२).

**ओवी १९६—पढियंते**-आवडणारे. **सोयरे**-नातलग-भगवंताला ज्ञानी भक्ताइतकें प्रिय कोणीहि असत नाहीं ( 'न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शंकरः : ' ए. भा. १४ श्लो. १५ 'भक्ताहूनि देवा आवडतें काई । त्रिभुवनीं नाहीं आन दुजें ' तुका-२०९४ ). **साचोकारें**-खरोखर.

**ओवी १९७—वैषम्याची**-विषमतेची, भेदबुद्धीची-भक्ताची 'समदृष्टि' झालेली असते. म्हणजे सर्वकाळीं, सर्व ठिकाणीं व सर्व रूपानें असणारें जें अद्वैत ब्रह्म तें आपणच आहोंत अशा समजुतीवर तो आला ( म्हणोनि सर्वत्र सदा सम । तें आपणचि अद्वय ब्रह्म । हें संपूर्ण जाणें वर्म । समदृष्टीचें ' ज्ञा. ५-९६ ). त्याचा परिणाम असा झाला कीं, त्या भक्ताच्या ठिकाणचा भेदभाव संपूर्ण नाहींसा झाला. ( 'विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पाडिताः समदर्शिनः ' ज्ञा. ५ श्लो. १८ 'आतां हें सोवळें जालें त्रिभुवन । विषम धोऊन सांडियेलें । ब्रह्मपुरीं वास करणें अखंड । न देखिजे तोंड विटाळाचें ' ॥ तुका-४०६२ ). **रिपुमित्रां**-शत्रुमित्रांची. **सरिसा**-सारखी. **पाडु**-योग्यता.

**ओवी १९८—नेणेचि**-जाणत नाहीं.-चोरी करण्यास चोर जरी घरांत आलें तरी दिवा जसा मालकाला प्रकाश देतो तसा चोरांनाहि देतो. दिव्याच्या प्रकाशावर जर कोणी अश्लील वाङ्मय वाचीत असला तर दिवा त्याला विरोध करीत नाहीं किंवा एखादा गीता वाचीत असला तर त्याला प्रोत्साहनहि देत नाहीं ('जैसा दीपु ठेविला परिवरीं । कवणातें नियमीं ना निवारी' । ज्ञा.-९-१२८ ).

**ओवी १९९—खांडावया**-तोडण्याकरितां. **लावणी**-लागवड, पेरणी-वृक्ष तोडणारा हा जर वृक्षाच्या खालीं निजला तर त्याच्या अंगावर वृक्ष कोसळून पडत नाहीं कारण त्याच्या ठिकाणीं शत्रुमित्र असा दुजा भाव नसतो. ( पत्र पुष्प छाया । फळें मूळें धनंजया । वाटेचा न चुके आलिया । वृक्षु जैसा ' ज्ञा. १६-८६ ).

**ओवी २००—इक्षुदंडु**-ऊंस.**पाळितया**-पोषण करणाऱ्यास. **गाळीतया**-गाळणाऱ्यास, पिळून काढणाऱ्यास.

**ओवी २०१—भावो**—भावना-शत्रु व मित्र यांच्या ठिकाणीं त्याची समबुद्धि असते. ह्याचें कारण त्याची गुणदोषांवर दृष्टि नसते. तो दोघांनाहि आत्मरूपानें पाहतो. तमोगुणी मनुष्य अतिक्रोधी असतो व सत्वगुणी मनुष्य अतिशांत असतो. त्यांच्या स्वभावांतील भेदाला कारण त्यांच्या दोघांच्या ठिकाणीं असलेले विरुद्ध गुण होत. परंतु या दोघांच्या ठिकाणीं आत्मत्व हें सारखेंच असतें. ( ' एक सत्ववृत्ति अतिशांत । कां जो क्रूर तामसयुक्त । गुणवैषम्यें भेद भासत । आत्मत्वें निश्चित समसाम्य भक्तां । ' ए. भा. २९–३०२ ). ह्याची दृष्टि आत्म्याच्या ठिकाणीं स्थिर असल्यामुळें त्याच्या दृष्टींत विषमता नसते. ( अक्रूरे क्रूरके चैव समदृक् पंडितो मतः । ' ए. भा. २९–१४ ). तुकारामबुवांना एके दिवशीं मंबाजीबुवानें काटीनें मारलें, परंतु तुकारामबुवा लगेच मंबाजीबुवाच्या घरीं गेले व आपल्याला मारल्यामुळें त्याचे हातपाय दुखत असतील म्हणून ते चेपूं लागले. तात्पर्य, भक्त हा शत्रु व मित्र या दोघांशीं सारखाच वागतो. ( ' कां सुहृद पासीं आलें । अथवा वैरी वरपडे जाले । परी नेणे राती पाहालें । तेज जेवीं । ज्ञा.–१४–३६३ ). **सरिसा**—सारखा–त्याच्या ठिकाणीं मान व अपमान यांची किंमत सारखी असते, याचे कारण त्याच्या ठिकाणचें शरीराचें तादात्म्य गेलेलें असतें. ( ' ईश्वरबुद्धी पूजिला । कां चोरू म्हणोनि गाजिला । वृषगजीं वेढिला । केला रावो । ' ज्ञा.–१४–३६२ ). मान व अपमान हे शरीराचे होत असतात. हार हाहि शरीरालाच घालतात व जोड्याने पूजा ही शरीराचीच करतात. साउली ही ज्याप्रमाणें मनुष्य आपणाहून अगदीं भिन्न समजत असतो त्याचप्रमाणें भक्त हा शरीराला आपणाहून अगदीं दूर पहातो. सावली पालखींत पडली तर कोणालाहि हर्ष होत नाहीं, बरें ती विष्ठेवर पडली तर त्याचे दुःख होत नाहीं. तद्वतच शरीराची पूजा केली तर भक्त फुगून जात नाहीं, बरें कोणी अपमान केला तर हा खिन्नहि होत नाहीं. सुखदुःखादि द्वंद्वाला कारण असणारें जें देहतादात्म्य तें त्याच्या ठिकाणचें निःशेष गेलेलें असतें. ( एऱ्हवीं तरी सहजें । सुखदुःख तैंचि सेविजे । देहजळीं होइजे । मासोळी जैं । ज्ञा–१४–३५१ आइकें सकळ दोषतृणीं । अंकुरिजती जिये मेदिनी । तिये भेदबुद्धीची काहाणी । नाहीं जयातें । ज्ञा–१५–२८९ ).

**ओवी २०२—मान**—किंमत, गणना.

**ओवी २०३—मारुत**—वारा. **मेरु**—मेरु नांवाचा पर्वत—मेरु पर्वत हा स्वर्ग, मृत्यु व पाताळ ह्या तिन्ही लोकांना आधारभूत असा पर्वत आहे. सामान्य पर्वतावर वाऱ्याचा परिणाम होत नाहीं मग मेरु पर्वतावर तो कसा होणार ? तद्वतच सुखदुःखानें ह्याच्या चित्तांत भंग होत नाहीं. ( 'नाना दुःखीं प्राप्तीं । जयासी उद्वेगु नाहीं चित्तीं । आणि सुखाचिया आर्ति । अडपैजेना । ज्ञा–२–२९४ 'मग मेरूपासूनि थोरें । देहदुःखाचेनि डोंगरें । दाटिजो पां परि भारें । चित्त न दटे । ज्ञा–६–३६९ ) ह्याचें कारण सुखदुःखांना संवेदन करणारें जे चित्त त्या चित्तानें देहाचें तादात्म्य टाकून तें आत्मसुखात निमग्न होऊन राहिलेलें असतें. ( 'कां शस्त्रवरी तोडिलिया । देह अग्निमाजीं पडलिया । चित्त महासुखीं पहुडलिया । चेवोचि नये । ज्ञा–६–३७० ). **मध्यस्थु**—मध्यभागीं राहणारा, तटस्थ, उदासीन.

**ओवी २०४—माधुर्य**-आल्हादकत्व, मधुरपणा, मनोरमता. **चंद्रिका**-चांदणें–चांदणें हें जसें गच्चींत, पलंगावर पडलेल्या राजाला आनंद देतें तसेंच वाळवंटांत घोंगडीवर पडलेल्या दरिद्र्यालाहि आनंद देतें. त्याचप्रमाणें संत हे शत्रु व मित्र या दोघांनाहि आनंद देतात. संत हे सर्वांशीं 'सम' असतात ह्याचा अर्थ दगडाप्रमाणें ते 'उदासीन' असतात असा नव्हे. तर शत्रु व मित्र असा भेदभाव त्यांच्या ठिकाणीं नसतो. सर्व भूतमात्रांविषयीं त्यांच्या ठिकाणीं कळकळ असते म्हणून ते सर्वांना सारखेच सुख देतात. ( ऐसी अनवछिन्न समता । भूतमात्रीं सदयता । आणि पालटु नाहीं चित्ता । कवणे वेळें । ज्ञा. २–२९८. 'सुखदुःख समान । सकळ जिवांचा कृपाळ । ज्ञानाचा उद्बोध भक्तिप्रेमाचा कल्लोळ । नाथ–३७०२ ).

**ओवी २०५—सेव्य**-सेवनीय. भूतांचे आहार जरि भिन्न भिन्न असले, जसें–माणसें अन्न खातात, जनावरें गवत खातात, हिंस्र पशु मांस खातात व सर्पादि वायु भक्षण करतात; तरीपण सगळ्यांना पाणी हें सारखेंच प्रिय असतें. **तिन्ही लोक**-तीन लोक–'तीन' म्हणजे स्वर्ग, मृत्यु व पाताळ, हे तिन्ही लोक

किंवा सात्विक, राजस व तामस या तीन स्वभावाचीं माणसें. ( प्रकारचें तीन तुका म्हणे केले जन । तुका—३१९१ ).

**ओवी २०६—सबाह्यसंग**—अंतर्बाह्य संग. **लाग**—संबंध—तो अंतःसंग व बाह्यसंग अथवा अंतःपरिग्रह व बाह्य परिग्रह यांचा संबंध टाकतो. ( सर्व संगीं वीट आला । तूं एकला आवडसी ' तुका. ७८९). संगाला परिग्रह असेंहि दुसरें नांव आहे. परिग्रहांत दोन भेद आहेत: ( १ ) बाह्यपरिग्रह अथवा बाह्य-संग व ( २ ) अंतःपरिग्रह अथवा अंतःसंग. बाह्यपरिग्रहांत पुन्हां दोन पोटभेद आहेत. एक जन्माबरोबर मागे लागलेला जसें आईबाप, भाऊ, बहीण वगैरे व दुसरा कर्म व वासना यांनीं संपादन केलेला—जसें बायकामुलें; घरदार, संपत्ति वगैरे. ह्या बाह्यपरिग्रहास 'अविद्येचा अथवा ओंवळा' बाह्यपरिग्रह म्हण-तात. शिष्य, शिष्यिणी, मठ वगैरे ह्याला ' विद्येचा किंवा सोवळा ' बाह्य-परिग्रह म्हणतात. ह्यांपैकीं आईबाप किंवा बायकापोरें हीं जोंपर्यंत मनुष्य त्यांना सुख देत असतो तोंपर्यंत ते त्यांचें कोडकौतुक करतात. कित्येकवेळां ते भक्ताच्या भजनमार्गाच्या आडहि येतात ('येती तुझिया भजना आड । दाविती प्रपंचाचें कोड । कनिष्ठीं रुचि ठेवूनि गोड । देखत नाड कळतसें' तुका—४५९ ' लावु-नियां मोह संसारीं गोविती । अंतकाळीं होती पाठमोरीं ' तुका—) तद्वतच शिष्य मठ इत्यादि परिग्रह निःसंगाला पुन्हा संगाच्या पाशात टाकीत असतो. ( शिष्य शास्त्रादि विलासें । मठादि मुद्रेचेनि मिसें । घातले आहाती फांसे । निःसंगा जेणें ॥ ज्ञा. १८–१०६४ ) एवढयाकरितां भक्त हा ह्या सर्व परि-ग्रहांचा त्याग करतो. अंतःपरिग्रहांतहि दोन पोटभेद आहेत:—(१)'अविद्येचा अथवा ओंवळा' अंतःपरिग्रह व ( २ ) विद्येचा अथवा सोंवळा अंतःपरिग्रह. अहंकार व कामक्रोधादिक जे विकार त्यांना ' अविद्येचा अथवा ओंवळा अंतःपरिग्रह म्हणतात व 'शांति, क्षमा, दया ' ह्यांना विद्येचा अथवा सोवळा अंतःपरिग्रह म्हणतात. अहंकार व कामक्रोधादिक विकार हे जीवाचे घात करतात ( 'त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः । कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादे-तत्त्रयं त्यजेत्'' ॥ गी. १६–२१ ) त्याचप्रमाणें शांति, क्षमा, दया, यांचा अतिरेकहि परमार्थाच्या आड येतो. अतिदयेच्या योगानें भरतराजाला मृग—

जन्मास जावें लागलें ( 'कृपेनें केला जो संगु । तोचि योगियां योगभंगु । यालागीं जो निःसंगु । तोचि अभंगु साधक ' ( ए.भा. २–१५६ ) एवढ्याकरितांच निळोबाराय म्हणतात, 'शांति क्षमा दया । त्याही नका पंढरीराया ( 'शांति दया क्षमा ऋद्धी । हेही पाहतां मज उपाधी' ज्ञा.गा. ७२७ ) भक्त हा अंतःपरिग्रहाचाहि त्याग करतो. **आंगीं आंगु सूनि असे**–आंगांत आंग घालून असतो. ' आंगांत आंग घालावयाचें' ह्याचा अर्थ 'ब्रह्मस्वरूपांत, 'जीवत्वदशेचा' लय करावयाचा म्हणजे 'मी देह आहे' ही वृत्ति टाकून 'सत् चिद् आनंदरूप' जें ब्रह्म तें मी आहे या व्यापक बोधावर यावयाचें. या बोधावर येण्याकरितां तो प्रथमतः पंचकोशांचा, तीन देहांचा व तीन अवस्थांचा विचार करतो व असा विचार करतां करतां ह्यापैकीं मी कोणीहि नसून या सगळ्यांचा 'साक्षी' जो आत्मा तो मी आहे अशा निश्चयावर तो येतो. नंतर गुरूच्या 'तत्त्वमसि' या महावाक्याचा उपदेशानें जागृत झालेला जो बोध तो बोध ' अहंग्रह ' ध्यानानें दृढ करतो म्हणजे 'मी ब्रह्म आहें ' अशा अपरोक्ष अनुभवावर तो येतो. ( गुरुवाक्यें उठविला । बोधीं निश्चयो आपुला । न्याहाळीं हातीं घेतला । आरिसा जैसा ॥ ' पैं ध्याता आपणचि परी । ध्यानरूप वृत्तिमाझारीं । ध्येयत्वें घे हे अवधारीं । ध्यानरूढी गा ॥' तेथ ध्येय ध्यान ध्याता । ययां तिहीं एकरूपता । होय तंव पंडुसुता । कीजे तें गा ॥' ज्ञा. १८–१०३२ –३४ ) ह्याचा परिणाम असा होतो कीं आपणासकट सर्व ठिकाणीं मीच मी ओतप्रोत भरलेला आहें अशा अद्वैत अनुभवावर तो येतो. ( ' पुढती अस्तवेना ऐसें । जया पाहलें अद्वैत दिवसें । मग आपणपांचि आपण असे । अखंडित ॥ ज्ञा–६–१०५ अस्त नाहीं आतां एकचि मोहोरा । पासूनि अंधारा दुरी जालों । तुका–३४९९. ' तुका म्हणे आम्हां एकांताचा वास । ब्रह्मीं ब्रह्मरस सेवूं सदा । तुका–४०६२ ) असें अद्वैत अनुभवावर येणें हेंच ' एकाकी ' राहणें होय. ( तैसा आत्मत्वें वेष्टिला होये । तो जयातया दृश्यातें पाहे । तें दृश्य द्रष्टेपणेंसी होत जाये । तयाचेंचि रूप ॥ ज्ञा.–१८–४१० )

**ओवी २०७—न श्लाघे**–चढून जात नाहीं. ( आपणांस ) श्लाघनीय मानीत नाहीं. **लेपु**–लेप, माखण, रंग, ( आतां गृहादिक आघावें । तें कांहीं

नलगे त्यजावें । जे घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु म्हणऊनि ॥ ज्ञा. ५-२२ ). मान किंवा स्तुति घेणारी जी अंतःकरणवृत्ति तीच मुळीं याची आत्मस्वरूपांत लीन झालेली असते. ( 'हा ब्रह्मा ऐसेनि स्तविजा । कां नीच म्हणोनि निंदिजो । परी नेणें जळों विझों । राखोंडी जैसी ॥ ज्ञा. १४-३६० निंदी कोणी मारी । वंदी कोणी पूजा करी ॥ मज हेहि तेंहि नाहीं । वेगळा दोहीं-पासूनी ॥ तुका. ३५४२ ).

**ओवी २०८—पांति**-पंक्ति, वर्ग. **मान**-गणना, समावेश. **वृत्ति**-वर्तन, रीत.

**ओंवी २०९—मौनी**-मौन व्रत घेतलेला-मौनांत कांहीं प्रकार आहेत. जसें कांहीं लोकांचा जेवतांना न बोलण्याचा नियम असतो. अशा एखाद्याला जेवत असतांना जर कडु भोपळ्याची भाजी वाढली व पानांत न टाकण्याचा जर त्याचा नियम असला तर तो ती कडु भाजी खाऊन टाकतो, पण मनांत चरफडत असतो कीं, एकदां जेवण केव्हां होईल व स्वयंपाकाच्या बाईची हजेरी केव्हां घेईन. ह्या ठिकाणीं त्याची 'वैखरी' वाणी बोलत नसते परंतु 'मध्यमा' वाणी आंतल्या आंत पुटपुटत असते. ( काय करावे तें मौन्य । दाहीदिशा हिंडे मन । तुका. २६५१ ). पूर्वीच्या काळांत नवरा व बायको ही चार मंड-ळींच्या देखत बोलत नसत. परतु हें जरी त्यांचें न बोलणें दिसत होतें तरीपण त्यांचे एकमेकांकडे पाहण्यांत पुष्कळ बोलणें होत असे ( 'स्त्रीपुरुषें अबोला चालती । तो अबोला कीं अतिप्रीती ।' एका. ११-३३२ ) पण ह्या महा-त्म्याचें मौनव्रत या दोहींपैकींहि नव्हे. व्यवहारांत कित्येक वेळां परिणामाकडे दृष्टि ठेवून असत्य बोलावें लागतें. जसें वैद्यानें रोग्याला 'तूं आतां लवकरच मरशील' असें सांगतां कामा नये. अथवा व्याध गाईची शिकार करण्यास निघाला असतां 'गाय ह्या बाजूनें गेली कां ?' असें त्यानें विचारलें असतां 'ती गेली नाहीं' असेंच खोटें बोलावें लागतें. अशा प्रकारचें वेळप्रसंगीं खोटेंहि हा भक्त बोलत असतो. परंतु सत्य व असत्य हे दोन्ही बोलत असतांहि भक्त 'मौनी'च ठरतो. ह्याचें कारण तो जरी असें बोलत असला तरीपण 'वाक्' जें कर्मेंद्रिय त्या कर्मेंद्रियाशीं हा तादात्म्य घेत नाहीं म्हणून 'वाणीनें' जरी

बोलण्याची क्रिया होत असली तरी तिचा ह्याच्याकडे संबंधच येत नाहीं. ( 'वाच्य वाचा वाचकता त्रिपुटी । लोपूनि सांगे गोड गोठी । करितां सैराट चावटी । न सुटे मिठी मौनाची ॥ एका. ११–३३७ ) म्हणूनच ह्याला 'मौनी' असें म्हटलें आहे. बुद्धीपासून तो थेट देहापर्यंत जो स्थूल सूक्ष्म संघात आहे त्याच्याशीं हा तादात्म्य घेत नसल्यामुळें ह्या संघाताकडून ज्या पुण्यपापात्मक क्रिया होतात त्याच्याबद्दल तो जबाबदार धरला जात नाहीं. ( 'जे बुद्धीचिये ठावूनि देहीं तयां अहंकाराची सेचि नाहीं । म्हणोनि कर्मेचि करितां पाहीं । चोखाळले ।' ज्ञा.–५–६२ ) त्याच्या ठिकाणचें देहादि संघाताबद्दलचें तादात्म्य तर गेलेलेंच असतें पण तो उच्च अशा उन्मनी अवस्थेला पोहचल्यामुळें त्याच्या ठिकाणीं 'मौनी' हीहि भाषा राहात नाहीं. ती अशी अवस्था आहे कीं ज्या ठिकाणीं 'दृश्य' 'द्रष्टाच' होतो व बोलणारा हा बोलणेंरूपच होतो. ( बोलतया बोलताचि भेटे । तेथें बोलिलें हें न घटे । तें मौन तंव गोमटे । स्तवन माझें ॥ ज्ञा–१८–११५३ 'जनातें जनें देखतां । द्रष्टेचि दृश्य तत्वतां । कोणी नहोनी आइता । सिद्धांतचि हा । अमृ–१०–१० ) आरशापुढें आरसा ठेवला तर त्यांत कोणी कोणाला पाहिलें हें जसें सांगतां येणार नाहीं त्याचप्रमाणें त्याच्या बोधांत कर्ता, कर्म व क्रिया ही त्रिपुटी नाहींशी झाली असल्यामुळें त्याच्या वाणीकडून बोलण्याची जरी क्रिया होत असली तरी तो बोलतो असें म्हणतां येत नाहीं. (तैसा स्वस्वरूपें उठिला । जो दृश्येंसीं द्रष्टा आटला । तो नेणे काय राहटला इंद्रियग्रामु ॥ ज्ञा–१८–४४१ 'म्हणोनि कार्य कर्ता क्रिया । हें स्वरूपचि जाहालें जया । नाहीं शरीरादिकीं तया । कर्मीं बंधु ॥ ज्ञा.–१८–५५३ )

**उन्मनी**–जागृति, स्वप्न, सुषुप्ति आणि तुरीया याहून पलीकडची जी पांचवी अवस्था तिला 'उन्मनी' अवस्था म्हणतात. या अवस्थेंत मनाचा संपूर्ण लय होतो. ( तुका म्हणे ते उन्मनी । नाश कारया कारणी । तुका–३४५४.) जागृति व स्वप्न या दोन अवस्था 'कार्य' अवस्था आहेत. या दोन अवस्थांना कारण जी सुषुप्ति अवस्था तिला 'कारण' अवस्था म्हणतात. जेथून कार्यांची उत्पत्ति होते व जेथें कार्य लयास जाते त्यास 'कारण' म्हणतात.

( घन अज्ञान सुषुप्ति । तो बीजांकुर भावो म्हणती । येर स्वप्न हन जागृती । हा फळभावो तियेचा ।। ज्ञा–१५–८९. ) या तीन अवस्थांपैकीं जागृति व स्वप्न या दोन अवस्था अन्यथा ज्ञानांतील आहेत. व सुषुप्ति अवस्था ही अज्ञानांतील अवस्था आहे. जागृति व स्वप्नांतील जो कार्यरूप प्रपंच व सुषुप्ति अवस्थेंतील जें अज्ञान त्यांना खाणारें जें 'अहं ब्रह्मास्मि' हें वृत्तिज्ञान 'तें' चौथी जी 'तुरीया' अवस्था त्या अवस्थेंत असतें. ह्याच्या पलीकडची जी पांचवी अवस्था, जिला 'उन्मनी' अवस्था म्हणतात त्या अवस्थेंत 'अहं ब्रह्मास्मि' हेंहि ज्ञान नसतें. ( 'तें अज्ञान ज्ञानीं बुडालिया । ज्ञानें कीर्तिमुखत्व केलिया । जैसा वन्हि काष्ठ जाळूनियां । स्वयें जळे ।। 'तैसें अज्ञान ज्ञानें नेलें । आपण वस्तु देऊनि गेलें । ऐसें जाणणेंविीण उरलें । जाणतें जें ।। ज्ञा–१५–५२६–२७ ). तात्पर्य, अशी उर्वरित जी केवळ स्वरूपस्थिति तिलाच 'उन्मनी' अवस्था म्हणतात. अशा उन्मनीअवस्था-रूप जो झाला कीं ज्या ठिकाणीं 'परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी' या चार वाणींचाहि लाग लागत नाहीं. त्याला 'मौनी' असे म्हणावयास मुळींच हरकत नाहीं. **आरायेना**– कंटाळत नाहीं.

**ओंवी २१०—पारुखे**–रागावत नाहीं; खिन्न होत नाहीं. **सुके**–सुकणें, कोरडा पडणें, शुष्क होणें–समुद्र हा नेहमीं आपल्या जलसंपत्तीनें पूर्ण असतो, पाऊस पडला तरी तो वाढत नाहीं, न पडला तरी तो कोरडा होत नाहीं. त्याचप्रमाणें व्यावहारिक गोष्टी मिळाल्या तरी भक्त हा हर्ष पावत नाहीं व नाहीं मिळाल्या तरी त्याला दुःख होत नाहीं. ह्याचें कारण तो आत्मानंदानें नित्य तृप्त असतो. ('देख ऋद्धि सिद्धि तयापरी । आली गेली से न करी । तो विगुंतला असे अंतरीं । महासुखीं ।। ज्ञा. २–३६२ ) प्रारब्धवशात् लाभ झाला तरी त्याची त्याला खिजगणती नसते, नाहीं झाला तरी त्याबद्दल तो खिन्न होत नाहीं. ( 'दैवास्तव देहाचें पाळण । ऐसा निश्चयो परिपूर्ण । जो चिंतीना देहभरण । तो महायोगी जाण दैवयोगें ।। ज्ञा. ४–१२५. 'कैं वाहावें जीवन । कैं पलंगीं शयन । ' तुका. २४५६.)

**ओवी २११—बिढार**–बिऱ्हाड, घर, वसतिस्थान–साधारणतः लोकांना

वेळ जाण्याकरितां ओळखीचीं माणसें लागतात. त्यांतल्या त्यात ज्या ठिकाणीं त्यांचें ममत्व असते त्याच ठिकाणीं ते जाऊन राहात असतात. कांहीं लोक तर इतके घरकोंबडे असतात कीं त्याना आपले घर सोडून परगांवीं जाणें हें कधीं ठाऊकच नसते. ( तैसें घरीहूनि निघणें । नाहीं जीवितें मरणें । जया साप होऊनि असणें । भाटीं तिये ॥ ज्ञा. १३–७८४. येवढेंच नव्हे तर मेल्यावरहि साप होऊन ते त्याच घरांत राहावयास येतात. परंतु भक्ताचें अगदीं उलट असते. तो व्यापक अहंतेवर आल्यामुळें त्याला सर्व जग आपलेंच आहे असें वाटतें. (देवाच्या संबंधें विश्वचि सोयरें । सूत्र ओढे दोरें एका एक ॥ तुका. २९९६ ). यामुळेंच तो जिकडे जाईल तिकडे मनमोकळे-पणानें वागतो. ( आमुचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥ तुका. ३५८३ ) एके ठिकाणीं राहिलें म्हणजे चित्तामध्यें ममत्व वाढत असते. ( जेथ मुहूर्त-मात्र वसती घडे । त्या ठायाचा अभिमान चढे ॥ ए. भा. १३–४३१ ) म्हणून तो एके ठिकाणीं राहात नाहीं. ज्याप्रमाणे वाहत्या पाण्यात शेवाळ कमी असते त्याचप्रमाणे भटकणाऱ्या माणसाच्या ठिकाणीं विशिष्ट स्थानाचें ममत्व नसते. साधु कसा असावा याबद्दल एक म्हण प्रसिद्ध आहे. ( ‘ शिंपता मळा । गाता गळा । रमता साधु । ’ )

**ओवी २१२—आकाशस्थिति**–आकाशाच्या पोकळींत.

**ओवी २१३—मती**– बुद्धि, निश्चय. **स्थिर**–कायम, दृढ. **चराचर**–स्थावर-जंगमात्मक जग, सजीव निर्जीव सृष्टि, अखिल विश्व.–आपण ज्या अवस्थेंत असतों तसें जग दिसते. आपण जागृतींत स्थूल देहाशीं तादात्म्य करतों त्या-वेळेस सर्व जगत् स्थूल दिसतें. आपण स्वप्नांत सूक्ष्म देहाशीं तादात्म्य करतों त्यावेळेस जगत् सूक्ष्म भासतें. झोपेंत आपली वृत्ति अज्ञानांत लीन होते त्या-वेळेस जगताचाहि लय असतो. ( आंधळयासि जन अवघेचि आंधळे । आपणासी डोळे दृष्टी नाहीं । तुका. २७५७ ). त्याचप्रमाणें ‘ मी ब्रह्म आहे ’ ह्या व्यापक अहंतेवर तो भक्त असल्याकारणानें त्याला सर्व जग ब्रह्मरूप दिसूं लागतें ( ‘ आदौ ब्रह्माहमस्मीत्यनुभव उदिते खल्विदं ब्रह्म पश्चात् ॥ श्लोक ३ शतश्लोकी–शंकराचार्य ‘ हें समस्तहि श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीति-

रसाचा वोतला भावो । म्हणोनि भक्तांमाजीं रावो । आणि ज्ञानिया तोचि । ' जयाचिये प्रतीतीचा वाखारां । पवाडु होय चराचरा । तो महात्मा धनुर्धरा । दुर्लभु आर्थी ॥ ' ज्ञा. ७–१३६–१३७ ' आणि पूर्ण अहंता वेठलों । सैंध आम्हीच दाटलों । मा लोपलों ना प्रगटलों । कोण्हा होउनी ॥ अमृ. १०–१५. ' होईल जाला अंगें देव जो आपण । तयासी हे जन अवघे देव ॥ तुका. ३८०१ ) येथें ज्ञानलक्षणांचा शेवट झाला. कारण ब्रह्माच्या पलीकडे जीवाची वाढ होत नाहीं. ( ' म्हणौनि ब्रह्मेशानापरौते । वाढणें नाहीं जीवातें । तेथूनि मग वरौतें । ब्रह्मचि कीं । ज्ञा. १५–२०३ )

**ओवी २१४—याहीवरी**–यांत आणखी. **आस्था**–प्रेम–वास्तविक हा भक्त एवढ्या उच्च बोधावर आला कीं त्याच्या अनुभवांत सर्व जगताची आटणी झाली, एवढेंच नव्हे तर ' ब्रह्मा विष्णु शंकर ' हे तिन्ही देवहि त्याच्या बोधांत वेगळेपणानें राहिले नाहींत. नाथमहाराजांचें एक दळण प्रसिद्ध आहे. दळण याचा अर्थ ' निराकरण ' ( ' येई हो कान्हाई मी दळीन एकुली । ' नाथ–१७६. ) भजन करण्याकरितां द्वैत लागतें; पण तें तर त्याच्या ठिकाणचें मावळलेलें असतें. भक्त हा ( ' नाहं मनुष्यो नच देवयक्षो । ' ए. भा. हस्तामलक–२ ) ह्या बोधावर आलेला असतो. आतां यानें कोणाला भजावें ? ( ' तुज कैसें भजावें आपणा काय देखावें । तुजमाजी राहूनि तुजला कैसें सेवावें ॥ ' नाथ–३२८७) परंतु असें जरी असलें तरी भक्तिसुखाकरितां तो आपल्यांत तात्पुरता भेद करतो. (' कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोहीं भागीं । ज्ञा. १२–१८६—या ओवीवरील स्पष्टीकरण पाहावें. ) **मुकुट**–किरीट–सगळ्या भक्तांमध्यें ज्ञानी भक्त हा श्रेष्ठ भक्त आहे. भक्ति ही निर्हेतुका पाहिजे. 'अहेतुका रागात्मिका भक्तिः' बाकीचे आर्त, जिज्ञासु अर्थार्थी हे भक्त कांहीं तरी इच्छा मनांत ठेवून देवाला भजतात. देव हा विशिष्ट इच्छा म्हणजे भोग प्राप्त करून घेण्याचें साधन आहे या समजुतीनें ते देवाची भक्ति करतात; अशा भक्तांना ' बोचरे ' भक्त म्हणावयास हरकत नाहीं. परंतु ज्ञानी भक्ताच्या ठिकाणीं कांहींच हेतु नसतो, कारण तो कर्तव्यशून्य झालेला असतो. ( ' म्हणौनि ज्ञानिया पुरुषा । कृत्य

करूं सरलें देखा । ’ ज्ञा. १६–५८७ ). त्याला प्राप्तव्य असें कांहींच शिल्लक राहिलेलें नसतें. ( ‘ तैसी अंतःकरणकुहरीं उपजली । जयाची प्रतीतिगंगा मज भिनली । तो मी हे काय बोली । फार करूं ॥ ’ ‘ एऱ्हवीं ज्ञानिया जो म्हणिजे । तो चैतन्यचि केवळ माझें । हे न म्हणावें परि काय कीजे । न बोलणें बोलों ॥ ज्ञा. ७–१२५–२६ ) असे असतांना केवळ देवाच्या प्रेमाकरितां व लोकांना मार्ग दाखविण्याकरिता तो भगवंताची भक्ति करीत राहतो. ( ‘ न भजतया दावी । योगिया जो । ज्ञा. १२–१८७ म्हणूनच देव त्याला मुकुटाप्रमाणें डोक्यावर धारण करतात.

**ओवी २१५—खालविजे**—वाकवावें, नम्र करावें. **पायवणी**—चरणतीर्थ, चरणोदक–देवापेक्षां भक्त हा अधिक पवित्र व अधिक श्रेष्ठ ठरतो. देवाच्या ठिकाणीं आशा आहे. ( ‘ आशा उपजली अनंतासी । नीच वामनत्व आलें त्यासी । आशें दीन केलें देवांसी । कथा कायसी इतरांची ॥ ए. भा. ८–३११ ( तुका म्हणे आम्ही देवाहूनि बळी । जाहलों निराळी ठेवुनि आशा । तुका. १७७४ ). देवाच्या ठिकाणीं आपपरभाव आहे. म्हणजे विषमता आहे. साधूंच्या ठिकाणीं ती नसते. ( देवाचा अवतार होय । दासां सुख, दैत्यां भय । तेथें ऐसें विषम आहे । हें न समाये तुजमाजी ॥ ए. भा. २–५९ ) देवाच्या ठिकाणीं कामक्रोध असतात. संतांच्या ठिकाणीं ते नसतात. विष्णु हे वृंदेच्या मागें लागले पण तुकारामबुवांकडे पापबुद्धीनें भंडाऱ्या डोंगरावर एकांतांत एक बाई आली परंतु त्यांनीं तिला उपदेश केला कीं ( ‘ पराविया नारी रखुमाई समान । हें गेलें नेमून ठायींचेंचि ॥ तुका. ४०५२ ‘ कामक्रोधा नाहीं चाली । भूतीं जाली समता ॥ तुका. १९४० ‘ कामक्रोध बंदीखानीं । तुका म्हणे दिले दोन्ही ॥ तुका. १८६४.) म्हणूनच खुद्द भगवानहि भक्ताच्या चरणरेणुनें आपल्या ठिकाणीं पवित्रता मानतात. ( ‘ अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंघ्रिरेणुभिः ए. भा. १४–१६ ‘ देव इच्छी रज चरणींची माती । धांवत चालती मागें मागें ॥ तुका. १९८५ ). वास्तविक या भक्ताला प्राप्तव्य कांहीं नसतांना तो भगवंताची भक्ति करतो व सर्व जगाला उपदेश करीत हिंडत असतो. ( ‘ रिगाला

भक्तिपंथीं । जगा देतु । ' ज्ञा. १२-२१९ ) ह्या गुणांमुळें तो तिन्हीं लोकांत वंद्य होतो.

**ओवी २१६—सदाशिव**–शंकर–श्रद्धेचा जो विषय असतो त्याच्या ठिकाणीं किती आदर ठेवावा हें सांगण्याकरितां भगवान् श्रीशंकराचा दृष्टांत देतात. श्रीशंकरांची महाविष्णूवर फार श्रद्धा व प्रेम म्हणून श्रीविष्णूच्या चरणापासून निघालेली जी गंगा, ती गगा भगवंताचें चरणोदक म्हणून शंकरांनीं आपल्या मस्तकावर धारण केलेली आहे.

**ओवी २१७—संचार**–दोप, चूक.–ज्यानें आपला मान केला त्याचें वर्णन करण्यांत आत्मस्तुति केल्याचा दोप पदरीं येतो.

**ओवी २१९—चौथी**–चवथा–धर्म, अर्थ, काम व मोक्ष या मनुष्यानें साधावयाच्या चार पुरुषार्थांपैकीं चवथा पुरुपार्थ मोक्ष हा आहे. तो मोक्ष भक्ताच्या ताब्यांत आला, पण भक्त हा, मोक्ष घेऊन स्वस्थ बसत नाहीं. लोकांनीं मोक्ष प्राप्तीकरिता प्रयत्न करावा व त्यांना मोक्ष, सुलभ अशा भक्तिमार्गानें प्राप्त व्हावा, एवढयाकरितां भक्त हा स्वतः भक्तीचें आचरण करीत व लोकाना मार्ग दाखवीत गांवोगांव हिंडत राहतो. म्हणूनच भगवान् ' मी अशा भक्ताला आपल्या डोक्यावर घेऊन वाहतो ' असें वर्णन करतात. जो स्वतः पूर्ण असतो तोच दुसऱ्याला पूर्ण करूं शकतो. शिवाय जो स्वतः ज्ञानसंपन्न अतसो त्याच्यावर लोकांना ज्ञान व भक्ति सांगण्याची व शिकविण्याची जबाबदारी असते. भक्त हे स्वतः श्रुतिस्मृतींचे अर्थरूप होऊन लोकांना धर्माचें आचरण करून दाखवितात. ( परी श्रुतिस्मृतींचे अर्थ । जे आपण होऊन मूर्त । अनुष्ठानें जगा देत । वडील जे जे ॥ ज्ञा. १७-८६ ) अशा भक्तांनीं जर स्वतः भक्तिमार्गाचें आचरण करून लोकांना भक्तिमार्ग दाखविला नाहीं तर तो लोकांना उमगणें शक्य नाहीं. ( तैसे संत जगीं । क्रिया करूनि दाविती अंगीं ॥ तुका. १९२८ ). एवढयाकरितां ज्ञानप्राप्तिनंतरहि लोकसंग्रहाकरितां कर्म, भक्ति व ज्ञानहि आचरून लोकांना दाखविणें स्तुत्य ठरतें. **भक्तिपंथीं**–भक्तिमार्गानें–योग व ज्ञान हे मार्ग कठिण आहेत. भक्तिमार्ग हा सोपा व सर्वसंग्राहक आहे. म्हणूय तो भक्त जगाला भक्तिमार्गाचाच उपदेश करीत

राहतो. ( भक्तिपंथ बहु सोपा । तुका. ३३०२ सकाळांसीं येथें आहे अधिकार । तुका. २२०९ ध्यायन्कृते यजन्यज्ञैस्त्रेतायां द्वापरेऽर्चयन् । यदाप्नोति तदाप्नोति कलौ संकीर्त्य केशवम् ॥ विष्णुपुराण ए.भा. ५ ).

**ओवी २२०—अधिकारी**–स्वामी, वारसदार.–मोक्ष हा भक्तांना नित्य प्राप्त असतो. ( मोक्षाचें आम्हांसीं नाहीं अवघड । तो असे उघड गांठोळीस ॥ तुका. ८५० मोक्ष आम्हां घरीं कामारी ते दासी । होय सांगों तैसी तुका म्हणे ॥ तुका. १५९३ ) मोक्ष कोणाला द्यावयाचा व कोणाला द्यावयाचा नाहीं हे भक्तांच्या हातांत असतें. खुद्द भगवान् हे भक्तांच्या पूर्ण ताब्यात असतात व भक्त ज्याला मोक्ष द्या म्हणून सांगतात त्याला तो देतात. ( तुम्ही अच्युतात्मे निजनिर्धारी । म्हणोनि देवो तुमचा आज्ञाधारी । तुम्ही म्हणा त्यातें उद्धरी । येऱ्हवीं हातीं न धरीं आनातें ॥ ए.भा. २–७७ ). भक्तांचें एवढें सामर्थ्य असतें कीं ते दुष्टाला सुष्ट करून त्याचा उद्धार करूं शकतात. ( गाढवाचें घोडें । आम्ही करूं दृष्टी पुढे ॥ तुका. १७६९ ) **सोडीबांधी**–वारंवार मोकळें करणें व बांधणे; देणें न देणें. **तळवट**–खालचें स्थान, तळ, नम्रता–संतांच्या अंगीं जरी अगाध सामर्थ्य असलें तरीपण त्यांच्या ठिकाणीं लीनता अमूप असते. ( बळें तरी नागवती काळा । लीन तरी सकळांच्या तळा । तुका ४५१ ). जेथें खरी विद्या असते त्या ठिकाणीं नम्रताहि असते. ( ‘विद्या विनयेन शोभते ।’ ) ज्या आंब्याला फळें आलेलीं असतात तो आंबा लवलेला असतो. त्याचप्रमाणें संतांच्या ठिकाणीं ब्रह्मविद्या मूर्तिमंत असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं नम्रताहि अलोट असते. ते सर्व भूतांच्या ठिकाणीं नम्र असतात. ( जें जें भेटे भूत । तें तें मानिजे भगवत । हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ॥ ज्ञा. १०–११८. नमस्कारी भूतें विसरोनि याती । तेणें आत्मस्थिती जाणीतली ॥ तुका. ४५७३ ). याच्या उलट ज्यांच्या ठिकाणीं थोडें ज्ञान असतें त्यांच्या ठिकाणीं घमेंड फार असते. ( विद्या अल्प परी गर्वशिरोमणी । मजहुनि ज्ञानी कोण आहे ॥ तुका. २७९५ ‘जो लाटणें ऐसा न लवे ॥’ ज्ञा. १३–७२५ ) संताची स्थिति तशी नसते. त्यांना सर्व ठिकाणीं आत्मदर्शन होत असल्यामुळें त्यांची गुणदोषांवर दृष्टि नसते. ( नमन

ते नम्रता न गणी गुणदोष । अंतरीं प्रकाश आनंदाचा ।। नामा. ६२६, भोळिवेचें लेणें विष्णुदासां साजे । तेथें भाव दुजे हारपती ।। तुका. २०१२ नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे । संत पाय हिरे देती वरी । नामा ५२८. व्हावें तळीले पायरी । संत पाय देती वरी । तुका. १९३८ ). नमन भक्ति ही फार थोर आहे. ( नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ।। गीता. ९–१४. 'मग वाड धाकुटें न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखिलिये वस्तु उजू लुंटिती । मीचि म्हणोनि ।। ज्ञा. ९–२२२ 'नम्र झाला भूतां । तेणें कोंडिलें अनंता ।। तुका. २४७६ ).

**ओवी २२१—टांच**–पायाची खोट.–भृगुऋषि हे श्रीशंकर, विष्णु व ब्रह्मदेव या तिन्ही देवांची सत्त्वपरीक्षा करण्याकरितां निघाले. ते प्रथम शंकरांना टाकून बोलले तेव्हां शंकर रागावले, तसेच ब्रह्मदेवहि रागावले. नंतर ते विष्णूकडे आले व विष्णूच्या छातीवर त्यांनीं लाथ मारली, पण विष्णु रागावले नाहींत; एवढेंच नव्हे तर श्रीविष्णूनें भृगुऋषीच्या पायाची टांच आपल्या वक्षस्थळावर वत्सलांछन म्हणून धारण केलेली आहे. ( 'आझूनि पाउलाची मुद्रा । मीं हृदयीं वाहें गा सुभद्रा' ।। ज्ञा.९–४८१. 'हृदयीं श्रीवत्सलांछन । मिरवी भक्ताचें भूषण । नाहीं तयाचा सीण । सुख धरिलें लातेचें' तुका.४५४)

**ओवी २२२—लेणीं**–दागीनें.–भगवंत भक्ताचें वर्णन स्वतः करतात म्हणून भक्ताची कीर्ति वाऱ्याप्रमाणें पसरते. ( वाऱ्याहातीं माप चाले सज्जनाचें । कीर्तिमुख त्याचे नारायण ।। तुका २५१८.)

**ओवी २२३—डोहळे**–इच्छा. अचक्षु डोळेरहित.–परमात्मा हा वास्तविक अवयवरहित आहे. परंतु तो भक्तांच्या प्रेमामुळें सगुण साकार होतो व भक्तांसाठीं व्यावहारिक सत्तेंत येतो. भक्ताची पूजा करण्याकरितां त्यानें हातांत कमल धारण केलं आहे. ('अभेदभक्त मज भेटती । तेव्हां सुमनें केवीं मिळती । यालागीं लक्ष्मीपति । लीला कमळें वाहातसे' ।। रुक्मिणी स्वयंवर—)

**ओवी २२४—दोंवरी दोनी**–दोनावर दोन मिळून चार. **भुज**–सगळा बाहु.–परमात्मा हा 'अनंग' असतांना तो भक्तांकरितां शरीर धारण करतो ('तयालागीं मज रूपा येणें' । ज्ञा. १२–१८९' 'मानी भक्तांचे उपकार ।

ऋणिया म्हणवी निरंतर। केला निर्गुणीं आकार। कीर्ती मुखे वर्णितां' तुका. २३६३ ).

**ओवी २२५—सुरवाड**–सुख. **निरुपम**–अत्यंत, अप्रतिम. **विदेह**–देह-रहित.–परमात्मा हा आकाराच्या पलीकडचा आहे. ('जें आकाराचें पैलतीर'॥ ज्ञा. १३–१०७३ 'अव्यक्त निराकार नाहीं ज्या आकार' ज्ञा. गा. ७३९ )

**ओवी २२७—निरुतें**–खरें. निश्चित. **प्रशंसणें**–वाखाणणें, गुण वर्णन करणे.

**ओवी २२८—साद्यंत**–समग्र, संपूर्ण.

**ओवी २२९—जेणें**–ज्यामुळें.

**ओवी २३०—रम्य**–आनंददायक, रमणीय–शृंगारकथा हीहि आनंद-दायक असते, परंतु तिचा परिणाम घातक असतो; कारण तिच्या श्रवणानें वृत्तीचा क्षोभ होतो. व्याधाचें गाणें हेंहि गोड असतें, परंतु त्यांत हरिणाचें मरण असतें. भक्तियोग कथा अशी नाहीं. तिच्या ऐकण्यानें मन शांत होतें. **अमृतधारा**–अमृताच्या धारेसारखी.–या भक्तियोगाचें श्रवण करून जो त्याचें अनुष्ठान करतो तो अमर होतो. म्हणून या कथेला अमृतधारेची उपमा दिली आहे. पण ही उपमासुद्धा कमी पडते, कारण अमृताचे सेवन करणारे देवसुद्धां काय-मचे अमर होत नाहींत. पुष्कळ कालाने कां होईना परंतु त्यांना पुन्हां मृत्युलोकांत यावें लागतें ('ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति' गी. ९-२१ 'जें काळकूटाचें सहोदर। जें मृत्यूभेणें प्याले अमर' ज्ञा. १०–१९२) परंतु भक्तकथा ही श्रवण करणाराला कायमची अमर करते. **प्रतीतिगम्य**–अनुभव-प्राप्य.–अनुभव येण्याकरितां ऐकलेल्याचें मनन करावें लागतें, म्हणून श्रवणा-पेक्षां मननाला महत्त्व अधिक आहे. ('जें जें केलें पुराणश्रवण। तें तें व्यर्थ होय मननेंविण' ए. भा. २–४२३ 'ऐकावी म्हूण कथा। तैसे धरुनि राहे चित्ता' ॥ तुका ३२७० ) मननपूर्वक श्रवण केल्यानें ऐकलेल्याचा परिपाक शेवटीं आचरणांत होतो. पुढें त्याचा प्रत्यय म्हणजे अनुभव येऊं लागतो.

**ओवी २३१—आदरें**–सद्भावानें. **थारे**–स्थिरावतें. **श्रद्धा**–निष्ठा, विश्वास. श्रद्धेचें मुख्य लक्षण 'अनन्यता' आहे. आत्मप्राप्तीकरितां किती अनन्यता पाहिजे ह्याचें व्याख्यान ज्ञानेश्वर महाराजांनीं एकाच ओवींत केलें आहे ('तरी

आत्मसुखाचिया गोडिया । विटे जो कां सकळ विषयां । जयाच्या ठायीं इंद्रियां । मानु नाहीं' ॥ ज्ञा. ४-१८७.

**ओवी २३३--परम**-श्रेष्ठ-शास्त्राचा अभ्यास मान मिळविण्याकरितां किंवा पोट भरण्याकरितां करणें हें गौण आहे. शास्त्राचा अभ्यास हा भगवत्प्राप्ती-करितां करणें, हें योग्य आहे. (मज ईश्वराचेनि लोभें । हे गीता पढतां अक्षोभें । जो मंडन होय सभे । संतांचिये ॥ ज्ञा. १८-१५१७. तैसा प्रतिपाद्यु जो ईश्वरू । तो होआवयालागीं गोचरू । श्रुतीचा निरंतरु । अभ्यासु करणें ॥ ज्ञा. १६-१०३ 'ब्रह्मप्रापका युक्तीचा ठसा । त्या नांव शुद्ध जिज्ञासा । वेदशास्त्र जाणीव वळसा । लौकिक जिज्ञासा त्या नांव ॥ ए. भा. १९-२७७).

**ओवी २३४—उत्कंठा**-उत्सुकता, उत्कट इच्छा,-नामदेवराय ज्या वेळेस ज्ञानेश्वरमहाराजांच्या बरोबर तीर्थयात्रेस गेले त्या वेळेस श्रीपंढरीनाथाला करमेना. ( वियोग नाम्याचा न साहे गोपाळा । न जाय राउळा पांडुरंग ॥ जनाबाई-३३७ ).

**ओवी २३५—पवित्र**-शुद्ध.

**ओवी २३७—निधिनिधान**-भांडार ठेवण्याचें ठिकाण.

**ओवी २३८—परमदेवता**-श्रेष्ठ दैवत-आपल्याला जो आवडतो त्याची स्तुति आपण स्वतःकरण्यापेक्षां त्याच्याविषयीं दुसरे लोक स्तुति करूं लागले म्हणजे ती अधिक आवडते ( स्तुति पराविया मुखें रुचिकर । तुका-११३. ) लोक हे सहसा भक्ताची निंदा करतात; कारण तो व्यावहारिक गोष्टी प्राप्त करून देण्याचा बाबतींत त्यांना उपयोगी पडत नाहीं, म्हणून भक्त हा नेहमीं देवालाच आवडतो. ( देवाचा भक्त तो देवासीच गोड । आणिकांसी चाड नाहीं त्याची । तुका-१९७३ ) अशी स्थिति असल्यामुळें क्वचित् प्रसंगीं जर एखादा पुरुष भक्ताचें वर्णन करणारा आढळला तर तो देवाला फार आवडतो.

**ओवी २३९—आदिकंद**-मूळ कारण, उत्पत्तिस्थान,-जगत् हें परमा-त्म्यापासूनच निर्माण होतें. ( पिताऽहमस्य जगतो ॥ गीता. ९-१७ जेणें हें विश्व निर्मियेलें । तुका २३३८.) **निजजनानंद**-आपल्या भक्तांचा आनंद-परमात्मा हा आनंदरूप आहे. ('नित्यानंदापुढें आनंद तो कोण । ' निळा

११६६ ‘आनंद अद्वय नित्य निरामय। जें कां नित्य ध्येय योगियांचें। तुका. ५७८)

**ओवी २४०—निर्मळ**—पवित्र—भगवंत पवित्र आहेत म्हणूनच ते दुसऱ्याला पवित्र करूं शकतात.—(पवित्राणां पवित्रं यो मङ्गलानां च मङ्गलम्। विष्णु सहस्रनाम—११। वेद्य पवित्रमोंकारः ॥ गीता—९—१७.) त्यांच्या ठिकाणीं उपाधीचा यत्किंचितहि मल नाहीं. (उपाधिवेगळे तुम्ही निर्विकार। कांहींच संसार तुम्हां नाहीं ॥ तुका—३४८४. ‘अगा ब्रह्म या नांवा। अभिप्रावो मी पांडवा। ज्ञा. १४—४०४) **लोककृपाळु**—कृपाळु, दयाळु.—भगवंताच्या ठिकाणीं अमुप कृपा असल्यामुळें त्यांनीं अर्जुन व उद्धव यांना निमित्त करून सर्व जगताच्या कल्याणाकरितां गीता व भागवत सांगितलें. (म्हणौनि औदार्या तुझेया। मज निमित्त ना म्हणावया। प्राप्ति असे दानीं राया। कृपानिधी ॥ ज्ञा. १८—१३७८.) **शरण्यु**—शरण जाण्यास योग्य—बाकीचे देव हे स्वतः मृत्युग्रस्त होण्यास्तव ते शरण आलेल्याचें जन्ममरण निवारण करूं शकत नाहींत (सांडोनियां श्रीकृष्ण चरण। इंद्रादि देवांचें करितां भजन। ते देव मृत्युग्रस्त पूर्ण। मा भजत्याचें मरण कोण वारी ॥ ए. भा. २—३४) भगवंत हे स्वतः जन्ममरणाच्या अतीत असल्यामुळें ते शरण आलेल्याला जन्ममरणांतून मुक्त करतात. (जो मज होय अनन्य शरण। त्याचें निवारी मी जन्ममरण। यालागीं शरणागता शरण्य मीचि एकु। ज्ञा. ९—२८८.) शरण अशालाच जावें कीं वेळप्रसंग पडला तर जो आपला स्वतःचा जीव देईल पण शरण आलेल्याचें रक्षण करील. (ऐसियासी शरण जावें। शक्ति जीवें न वंची ॥ तुका. २३९६। भीष्मपण केला खरा। धनुर्धरा रक्षिलें। तुका—२३९६। तुका म्हणे नेदी आणिकांचे हातीं। बैसला तो चित्तीं निवडेना। तुका. २३०७.)

**ओवी २४१—धवल**—शुभ्र—ज्या ज्या वेळेस धर्माचा पाडाव होतो त्या त्या वेळेस भगवंत अवतार घेऊन धर्माची संस्थापना करतात. (यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत। अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ गीता. ४—७). **अगाध**—अपार—भगवंताचें औदार्य सांगावें तेवढें थोडेंच

आहे. ('तुझें औदार्य जाणों स्वतंत्र । देतां न म्हणसी पात्रापात्र । पैं कैवल्या-ऐसें पवित्र । कीं वैरियांही दिधलें ॥ ज्ञा. ११–९८ ते १०७ ) देव भक्तांना साक्षात् आपलें पद देतो. (देव होऊनी उदार भक्तां देतो अमरपदें । देतां न म्हणे सानाथोर। वैरियासि तेंचि दे ॥ ज्ञा. गा. ४४८बाप उदार देवो अपरि-मितु । याचक स्वेच्छा सदोदितु । असे सहस्रवरी देतु । सर्वस्व आपुलें ॥ ज्ञा.११–११७. तुज ऐसा कोण उदाराची रासी। आपुलेंचि देसी पद दासा ॥ तुका ६९४ ) **प्रबळ**–बलाढ्य–भगवंताचें सामर्थ्य अतुल आहे. लहानपणींच त्यानें कंसादिक राक्षसांना मारलें. ( नुघडतां बाळपणाची फुली । जेणें मिया अदानवी सृष्टि केली ॥ ज्ञा. १०–२८९ ते २९१ तुका म्हणे चक्रपाणी । शिरोमणी बळियांचा । तुका १४३५ ) **वळिबंधन**–बलीला बांधणारा किंवा बलीच्या बंधनांत राहणारा. ज्याप्रमाणें पहिलवान् हा कुस्तींत पहिल्यांदा खालीं आला असें वाटतें परंतु तो लगेच आतली टांग मारून पुन्हां खालीं आण-णाऱ्याच्या छातीवर बसतो त्याप्रमाणें प्रथमतः भगवंतानें बळीला पायानें दाबून पाताळांत घातलें, पण पुढें भगवंताला त्याच्या द्वारांत द्वारपाळ म्हणून राहावें लागलें. ( बळीची दानदीक्षा कैसी जीवें देउनी सर्वस्वेंसी निजबळें बांधी देवासी । नाथ ३२८९ ).

**ओवी २४२—सुर**–देव–परमात्म्यानें आजपर्यंत देवांना अनेक वेळां मदत केली आहे. उदाहरणार्थ क्षीरसागराच्या मंथनांतून जेव्हां अमृत व सुरा निघालीं तेव्हां देवानें मोहिनीचें रूप घेऊन असुरांपासून देवांना वांचविलें. **लालन**–पालन–देव भक्तांचें पालन करतो व त्यांना मोक्ष देतो. तसेंच देव असुरांचा वध करतो पण त्यांनाहि मारल्यानंतर मोक्ष देतो. जसें आई जरी मुलावर रागावली तरी त्या रागावण्यांत मुलाचें हितच असतें. ( क्षोभ आणि कृपा मातेची समान । तुका. ३२५६ ) त्याचप्रमाणें भगवंताचा कोपहि अंतीं कल्याणप्रदच होतो.

**ओवी २४३—वत्सल**–कृपाळु–देव भक्तांकरितांच अवतार घेतो. ( ते वेळीं आपुल्याचेनि कैवारें । मी साकारु होऊनि अवतरें । ज्ञा. ४–५१ **सेतु**–बांध, मर्यादा.

**ओवी २४४—दैवाचा**-दैवशाली, भाग्यवान्-अर्जुनाचें भाग्य फार थोर होतें. जें विश्वरूप आजपर्यंत भगवंतानें कोणालाहि दाखविलें नाहीं तें त्यानें अर्जुनाला दाखविलें·( जें न संगेचि पितया वसुदेवासी । ज्ञा. ४-८ ते १२ ) एवढेंच नव्हे, तर जो भगवंत योगतपादि आचरणानेंहि प्राप्त होत नाहीं तो भगवंत अर्जुन जर रागावला तर त्याची समजूत घाली. मग त्या अर्जुनाला भाग्यवान् कां म्हणूं नये ? ( हा कोपे कीं निवांतु साहे । हा रुसे तरी बुझावीत जाये । नवल पिसें लागलें आहे । पार्थाचें देवा ॥ ज्ञा. ११-१७२ किरीटी कामधेनूचा पाडा । ज्ञा. ८-८ ).

**ओवी २४६—प्रतिपथ**-रूपांतर. **अवधारिजो**-ऐकली जावी-

**ओवी २४७—वोळगणें**-सेवा करणें-संतसेवा ही भगवत्सेवेपेक्षां श्रेष्ठ आहे. भगवत्सेवा ही अदृष्टफलसूचक आहे म्हणजे मेल्यानंतर मोक्ष देणारी आहे. संतसेवेनें मेल्यानंतर मोक्ष तर मिळतोच परंतु जिवंत असतांनाहि 'जीवन्मुक्तीचा' लाभ मिळतो. अशा प्रकारें संतसेवा ही 'अदृष्टफलसूचक' व 'दृष्टफलसूचकहि' आहे. ( याचि देहीं याच डोळां । भोगिजे मुक्तीचा सोहळा ॥ आनंदलहरी १२५ ) एवढ्याकरितां प्रत्येकानें संतसेवाच करावी ( घालीं संतासीं आसनें । पूजा करीं कायावाचामनें । नाथ. ३७०३ 'आघवीयाची दैवां । जन्मभूमि हे सेवा । जे ब्रह्म करी जीवा । शोच्यातें ॥ ज्ञा. १३-३६९ ).

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥



॥ ॐ ॥

# प्रकरण दुसरें

# वेदान्त-परिशिष्ठ

[ टीप १—१२ व्या अध्यायाच्या निरूपणांत जेवढी वेदान्ताची प्रक्रिया आलेली आहे तेवढीच ह्या परिशिष्टांत दिलेली आहे. ]

[ टीप २—यांतील पानांचे दिलेले आंकडे प्रकरण १ मधील आहेत. ]

**ब्रह्म व आत्मा**—ज्याच्यापासून सर्व भूतें उत्पन्न होतात, ज्याच्या योगानें तीं जगतात व मरणसमयीं ज्याच्यांत तीं लीन होतात; ( ' यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति यत्प्रयन्त्यभिसंविशान्ति तद्वि· जिज्ञासस्व तद्ब्रह्मेति ' तैत्ति. उ. ' जन्माद्यस्य यतः ' ब्रह्मसूत्र ) व जें सर्व जगताला अधिष्ठान असून सर्व जगतांत जें ओतप्रोत भरलेलें आहे असें जें ' व्यापक चैतन्य ' त्या ' व्यापक चैतन्यास ' ' ब्रह्म चैतन्य ' अथवा ' ब्रह्म ' म्हणतात. अशा ' व्यापक चैतन्याचा ' जेवढा कल्पित भाग व्यष्टि अंतःकरण, बुद्धि किंवा देहादिक पदार्थास अधिष्ठान असतो त्यास ' आत्मा ' म्हणतात; ( या आत्म्यालाच कूटस्थ, साक्षी, अंतःकरणाधिष्ठान चैतन्य, बुध्यधिष्ठान चैतन्य, प्रत्यक्, त्वंपदलक्ष्य वगैरे नांवें आहेत ). ' ब्रह्म ' व ' आत्मा ' ह्यांच्यांत स्वरूपतः मुळींच भेद नाहीं, जसें सर्वव्यापक महाकाश व घटकाश ह्यांच्यांत स्वरूपतः भेद नाहीं. सर्वव्यापक महाकाशाचे जे गुणधर्म तेच घटाकाशाचे गुणधर्म होत. त्याचप्रमाणें ब्रह्माचीं जीं लक्षणें तींच आत्म्याचीं लक्षणें व आत्म्याचीं जीं लक्षणें तींच ब्रह्माचीं लक्षणें होत; म्हणून नेहमीं आत्म्याचें जें वर्णन तेंच ब्रह्माचें वर्णन समजावें व ब्रह्माचें जें वर्णन तेंच आत्म्याचें वर्णन समजावें.

**ओवी १—आनंदे वर्षतिये**–आनंदाचा वर्षाव करणारी. श्रीगुरुमाउली ही साधकरूपी बालकावर आनंदाचा वर्षाव करते म्हणजे जीवाला 'आनंदरूप जो आत्मा' तो, मी आहे अशा अनुभवावर आणते. आत्मा हा 'सच्चिदानंद-रूप आहे. **सत्, चित्, आनंद** (पान ९)–हीं तीन आत्म्याचीं स्वरूप लक्षणें आहेत. **सत्**–ज्याचा क्रियेनें नाश होत नाहीं अथवा विचारानें ज्याचा बाध होत नाहीं व ज्याचें भूत, भविष्य आणि वर्तमान या तिन्ही काळांत एकरूपानें अस्तित्व असतें त्यास 'सत्' म्हणतात. आत्मा हा सत्स्वरूप आहे. **चित्**–जें कोणाचेंहि साहाय्य न घेतांना स्वयंप्रकाशानेंच प्रकाशतें व जें सर्वांचें प्रकाशन करतें त्यास 'चित्' म्हणतात. अशा प्रकारचें प्रकाशरूप जें ज्ञान त्यास 'चित्' म्हणतात. आत्मा हा चित्स्वरूप म्हणजे ज्ञानस्वरूप आहे. **आनंद**–नित्यनिरुपाधिक निरतिशयसुखरूपत्व हें आनंदाचें लक्षण आहे. आत्मा हा आनंदस्वरूप आहे. जें सद् असतें तेंच चिद् असतें व जें चिद् असतें तेंच आनंदरूप असतें. सत् चित्, आनंद हे आत्म्याचे गुण नाहींत तर ते आत्म्याचें स्वरूप आहेत.

**ओवी ३—ताप** (पान ११)–दुःख. **आध्यात्मिक, आधिभौतिक** व **आधिदैविक** असे त्रिविध ताप किंवा दुःखें आहेत. ज्वरादि रोग व क्षुधा-दिकांपासून होणाऱ्या दुःखास आध्यात्मिक दुःख म्हणतात; चोरादिकांपासून व व्याघ्रसर्पादि जनावरांपासून अथवा इतर प्राण्यांपासून होणाऱ्या दुःखास आधि-भौतिक दुःख म्हणतात; यक्ष, पिशाच्च, राक्षस, शीतोष्णादि द्वंद्वांपासून अथवा वीज पडणें, भूकंप होणें वगैरे दैविक कोपांपासून होणाऱ्या दुःखास आधिदैविक दुःख म्हणतात. त्रिविध दुःखाला कारण जें देहतादात्म्य तें घालविण्याकरितां गुरु साधकास 'पंचकोश-विवेक सांगतात. **पंचकोशविवेक** (पान १२)–अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय असे पांच कोश आहेत. कोश म्हणजे आच्छादन किंवा वेष्टन. ह्यांनीं आत्मा झांकल्यासारखा दिसतो म्हणून यांस कोश म्हणतात. स्थूल देहाला (म्ह. शरीराला) अन्नमय कोश म्हणतात. पंच कर्मेंद्रियें (हात, पाय, वाक् उपस्थ व गुद) व पंच प्राण (प्राण, अपान, समान, उदान व व्यान) मिळून प्राणमय कोश होतो. पंच

ज्ञानेंद्रियें ( कान, डोळे, त्वचा, नाक व रसना ) व सहावें मन मिळून मनोमय कोश होतो. पंच ज्ञानेंद्रियें व सहावी बुद्धि मिळून विज्ञानमय कोश होतो. प्रिय, मोद व प्रमोद या तीन वृत्ति–त्रयात्मक जें अज्ञान त्या अज्ञानासच ( म्ह. कारण–शरीरास ) आनंदमय कोश म्हणतात. या पंच कोशांनीं आत्मा झाकला जात नाहीं व तो त्यांच्यापासून अगदीं वेगळा आहे ही गोष्ट खालील विवेचनावरून स्पष्ट होणारी आहेः—( १ ) पंचकोश हे आत्म्याच्याच अस्तित्वावर भासतात म्हणून ते आत्म्यास झांकू शकत नाहींत. ते आत्म्याला झांकतात असें म्हणणे म्हणजे सूर्यानें भासमान होणारा जो ढग तो सूर्यास झाकतो असें म्हणण्याप्रमाणेंच आहे. ( २ ) पंचकोशाचे गुणधर्म व आत्म्याचें स्वरूप हीं अगदीं भिन्न आहेत. स्थूलशरीर व प्राण हे जड आहेत व जाणारे येणारे आहेत म्हणून ते व्यभिचारी व विनाशी आहेत. ह्याच्या उलट आत्मा हा चिद् व अविनाशी आहे; म्हणून अन्नमय व प्राणमय कोश हे आत्मा नव्हेत. मन हें विकारी आहे व आत्मा हा निर्विकार आहे म्हणून मनोमय कोश हा आत्मा नव्हे. बुद्धि ही झोपेंत लीन होते व ती जड आहे पण आत्मा हा विलयादि अवस्थारहित व चिद् आहे; म्हणून विज्ञानमय कोश हा आत्मा नव्हे. सात्त्विक वृत्तीपासून पुण्यप्राप्ति होत असते. त्या पुण्यकर्माचें उत्तम फल भोगीत असतां जीवाला अत्यंत आनंद होत असतो. हा आनंदच आनंदमय कोश आहे. पण ही वृत्ति सर्वदा असत नाहीं. ही कधींकधीं अनुभवाला येत असतो. ह्याच्या उलट आत्मा हा अखंड आनंदमय आहे. त्याचा आनंद कधींच संपत नाहीं. म्हणून खंडित होणारा आनंदमय कोश हा आत्मा नव्हे. (३) शिवाय आत्मरूप जे आपण ते, स्थूल देहाला म्हणजे अन्नमय कोशाला पाहतों व बाकीच्या कोशांना जाणतो. पाहणारा (द्रष्टा) किंवा जाणणारा (ज्ञाता) हा नेहमीं 'घटद्रष्टा घटाद्भिन्नः' या न्यायानें दृश्य किंवा ज्ञेय वस्तुहून भिन्न असतो; म्हणून आपण म्हणजे आत्मा हा पंचकोशाहून पृथक् आहे. पंचकोश हे आत्म्याच्या उपाधि आहेत. आत्म्याचा व पंचकोशांचा संबंध अन्योन्याध्यासानें झाला आहे. जसा स्फटिकाचा दगड, हा त्याला अधिष्ठान असलेल्या वस्तूच्या रंगाप्रमाणें भासतो त्याचप्रमाणें आत्मा हा ज्या ज्या कोशाचा आश्रय

करतो त्या त्या कोशाच्या आकाराचा वाटतो. पण वास्तविक तो त्यापासून अगदीं भिन्न आहे. वरील पंचकोशांच्या विचारांत स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन देहांचा विचारहि येतो; कारण स्थूल शरीरांत अन्नमय कोशाचा अंतर्भाव होतो; सूक्ष्म शरीरांत प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय अशा तीन कोशांचा अंतर्भाव होतो व कारण शरीरांत आनंदमय कोशाचा अंतर्भाव होतो; म्हणून आत्मा हा पंचकोश व तीन देह ह्याहून पृथक् आहे.

**ओंवी ४—योगसुख**–( पान १३ )–योगानें प्राप्त होणारें समाधिसुख. या ठिकाणीं ‘ योग ’ शब्दाचा अर्थ ‘ हठयोग ’ असा आहे. हठयोगाचीं आठ अंगें म्हणजे भाग आहेत; म्हणून यास ‘ अष्टांगयोग ’ असें नांव आहे. **हठयोगाची माहिती**––यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि हीं योगाचीं आठ अंगें आहेत. योगशास्त्राचा कर्ता महामुनी **पतंजलि** आहे. त्यानें ‘ योग ’ शब्दाची व्याख्या ‘ योगश्चित्तवृत्तिनिरोधः’ म्हणजे ‘ चित्तास वृत्तिरूप होऊं न देणें’ अशी दिली आहे. **यम**—अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह असे पांच ‘ यम ’ आहेत. अहिंसा अंगांत पूर्ण बाणली असतां त्याच्याशीं कोणीहि वैर करूं शकत नाहीं. त्याच्यासमोर हिंस्र•पशुसुद्धां आपला जन्मजात वैरभाव विसरतात. सत्यानें ‘ वाचासिद्धि ’ प्राप्त होते. अस्तेयानें ‘ संपत्तिलाभ ’ होतो. ब्रह्मचर्यानें वीर्याचा लाभ होतो व अपरिग्रहानें ‘ पूर्वजन्मस्मरण ’ प्राप्त होतें. **नियम**–शौच, संतोष, तप, स्वाध्याय, व ईश्वरप्रणिधान असे पांच नियम आहेत. **शौच**–अंतर्बाह्य शुचिता. यानें हळुहळू देहबुद्धि नष्ट होते. ‘ शौच ’ पूर्ण बाणलें असतां ‘ सात्त्विक आनंद, एकाग्रता, इंद्रियजय व आत्मदर्शनाची योग्यता ही प्राप्त होतात. संतोषामुळें उत्तम सुखाचा लाभ होतो; तपानें दूरचें दिसणें व लांब अंतरावरचे शब्द ऐकूं येणें इत्यादि प्रकारें इंद्रियांचें सामर्थ्य वाढतें. ‘ स्वाध्याय ’ म्हणजे ‘ वेदशास्त्राध्ययन ’ किंवा ‘ नाममंत्रादि जप.’ यानें इष्ट देवता प्रसन्न होतात. ‘ ईश्वरप्रणिधान ’ म्हणजे ‘ ईश्वराच्या ठिकाणीं सर्वार्पण करणें. यानें ‘ समाधीची ’ पूर्णता होते. **आसन**–‘ स्थिरसुखमासनम् ’ ‘ जें स्थिर आणि सुखावह असेल तें आसन ’ अशी पतंजलीनें ‘ आसन ’

शब्दाची व्याख्या दिली आहे. कंबरेखालची जी शरीराची विशिष्ट रचना त्याला आसन म्हणतात. शरीराची बैठक अशी करावी कीं जिच्यांत श्रम होणार नाहींत व मनाला उत्साह वाटेल. आसनें ८४ आहेत. त्यांत सिद्धासन, पद्मासन, भद्रासन व सिंहासन हीं चार आसनें मुख्य आहेत. सर्वांत मुख्य सिद्धासन आहे व त्यालाच 'वज्रासन' म्हणतात. प्रत्येक आसनानें शरीराचा विशिष्ट भाग शक्तियुक्त होतो व आसनांनीं शरीर रोगरहित होतें. आसनानें मनुष्य शीतोष्णादि द्वंद्वविक्षेपरहित होतो असें आसनांचें फल पतंजलीनें सांगितलें आहे. **प्राणायाम**— प्राणायाम म्हणजे श्वासोच्छ्वासांचें नियमन करणें व तद्द्वारा प्राणवायूचें नियमन करणें प्राणायामांत श्वासांच्या तीन गतींचें नियमन करावयाचे असतें. एका गतीनें म्हणजे डाव्या नाकपुडींतील 'इडा' नाडीनें श्वास आंत घेणें, त्या 'पूरक' म्हणतात. दुसऱ्या गतीनें म्हणजे उजव्या नाकपुडींतील 'पिंगला' नाडीनें उच्छ्वास बाहेर सोडणें, त्यास 'रेचक' म्हणतात व तिसऱ्या गतीनें म्हणजे 'सुषुम्ना' नाडीनें तो आंत म्हणजे फुप्फुसांत कोंडून ठेवणें ह्यास 'कुंभक' म्हणतात. पूरक, कुंभक व रेचक हीं प्राणायामाचीं तीन अंगें होत. प्राणायामाचें महत्त्व फार आहे, कारण यानें प्राणवायूचें नियमन होतें. ज्याप्रमाणें गिरणींत एक मोठें चक्र फिरत असतें व त्याच्यावर इतर सर्व लहान चक्रें फिरतात त्याचप्रमाणें या शरीररूपी गिरणींत प्राणवायूवर इतर इंद्रियांची गति अवलंबून असते. ह्या प्राणवायूचें निरोधन प्राणायामानें झालें म्हणजे मनाचें नियमन आपोआप होतें व त्यामुळें मन, धारणेचा अभ्यास करावयास तयार होतें. याशिवाय प्राणायामानें कुंडालिनी जागृत होण्यास मदत होते. **प्रत्याहार**— इंद्रियांना त्यांच्या विषयांपासून परावृत्त करणें व त्यांची चित्तरूपांत स्थापना करणें यास प्रत्याहार म्हणतात. यानें इंद्रियांवर पूर्ण जय प्राप्त होतो. तो इतका कीं विषय जरी समोर आले तरी चित्तवृत्ति विषयाकार होत नाहीं. **धारणा**— 'देशबंधश्चित्तस्य धारणा.' चित्त एकाच विषयावर स्थिर करून ठेवणें यास धारणा असें म्हणतात. योगी हा सामान्यतः नाभि, हृत्कमल, नासिकाग्र किंवा सहस्रदलकमल याजवर चित्त स्थिर करीत असतो. **ध्यान**—'तत्र प्रत्ययैकता-

नता ध्यानम् ' धारणेच्या विषयावर चित्ताची एकाग्रता अखंडित राहणें यास ध्यान असें म्हणतात. धारणेची परिपक्क अवस्था म्हणजे ध्यान होय. **समाधि**—अंतःकरणाच्या एकाग्ररूप परिणामास समाधि म्हणतात. समाधीचे दोन प्रकार आहेत. एक संप्रज्ञात अथवा सविकल्प समाधि व दुसरी असंप्रज्ञात अथवा निर्विकल्प समाधि. सविकल्प समाधींत ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय या त्रिपुटीच्या भानासह अंतःकरण अद्वितीय ब्रह्माचे ठिकाणीं स्थित असते; निर्विकल्प समाधींत या त्रिपुटीचे भान नसून अंतःकरणवृत्ति अखंड ब्रह्माकार असते. निर्विकल्प समाधि ही सविकल्प समाधीनें प्राप्त होते. हठयोगाच्या आठ अंगांपैकीं यम, नियम व प्रत्याहार ही नैतिक तयारी आहे; आसन आणि प्राणायाम ही शारीरिक तयारी आहे व धारणा, ध्यान आणि समाधि हींच हठयोगाचीं मुख्य अंगें होत. ह्या तिहींच्या संयोगास ' संयम ' म्हणतात. ( त्रयमेकत्र संयमः ) या संयमानें ज्ञानाचा प्रकाश प्राप्त होतो. **इडा, पिंगला, सुषुम्ना**—मनुष्याच्या शरीरांत हजारों नाड्या आहेत. त्यांपैकीं दहा नाड्या मुख्य आहेत. त्यांतल्या त्यांत इडा, पिंगला व सुषुम्रा या तीन नाड्या फार महत्त्वाच्या आहेत. **इडा**—मनुष्याच्या पाठींतील कण्याला मेरु-दंड ( Spinal column ) म्हणतात. योगमतें या कण्यांत ज्ञानतंतूच्या दोन रज्जू आहेत. कण्याच्या डाव्या भागांतून गेलेल्या ज्ञानरज्जूस ' इडा ' म्हणतात. ही मोठी ज्ञानरज्जु असून हिच्या शाखा व उपशाखा सर्व शरीरभर पसरल्या आहेत. त्या शरीरावर होणाऱ्या स्पर्शाचें ज्ञान मेंदूस पोहोचवितात. ह्यांना स्पर्शवाहक ( Afferent or Sensory ) ज्ञानतंतु म्हणतात. ' इडा ' नाडीचा आरंभ गुदस्थानाच्या जवळ असलेल्या मूलाधारचक्रांतून असून तिचा शेवट डाव्या नाकपुडींत होतो. अपानवायु इडेची क्रिया चालवितो. **पिंगला**—पाठींतील कण्याच्या उजव्या भागांतून गेलेल्या ज्ञानरज्जूस ' पिंगला ' म्हणतात. हिच्याहि शाखा व उपशाखा सर्व शरीरभर पसरल्या आहेत. त्या मेंदूची आज्ञा, सर्व अवयवांस पोहोंचविण्याचें काम करतात. ह्यांना आज्ञावाहक ( Efferent or motor ) ज्ञानतंतु म्हणतात. हिचाहि उगम मूलाधारचक्रांतून असून तिचा शेवट उजव्या नाकपुडींत होतो. ऊर्ध्ववायु अथवा वरचा प्राण-

वायु हा 'पिंगला' नाडीची क्रिया चालवितो. **सुषुम्ना**–इडा व पिंगला या दोन ज्ञानरज्जूंच्या मधल्या पोकळीस सुषुम्ना नाडी म्हणतात. हिचा उगम नाभिप्रदेशांतून झालेला असून हिचें खालचें टोंक मूलाधारचक्रांत आहे व हिचें वरचें टोंक मस्तकातील सहस्रदलांत आहे. हिच्या वरच्या टोंकास ब्रह्मरंध्र म्हणतात. ही नाभिप्रदेशांतून निघून मेरुदंडांतून कंठापर्यंत आल्यानंतर हिचे दोन भाग होतात. एक भाग भ्रूमध्यांतून ब्रह्मरंध्रांत मिळतो व दुसरा भाग डोक्याच्या मागच्या भागांतून ब्रह्मरंध्रांत मिळतो. योग्याखेरीज इतर माणसांच्या ठिकाणीं सुषुम्नेचें खालचें द्वार बंद असतें. तें द्वार खुलें करून, सुषुम्नामार्गानें कुंडलिनी नांवाची जी प्राणरूप शक्ति आहे तिला खालपासून थेट ब्रह्मरंध्रापर्यंत नेणें हें हठयोग्याचें मुख्य साध्य असतें. योग्यांच्या मतें ह्या सुषुम्नानाडीच्या पोकळींत सर्व इंद्रियांचे गोलक आहेत. या गोलकांसच त्यांनीं चक्रें अथवा कमळें अशीं नांवें दिलीं आहेत. **षट्चक्रें**–हीं चक्रें सहा आहेत. अगदीं खालचें **मूलाधारचक्र**–( Basic Plexus ) होय. हें गुद व शिश्न यांमधील जी चार बोटांची शिवण आहे तिच्या मध्यभागीं आहे. ह्याला चार पाकळ्या आहेत व ह्याची देवता गणपति आहे. दुसरें **स्वाधिष्ठानचक्र**–( Hypogastic Plexus ) होय. हें बेंबीच्या खालीं व शिश्नाच्या वर जी कंबरेची कडा आहे तिच्या मध्यभागीं आहे. ह्याला सहा पाकळ्या आहेत. तिसरें **मणिपूरचक्र**–( Solar Plexus ) होय. हें बेंबीच्या जवळ आहे. ह्याला दहा पाकळ्या आहेत. चवथें **अनाहतचक्र**–( Cardiac Plexus ) होय. हें हृदयाच्या ठिकाणीं आहे. ह्याला बारा पाकळ्या आहेत. ह्या चक्रावर ध्यान करणाऱ्यास अपरिमित ज्ञान प्राप्त होतें व तो भूत, भविष्य व वर्तमान जाणूं शकतो व त्याला आकाशांत गमन करण्याची शक्ति येते. पांचवें **विशुद्धचक्र** ( Pharyngeal Plexus ) होय. हें कंठाच्या ठिकाणीं आहे. ह्याला सोळा पाकळ्या आहेत. सहावें **आज्ञाचक्र**–( Cavernous Plexus ) होय. हें, दोन भिंवयांच्या मध्यभागीं आहे. ह्याला दोन पाकळ्या आहेत. **सहस्रदल**–हें शेवटचें व सातवें चक्र मेंदूंत आहे. ह्याच्यावरच सुषुम्नानाडीचें शेवटचें टोंक ज्याला ब्रह्मरंध्र म्हणतात तें आहे. ह्यांत एक चंद्र आहे व त्यांतून

अमृताचा सारखा स्राव होत असतो. कुंडलिनीनें सुषुम्नानाडींतून ब्रह्मरंध्रापर्यंत जाणें ह्यालाच षट्चक्रभेदन म्हणतात. कुंडलिनी सुषुम्नामार्गानें ब्रह्मरंध्राकडे जसजशीं आक्रमण करूं लागते तसतसा मनावरील एक-एक पडदा दूर होत जातो व योग्याला अलौकिक सामर्थ्य प्राप्त होऊं लागतें. सुषुम्नेच्या पोकळीस चित्ताकाश म्हणतात. ब्रह्मरंध्रावरची जी मेंदूंतील पोकळी तिला चिदाकाश किंवा मूर्ध्न्याकाश म्हणतात. कुंडलिनी ब्रह्मरंध्रातून निघून चिदाकाशांत प्रवेश करूं लागली कीं सहस्रदलांत असलेलें जें चंद्रामृताचें तळें तें कलथें होतें व त्या तळ्यांतील अमृत कुंडलिनीच्या तोंडांत पडतें व त्यामुळें योग्याची कांति तेजःपुंज होते. चिदाकाश हें केवळ चैतन्यरूप म्हणजे ज्ञानरूप आहे. त्या ठिकाणीं कोणच्याहि कल्पनेला वाव नाहीं. कुंडलिनीनें चिदाकाशांत प्रवेश केला कीं शरीराचें व मनाचें तादात्म्य पूर्णपणें सुटतें व कुंडलिनी-शक्तीचें शिवाशीं ऐक्य होतें व योगी मुक्त होतो. **कुंडलिनी**–ही एक प्राणरूप शक्ति आहे. ही मूलाधारचक्रांत राहते. हिची आकृति केशरानें न्हालेल्या साडेतीन वेढ्याच्या नागिणीसारखी असते, असें ज्ञानेश्वरांनीं तिचें काव्यात्मक वर्णन केलेलें आहे. ही कुंडलिनी शक्ति वीजेसारखी दैदिप्यमान आहे व मूलाधारचक्रांत खालीं तोंड घालून निजलेली असतें असेंहि वर्णन त्यांनीं केलेलें आहे. वज्रासनानें कुंडलिनी सुषुम्नानाडीच्या खालच्या छिद्राच्याजवळ असलेल्या संकोचित जागेंत चिमटली जाते व त्यामुळें ती जागी होऊन नाभि-स्थानावरील कंदावर उभी राहते व वर तोंड पसरून सुषुम्नेंतून वर जाऊं लागते असें ज्ञानेश्वरमहाराजांनीं म्हटलें आहे. ही कुंडलिनी शक्ति, योगी लोक, आसन, बंध व मुद्रा यांनीं जागी करतात. कंबरेपासून डोक्यापर्यंतच्या विशिष्ट रचनेस मुद्रा म्हणतात. मुद्रा पुष्कळ आहेत. परंतु त्यांत खेचरी, भूचरी, चांचरी व षण्मुखी ह्या चार मुद्रा मुख्य आहेत. **वज्रासन**–पोटऱ्यांना चिकटून मांडी घालणें; गुद आणि शिश्न यांमधील जी चार बोटें शिवण आहे त्यापैकीं दीड बोट वर व दीड बोट खालीं जागा सोडून मध्यें जी एक बोट जागा राहते, तेथें उजव्या पायाच्या टांचेनें शिवण दाबणें; उजव्या पायावर डावा पाय बसविणें व नंतर उजव्या टांचेवर शरीर सरळ थोड्याप्रमाणांत

तोलून धरणें ह्यास 'वज्रासन' म्हणतात. **बंधत्रय**–मूलबंध, ओढियाणाबंध व जालंधरबंध असे तीन बंध आहेत. वज्रासनालाच मूलबंध म्हणतात. **मूलबंधानें** अपानवायु कोंडला जातो व मग तो ऊर्ध्वगतीनें माघारी फिरतो. **ओढियाणाबंध**–बेंबीजवळचें पोट आंत जाऊन शिश्नावरील कांटास व बेंबीच्या खालच्या भागास जो बंध पडतो त्यास 'ओढियाणा' बंध म्हणतात. **जालंधरबंध**–या बंधांत गळ्याखालच्या खळगींत हनुवटी घट्ट अडकून बसते व गळ्याची घाटी अदृश्य होते; असा जो बंध त्यास जालंधरबंध म्हणतात. बंधांनीं इंद्रियांचीं द्वारें आकुंचलीं जातात व प्राण वर खेचला जातो.

**ओवी ३१—वैखरी** ( पान २४ )–चार वाणीपैकीं एक वाणी. **परा, पश्यंती, मध्यमा** व **वैखरी** असे वाणीचे चार प्रकार आहेत. वैखरी वाणी ही 'स्वपरवेद्य' आहे. ( म्ह. स्वतःलाहि समजते व दुसऱ्यालाहि समजते ); मध्यमा वाणी ही 'स्वसंवेद्य' आहे (म्ह. स्वतःची स्वतःला समजते); पश्यंती वाणी ही हृदयस्थानीं ईषन् मात्र उमटणारी भासरूप वाणी आहे. ही मुग्धावस्थेत स्फुरते. परा वाणी ही नाभिस्थानस्थित निर्विकल्प आठवरूप असते; ही ज्ञानांत स्फुरते. ('नाभीपासून उन्मेषवृत्ती । तोचि परा जाणिजे श्रोतीं । ध्वनिरूप पश्यंती । हृदयीं वसे ' ॥ कंठापासून नाद जाला । मध्यमा वाचा बोलिजे त्याला । उच्चार होतां अक्षराला । वैखरी बोलिजे ॥ ' दासबोध १७–८–१,२ ).

**ओवी ३२—अक्षर** (पान २५)–ब्रह्माचा वाचक शब्द; ब्रह्म. **अक्षर**–ह्या पदाचें व्याख्यान ज्ञानेश्वरींत खालील चार प्रकारांनीं केलेलें आढळतें. (१) 'न क्षरति इति अक्षरः' जें सर्व फुटक्या (नाशवंत) आकारमात्रांत गच्च भरलें असतांहि गळत नाहीं, त्याला 'अक्षर' म्हणतात ( मग म्हणितलें सर्वेश्वरें । जें आकारीं इये खोंकरें । कोंदलें असत न खिरे । कवणें काळीं । ज्ञा. ८–१५) ( २ ) ' अश्नोति ' म्हणजे ' व्याप्नोति ' इति अक्षरः'; जें सर्वाला व्यापून रहातें' त्याला 'अक्षर' म्हणतात ( हें गगनाचें पांघरूण । होय देखा–ज्ञा. ८–१९० ) ( ३ ) वृत्तिज्ञानाला जें विषय होत नाहीं उलट वृत्तिज्ञानच जेथें लयास जातें त्याला ' अक्षर ' म्हणतात. ( तेवि जाणणेया जें आकळिलें । तें

जाणवलेपणेंचि उमाणलें। मग नेणवेचि तयातें म्हणितलें। अक्षर सहजें।' ज्ञा. ८-१०२). (४) आकाराच्या बरोबर जें जन्मास येत नाहीं व आकाराबरोबर ज्याचा नाश होत नाहीं त्याला 'अक्षर' म्हणतात. ('आणि आकारा आलिया जयाचें। निराकारपण न वचे। आकारलोपें न विसंचे। नित्यता गा।' 'म्हणोनि अक्षर जें म्हणिजे ॥' ज्ञा. ८-१८०,१८१ 'सृष्टीचा होणा न रचे। सर्वसंहारें न वेचे। आथी नाथी या दोहींचे। पंचत्व तो ॥ ज्ञा. १३-१११२).

**ओवी ३२ देशरहित** (पान २५)-स्थलरहित, देशपरिच्छेदशून्य; **देशपरिच्छेद, कालपरिच्छेद** व **वस्तुपरिच्छेद** असे 'परिच्छेदाचे' तीन भेद आहेत. 'परिच्छेद' या शब्दाचा अर्थ 'मर्यादा' किंवा 'व्याप्ति' असा आहे. आकाश सोडून जगतात जेवढया वस्तू आहेत त्या सर्वांच्या ठिकाणीं हे तिन्हीहि परिच्छेद आहेत. उदाहरणार्थ हे तिन्ही परिच्छेद मनुष्यप्राण्याच्या ठिकाणीं आहेत. मनुष्य हा ज्या वेळीं आपल्या घरांत असतो त्या वेळीं तो अन्य घरांत किंवा देशांत नसतो; म्हणून मनुष्याच्या ठिकाणीं 'देशपरिच्छेद' आहे. मनुष्य हा जन्मापूर्वी व मरणानंतर नसतो म्हणून त्याच्या ठिकाणीं 'कालपरिच्छेद' आहे. मनुष्य हा आपणाहून भिन्न, पुस्तक, दगड इत्यादि वस्तुरूप नसतो; म्हणून त्याच्या ठिकाणीं 'वस्तुपरिच्छेद' आहे. आकाशाच्या ठिकाणीं 'देशपरिच्छेद' नाहीं, कारण तें सर्व देश व सर्व वस्तुमात्र व्यापून आहे; परंतु आकाशाच्या ठिकाणीं 'कालपरिच्छेद' व वस्तुपरिच्छेद आहे; श्रुतिमध्यें आकाशाची उत्पत्ति आत्म्यापासून सांगितलेली आहे म्हणून आकाश हें कालानें मर्यादित आहे. आकाश जरी सर्व वस्तूंत असले तरीपण तें प्रत्येक वस्तुरूप नाहीं तर प्रत्येक वस्तूहून भिन्न आहे म्हणून आकाशाच्या ठिकाणीं 'वस्तु परिच्छेद' आहे. ब्रह्माच्या ठिकाणीं मात्र हे तिन्हीहि परिच्छेद नाहींत. त्याचप्रमाणें ब्रह्माचे ठिकाणीं **सजातीय, विजातीय** व **स्वगत** असे तीन भेद नाहींत. एकाच जातींतील जो भेद त्याला **सजातिय** भेद म्हणतात. उदाहरणार्थ सर्व झाडांची जात वृक्ष आहे, परंतु आंब्यासारखा पिंपळ नसतो व पिंपळासारखी बाभुळ नसते. असा जो वृक्षवृक्षांतील भेद त्याला 'सजातीय'

भेद म्हणतात. अन्य जातीशीं जो भेद त्याला '**विजातीय**' भेद म्हणतात. उदाहरणार्थ वृक्ष व दगड यांमधील जो भेद तो 'विजातीय' भेद होय. आप-आपल्या अवयवांतील जो भेद त्याला '**स्वगत**' भेद म्हणतात. जसें वृक्षाचें पान फळासारखें नसतें; फुलासारखें फळ नसतें व फांदीसारखा बुंधा नसतो. असा जो वृक्षस्वरूपांतील भेद त्याला 'स्वगत' भेद म्हणतात. ब्रह्म हें एकच एक आहे व त्याच्याहून भिन्न असें दुसरें कांहींच नाहीं म्हणून त्याच्या ठिकाणीं 'सजातीय' व 'विजातीय' भेद नाहींत. जें सावयवी असतें त्याच्या ठिकाणीं 'स्वगत' भेद असतो. पण ब्रह्म हें निरवयव असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं 'स्वगत' भेद नाहीं. अतएव ब्रह्म हें सजातीय, विजातीय व स्वगत भेद-शून्य आहे.

**ओवी ४१—बुद्धीची दृष्टी न रिगे** (पान ३०)–बुद्धीला ब्रह्म विषय होत नाहीं; म्हणजेच 'आत्मा' मनबुद्धीला गोचर होत नाहीं असें या ठिकाणीं सांगितलें आहे. पण ह्याच्या उलट आत्मा हा मनबुद्धीला विषय होतो असें उपनिषदांत सांगितलें आहे. ('मनसैवेदमाप्तव्यम्' 'दृश्यते त्वग्र्यया बुध्या') ह्यांत विरोध कसा नाहीं हें समजण्याकरितां बाह्य पदार्थाचें ज्ञान कसें होतें हें समजणें अवश्य आहे. **बाह्यपदार्थज्ञानाची रीति**–कोण-त्याहि बाह्यपदार्थाचें ज्ञान होण्याकरितां तीन गोष्टी लागतात:—(१) **बाह्य-प्रकाश**. (२) **वृत्तिव्याप्ति** व (३) **फलव्याप्ति**. अंतःकरण हें भूतांच्या एकत्रित झालेल्या (म्ह० मीलित) सत्त्वगुणापासून उत्पन्न होतें म्हणून तें काचेसारखें शुद्ध आहे. तशीच अंतःकरणवृत्ति हीहि शुद्ध उपाधि आहे. अंतः-करणाच्या घटाकार झालेल्या परिणामास 'अंतःकरणवृत्ति' म्हणतात. चैत-न्याचें अंतःकरणांत पडलेलें जें प्रतिबिंब त्याला 'आभास' म्हणतात. त्या आभासाचेंच दुसरें नांव 'फल' असें आहे. अंतःकरणाप्रमाणेंच अंतःकरण-वृत्तींतहि 'आभास' असतो. त्या वृत्तिगत आभासास 'फलव्याप्ति' म्हणतात व नुसत्या वृत्तीस 'वृत्तिव्याप्ति' म्हणतात. ज्या वेळेस घटादि बाह्यपदार्थाचें ज्ञान होतें, त्या वेळेस अंतःकरणवृत्ति चिदाभासासह नेत्रद्वारा बाहेर निघते व घटापर्यंत जाते. नंतर ती घटास व्यापते व घटाच्या आकारासारखी होते.

घटाचें ज्ञान होण्यापूर्वी घटावर दोन आवरणें म्हणजे आच्छादनें असतात. एक अंधकाराचें व दुसरें अज्ञानाचें. त्यांपैकीं अंधकाराचें आवरण बाह्यप्रकाश नाहींसें करतो, वृत्त्यंश घटावरील अज्ञानाचें आवरण नाहींसें करतो व वृत्तींत असणारा आभास निरावरण झालेल्या घटाचें घटरूपानें ज्ञान करून देतो. तात्पर्य, बाह्यपदार्थज्ञानास बाह्यप्रकाश, वृत्तिव्याप्ति व फलव्याप्ति ह्या तिहींची जरूरी लागते. **आत्म्याच्या प्रत्यक्षज्ञानाची रीति**—आत्मज्ञानाच्या वेळीं फक्त वृत्तिव्याप्तीची जरूरी असते. बाह्यप्रकाश व फलव्याप्तीची जरूरी नसते. जसें मडक्याखालीं असलेला विजेचा दिवा पहावयाचा असेल तर मडकें फोडण्याकरितां फक्त दंडाची जरूरी असते. बाह्यप्रकाशाची जरूरी नसते. त्याचप्रमाणें आत्मा हा स्वयंप्रकाश होण्यास्तव त्याला अंतःकरणवृत्ति पहावयास गेली असतां बाह्यप्रकाशाची किंवा वृत्तिगत आभासाची म्हणजे फलव्याप्तीची जरूरी नाहीं, तर केवळ वृत्तिव्याप्तीची जरूरी आहे. ती अंतःकरणवृत्ति आत्माश्रित अज्ञानाच्या आवरणाचा नाश करते. नंतर निरावरण आत्म्याचें त्याच्याच प्रकाशानें सच्चिदानंदरूपानें प्रत्यक्ष ज्ञान होतें. तात्पर्य, निरावरण शुद्ध आत्मा, वृत्तीचा विषय होत नाहीं हीच गोष्ट 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह' वगैरे वाक्यें सांगतात. व आवरणसहित आत्मा अज्ञानावरणभंगद्वारा वृत्तीचा विषय होतो, ही गोष्ट 'मनसैवेदमाप्तव्यम्' वगैरे वाक्यें सांगतात. वरील रीतीनें महावाक्याच्या श्रवणापासून उत्पन्न झालेली 'अहं ब्रह्मास्मि' ही वृत्ति केवळ आत्म्यावरील अज्ञानाचें आवरण निवृत्त करते, साक्षात् आत्म्याचें ज्ञान करून देत नाहीं तर तें ज्ञान आत्म्याच्या स्वप्रकाशानेंच आपोआप अंतःकरणवृत्तींत होतें हें सहजच लक्षांत येईल.

**ओवी ४६—वैराग्यमहापावक**–(पान ३३)–वैराग्यरूपी मोठा अग्नि. **वैराग्य**–महामुनि पतंजलीनें 'दृष्टाऽऽनुश्रविकविषयवैतृष्ण्यम् वैराग्यम्' अशी वैराग्याची व्याख्या केली आहे. आपण जे जे विषय दृष्टिद्वारा पाहतों अथवा ज्यांच्याविषयीं कानानें ऐकतों त्या त्या सर्व विषयांविषयीं अंतःकरणांत तृष्णा किंवा इच्छा नसणें ह्याला वैराग्य म्हणतात. ज्ञानेश्वरमहाराजांनीं 'इहामुत्रफलभोगविराग' म्हणजे इहलोकीं असणारे वनितादि भोग आणि परलोकीं

असणारे उर्वशी, अमृतादि दिव्यभोग यांविषयीं निरिच्छ असणें; अशी वैराग्याची व्याख्या दिली आहे (तैसे ऐहिकींचे कां स्वर्गींचे । भोग पाइक जालिया इच्छेचे । परी भोगावें हें न रुचे । मनामाजीं ॥ ज्ञा. १६–१६६ ) परमार्थाच्या मार्गांत वैराग्याचें महत्त्व फार आहे. त्याचें महत्त्व किती आहे, ह्याची कल्पना येण्याकरितां ज्ञानेश्वरमहाराजांनीं वैराग्य हा जणूं काय मोक्षाला नेणारा दरवाजाच आहे; मोक्षरूपी ठेवा प्राप्त करून देणारें हें तारण आहे; आत्मप्राप्ति करून देणारें हें मूर्तिमंत दैवच आहे अथवा आत्मज्ञान प्राप्त करून देणारें हें दिव्यांजनच आहे असें त्याचें वर्णन केलें आहे. ( 'ऐसेनि शुभाशुभीं संसारीं । सांडिला तो अवधारीं । वैराग्य मोक्षद्वारीं । उभा ठाके ॥' ज्ञा. १८–९०० 'मोक्षफळें दिधली बोल । जें सुकृततरूचें फूल । तयें वैराग्यीं ठेवी पाऊल । भंवरु जैसा ॥ ' ज्ञा. १८–९०२. ' तें हें विषयवैराग्य । जें आत्मलाभाचें भाग्य । येणें ब्रह्मानंदा योग्य । जीव होती' ॥ ज्ञा.१३–५२२. 'किंबहुना आत्मज्ञान । जेणें हाता ये निधान । तें वैराग्य दिव्यांजन । जीवें ले तो' ॥ ज्ञा. १८–९०४ ) ज्यानें वैराग्यरूपी मित्र जोडून ठेविला आहे व ब्रह्माच्या ठिकाणीं वृत्तीचा लय होईपर्यंत जो त्याचा त्याग करीत नाहीं त्याला मोक्षविजयरूपी लक्ष्मी खात्रीनें प्राप्त होते. ( 'वीतराग ते सारिखा । जोडूनि ठेविला सखा । तो आघवीयाचि भूमिका–। सवें चाले' ॥ ज्ञा.१८–१०४३ तैसें मोक्षीं प्रवर्तलया । वृत्ती ब्रह्मीं जाय लया । तंव वैराग्य आथी तया । भंगु कैंचा ॥ ज्ञा.१८–१०४५ ) अशा प्रकारें ज्या वैराग्याची थोरवी ज्ञानेश्वर महाराजांनीं येवढी वर्णन केली आहे त्या वैराग्याला 'जिज्ञासा' वैराग्य म्हणतात. **जिहासा वैराग्य** व **जिज्ञासा वैराग्य** असे वैराग्याचे दोन प्रकार आहेत. दुःखाचा टोला बसला असतां जें तात्पुरतें वैराग्य उत्पन्न होतें त्याला ' जिहासा वैराग्य ' म्हणतात. जसें प्रसूतिवैराग्य, स्मशानवैराग्य इत्यादि. हें वैराग्य जोंपर्यंत दुःख असतें तोंपर्यंत टिकतें व अनुकूल परिस्थिति प्राप्त झाली असतां नष्ट होतें व नंतर मनुष्य हा पुन्हां विषयसुखांत गुरफटला जातो. आत्मानात्मविवेकाच्या योगानें जें वैराग्य प्राप्त होतें त्याला ' जिज्ञासा ' वैराग्य म्हणतात. एकनाथमहाराजांनीं वैराग्याचे ' सात्त्विक, राजस व तामस ' असे

तीन प्रकार सांगितलेले आहेत. नुसतें अंगाला भस्म लावून, हातांत चिमटा घेऊन, बैराग्याप्रमाणें गांवोगांव भिक्षा मागत हिंडणें ह्याला 'तामस' वैराग्य म्हणतात. ( 'नाहीं वेदविधी आचार । नेणें सत्कर्म साचार । कर्मधर्मी भ्रष्टाकार । तो अपवित्र तामस ।' एक.चिरं. ६ ). लोकांत केवळ मान मिळण्याकरितां व मठ स्थापन करण्याकरितां जो केलेला त्याग त्याला 'राजस वैराग्य' म्हणतात. ( 'त्याग केला पूज्यतेकारणें । सत्संग सोडूनि पूजा घेणें । शिष्यममता धरोनि राहाणें । तें जाणणे राजस' । एक. चिरं. ७ ). भोगेच्छा टाकून केवळ भगवत्प्राप्तीकरितांच जो केलेला त्याग त्याला 'सात्त्विक' अथवा 'शुद्ध वैराग्य' म्हणतात. ह्याचेंच नाव 'जिज्ञासा वैराग्य' असें आहे. ( भोगेच्छा विषयक । ते तों सांडी सकळीक । प्रारब्धें प्राप्त होतां देख । तेथोनि निष्टंक अंग काढी ।। एक. चिरं. १० ). परमार्थांत सर्व स्नेहाला जाळणारें जें 'जिज्ञासा वैराग्य' तेंच उपयोगी पडतें. ( देत सर्वस्नेहा मिठी । आंगीं ऐसे वैराग्य उठी । स्वर्गसंसारा कांटी । काढितची' ।। ज्ञा.१८-७८२) ह्यालाच ज्ञानेश्वरमहाराज ह्या ठिकाणीं 'महापावक' असें म्हणतात. ह्या वैराग्यांत येवढें सामर्थ्य असण्याचें कारण त्याला आत्मानात्मविवेकाचें बळ असतें ( विवेकासहित वैराग्याचें बळ । धगधगीत ज्वाळ अग्नि जैसा' तुका. १२८७ ). अशा प्रकारचें जिज्ञासा वैराग्य हें विहितकर्म, निष्काम व ईश्वरार्पण-बुद्धीनें केलें असतां प्राप्त होतें. ( 'तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा । पूजा केली होय अपारा । तोषालागीं । 'म्हणौनि तिये पूजे । रिझलेनि आत्मराजें । वैराग्यसिद्धि देईजे । पसाय तया ।। ज्ञा. १८-९१७-१८ ). किंवा आत्मानात्मविवेकानें यिषयांसंबंधीं दोषदृष्टि उत्पन्न झाली असतांहि प्राप्त होतें ( तैसी संसारा या समस्ता । जाणिजे जैं अनित्यता । तैं वैराग्य दवडितां । पाठीं लागे ।। ज्ञा. १५-३९ ).

**ओवी ७७—निषेधातें** (पान ४४)—निषिद्ध कर्माला. **कर्मविचार**—कर्मांचे मुख्यता दोन भेद आहेत. एक विहितकर्म, दुसरें निषिद्ध कर्म. शास्त्रानें ज्याची 'चोदना' म्हणजे प्रेरणा केली आहे त्याला विहितकर्म म्हणतात. विहित कर्मांचे पुन्हा चार भेद आहेतः—नित्य, नैमित्तिक, काम्य व प्राय-

श्चित्त. दररोज करावयाचें जें कर्म त्याला ‘ नित्य कर्म ’ म्हणतात. उदाहरणार्थ ब्राह्मणानें संध्यावंदन व पंचमहायज्ञ इत्यादि कर्मे करणें (‘ आणि सायंप्रात-र्मध्यान्हीं । जें कां करणीय प्रतिदिनीं ’ ॥ ज्ञा. १८–११५ ). प्रसंगविशेषीं जें कर्म करावयाचें त्याला ‘ नैमित्तिक कर्म ’ म्हणतात. जसें श्राद्धपक्षादि कर्मे करणें किंवा चंद्रसूर्यादि ग्रहणांच्या वेळीं जपादिकर्म करणें. (‘आणि सोमसूर्य-ग्रहणें । येऊनि करविती पार्वणें । कां माता पितरमरणें । अंकित जे दिवस ॥ अथवा अतिथी हन पावे । ऐसैसे पडे जें करावें । तें तें कर्म जाणावें । नैमि-त्तिक गा ॥ ज्ञा. १८–११०–११ ). विशिष्ट फलप्राप्तीकरितां ज्याचें विधान केलेलें असतें त्याला काम्य कर्म म्हणतात. उदाहरणार्थ ‘ पुत्रकामेष्टि ’ वगैरे यज्ञ करणें. निषिद्ध कर्म घडलीं असतां त्यांपासून उत्पन्न होणारे जे दोष ते घालविण्याकरितां जीं कर्मे करावयाचीं त्याला ‘ प्रायश्चित्त ’ कर्में म्हणतात. प्रायश्चित्त कर्मांत दोन भेद आहेत:–साधारण प्रायश्चित्त व असाधारण प्राय-श्चित्त. विशिष्ट पाप घडलें असतां तन्निवारणार्थ जें विशिष्ट कर्म करावयाचें त्याला ‘ असाधारण प्रायश्चित्त ’ म्हणतात. उदाहरणार्थ संन्याशानें द्रव्य घेतलें असतां, द्रव्यत्यागपूर्वक तीन दिवस उपास करणें ह्याला ‘ असाधारण प्राय-श्चित्त ’ म्हणतात. गंगास्नान व भगवन्नाम हीं दोन साधारण प्रायश्चित्तें आहेत. यांनीं ज्ञात व अज्ञात पातकांचा नाश होतो. शास्त्रानें करूं नये म्हणून सांगि-तलेलें जे कर्म त्याला निषिद्ध कर्म म्हणतात. उदाहरणार्थ मद्यपान, परस्त्रीगमन इत्यादि. मुमुक्षूनें निषिद्ध कर्म करूं नये कारण त्यामुळें नरकादि योनींत जन्म प्राप्त होतो. त्याचप्रमाणें काम्यकर्मेंहि करूं नयेत कारण त्यांनीं स्वर्गादि लोकांची प्राप्ति होते. चुकून जर निषिद्ध कर्म झालें तर त्याच्या निवारणार्थ प्रायश्चित्त कर्म करावें. तेव्हां मुमुक्षूनें केवळ ‘ नित्य नैमित्तिक ’ कर्में कर्तृत्वमद व फला-स्वाद टाकून ईश्वरार्पण बुद्धीनें करावीत. असें केल्यानें अंतःकरणशुद्धि होते व वैराग्याचा लाभ होतो. नंतर गुरूची गांठ पडते व त्यांनीं केलेल्या ‘तत्त्व-मसि’ महावाक्याच्या उपदेशानें जीव हा ‘ मी ब्रह्म आहे ’ या अनुभवावर येतो व कृतार्थ होतो. **कर्मफळ**–कर्मांचीं फलें (जन्ममृत्यु). **कर्मफल त्रिविध–प्रकारचें सांगितलें आहेः**—इष्ट, अनिष्ट, व मिश्र [ ‘ अनिष्टमिष्टं मिश्रं च

त्रिविधं कर्मणः फलम् ' गी. १८-१२ ]. [ पुण्य कर्मानें ] देव लोकाची प्राप्ति होणें ह्याला 'इष्टफल' म्हणतात. [ पापकर्मानें ] पशुपक्ष्यादि शरीरें प्राप्त होणें ह्याला 'अनिष्टफल' म्हणतात, व [ समान पापपुण्यात्मक-कर्मानें ] मनुष्यशरीराची प्राप्ति होणें ह्याला 'मिश्र फल' म्हणतात. ह्या तिहींपैकीं कोणतेंहि कर्म घेतलें तरी तें शरीरप्राप्तीलाच कारणीभूत होतें व त्यामुळें जिवाला जन्ममरणरूपी दुःखें भोगावीं लागतात. म्हणून कर्माचें फल सरते-शेवटीं 'जन्ममृत्यु' हेंच ठरतें. **जाळित**-जाळून टाकतात, नाहींशीं करतात. भक्तानें कर्म भगवंताला अर्पण केले असतां तें त्याला भोग द्यावयास शिल्लक राहात नाहीं, ह्याचा अर्थ भक्ताकडून क्रियमाण कर्म होत नाहीं. जन्म देणाऱ्या कर्माचे तीन प्रकार केले जातातः-**संचित, प्रारब्ध व क्रियमाण.संचित कर्म**-अनेक जन्मांत जीं पापपुण्यात्मक कर्मे केलीं व ज्या कर्माच्या फलभोगास प्रस्तुत जन्मांत अजून प्रारंभ झालेला नाहीं अशा कर्मांच्या सांठयास 'संचित कर्म' म्हणतात. हे संचितकर्म म्हणजे पेवांतील सांठवून ठेवलेल्या खंडोगणती धान्या-प्रमाणें समजावें. **प्रारब्धकर्म**-त्या संचित कर्मांतून भोग देण्यास जे कर्म फलोन्मुख झाले आहे व ज्याचा भोग घेण्याकरितां प्रस्तुत जन्म मिळाला आहे त्या कर्मास प्रस्तुत जन्माचे प्रारब्ध कर्म म्हणतात. हे कर्म म्हणजे पेवांतून खाण्याकरितां वेगळ्या काढलेल्या व खात असलेल्या धान्याप्रमाणें समजावें. **क्रियमाणकर्म**-प्रस्तुत जन्मांत प्रारब्धकर्म भोगीत असतांना जें देहाहंकारपूर्वक पापपुण्यात्मक कर्म होतें त्याला 'क्रियमाणकर्म' म्हणतात, हें कर्म म्हणजे शेतांत पेरलेल्या धान्याप्रमाणें समजावें. ह्या क्रियमाण कर्मांत अनेक जन्म देण्याचें सामर्थ्य असतें. सचित कर्माचा नाश ब्रह्मज्ञानानें होतो; प्रारब्धकर्माचा नाश तें कर्म भोगून संपलें असतां होतो व क्रियमाण कर्माचा नाश निष्कामकर्मा-नुष्ठानानें होतो.

**ओवी ९२—सायुज्याचिया** ( पान ५५ )-मोक्षाच्या—**मोक्ष** अथवा **मुक्ति** चार प्रकारच्या आहेतः—सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता. **सलोकता**-उपास्य देवतेचा जो लोक त्या लोकाला मेल्यानंतर जाणें व तेथें

राहून तेथील भोग भोगणें याला सलोकता मुक्ति म्हणतात. **समीपता**–मेल्यानंतर देवतेच्या सन्निध जाणें व तिच्या जवळ राहून त्या लोकांतील भोग भोगणें याला समीपता मुक्ति म्हणतात. **सरूपता**–मेल्यानंतर देवतेच्या लोकीं जाणें व देवतेच्या स्वरूपाप्रमाणें उपासकाचें स्वरूप होणें व तेथें देवतेसारखें भोग भोगीत राहणें ह्याला सरूपता मुक्ति म्हणतात. **सायुज्यता**–मेल्यानंतर ब्रह्मस्वरूपाशीं तद्रूप होऊन जाणे ह्याला सायुज्यता मुक्ति म्हणतात. ( या ब्रह्मत्वासीचि पार्था । सायुज्य ऐसी व्यवस्था । याचि नांवें चौथा । पुरुषार्थु गा ॥ ज्ञा. १४–४०१ ). ह्या चारी मुक्तींमध्यें सायुज्यता मुक्ति ही श्रेष्ठ आहे.

**ओवी १०४—चित्त** ( पान ६० )–अंतःकरण.–अंतःकरण वृत्तीचे तिच्या वेगवेगळ्या कार्यावरून **मन**, **बुद्धि**, **चित्त**, व **अहंकार** असे चार भेद करतात. 'संकल्पविकल्प करणारी' जी वृत्ति तिला 'मन' म्हणतात. ( वायां मन हें नांव । एऱ्हवीं कल्पनाचि सावेव ।' ज्ञा. १३–११० ). योग्य निवड करून 'निश्चय करणारी' जी वृत्ति तिला 'बुद्धि' म्हणतात. ( जिये अधमोत्तम सुझे । जिये सानें थोर बुझे । जिया दिठी पारखिजे । विषो जिवे ॥ ज्ञा. १३–८७ ). 'चिंतन करणारी' जी वृत्ति तिला 'चित्त' म्हणतात. 'अभिनिवेष घेणारी' जी वृत्ति तिला 'अहंकार' म्हणतात. ( तैसी पांचांहि गांठी पडे । जैं देहाकारु उघडे । तैं नाचवी चहूंकडे । तो अहंकारु गा ॥' ज्ञा. १३–८१ ) मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार हे चार मिळून 'अंतःकरण–चतुष्टय' होतें.

**ओवी १५३—जीवु** ( पान ७९ )–जीवचैतन्य–अंतःकरण, बुद्धि, व व्यष्टि–अज्ञान ह्यापैकीं एकेक जीवाचें विशेषण मानून **जीवाचें स्वरूप** खालीलप्रमाणें सांगितलेलें आहे:—( १ ) अंतःकरणाधिष्ठानचैतन्य ( म्ह० कूटस्थचैतन्य ), अंतःकरण व अंतःकरणांतील चिदाभास ( म्ह० कूटस्थचैतन्याचें प्रतिबिंब ), या तिघांच्या समूहाला 'जीव' म्हणतात. ( २ ) बुद्ध्यधिष्ठानचैतन्य ( म्ह० कूटस्थचैतन्य ), बुद्धि व बुद्धींतील चिदाभास ( म्ह० कूटस्थ चैतन्याचें प्रतिबिंब ) या तिघांच्या समूहाला 'जीव' म्हणतात. ( ३ ) व्यष्टि–

अज्ञानाधिष्ठानचैतन्य ( म्ह० कूटस्थचैतन्य ), व्यष्टि-अज्ञान व व्यष्टि-अज्ञानांतील चिदाभास ( म्ह० कूटस्थचैतन्याचें प्रतिबिंब ), या तिघांच्या समूहास 'जीव' म्हणतात. ( ४ ) ज्या वेळेस चिदाभास' हा अंतःकरणाशीं किंवा बुद्धीशीं किंवा व्यष्टि-अज्ञानाशीं तादात्म्य करून त्यांचे धर्म आपल्या ठिकाणीं मानूं लागतो त्या वेळेसच तो 'जीवत्वदशेला' येतो; म्हणून कांहीं ग्रंथकार जीवाचें लक्षण 'अंतःकरणविशिष्टचैतन्य' किंवा 'बुद्धि विशिष्टचैतन्य' किंवा 'व्यष्टि-अज्ञानविशिष्ट चैतन्य' असें करतात. ( ५ ) मी कर्ता, भोक्ता, ज्ञाता हा भ्रम 'चिदाभासाला' होतो म्हणून कित्येक 'चिदाभासाला' जीव म्हणतात. **चिदाभासः**—अंतःकरणांत अथवा बुद्धींत अथवा व्यष्टि-अज्ञानांत प्रतिबिंबित झालेलें अधिष्ठानचैतन्याचें म्हणजेच कूटस्थचैतन्याचें जें प्रतिबिंब त्या प्रतिबिंबास 'चिदाभास' किंवा 'आभास' म्हणतात. 'प्रतिबिंब' ह्याचा अर्थ कूटस्थचैतन्याच्या 'ज्ञानाची प्रकाशता' असा आहे. **ऐक्यासनीं**—ऐक्यरूपी आसनावर-जीवाचें व परमात्म्याचें ऐक्य होण्याकरितां जीवानें जें स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन देहांशीं जें भ्रांतिज तादात्म्य केलेलें असतें तें प्रथमतः विचाराच्या योगानें टाकावें लागतें. **शरीरत्रयविचार** (पान ७९)—स्थूल, सूक्ष्म व कारण हीं जीवाचीं तीन शरीरें अथवा देह आहेत. हीं तीन शरीरें उपाधिरूप आहेत. **स्थूल-शरीर**—हें पंचीकृत पंचमहाभूतांपासून निर्माण होतें. हें प्रत्यक्ष डोळयाला दिसतें म्हणून याला 'स्थूल' म्हणतात. ज्या भूतांचें पंचीकरण झालें आहे म्हणजे जीं एकमेकांत मिसळलीं आहेत त्यांना 'पंचीकृत' भूतें म्हणतात व जीं एकमेकांत मिसळलीं नाहींत त्यांना 'अपंचीकृत' भूतें म्हणतात. स्थूल शरीराच्या मागें उत्पत्ति व नाश आहेत म्हणून स्थूल शरीर हें आत्मा नव्हे. **सूक्ष्मशरीर**—हें अपंचीकृत पंचमहाभूतांच्या तत्त्वांपासून उत्पन्न होतें. हें पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें, पांच प्राण, मन आणि बुद्धि अशा सतरा तत्त्वांचें बनलेलें असतें. कोणी ह्यांत आणखी 'चित्त अहंकार' हीं तत्त्वें घेऊन 'सूक्ष्म शरीर' एकोणीस तत्त्वांचें मानतात. ह्यालाच लिंग-शरीर म्हणतात. हें वासनारूप असतें; हें डोळयाला

प्रत्यक्ष दिसत नाहीं व स्थूल देह पडल्यानंतर जीव हा ह्या सूक्ष्म शरीराच्या आधारानेंच असतो. अनेक जन्मांतून जीवाला अनेक स्थूल शरीरें जरी प्राप्त होतात तरीपण जीवाचें सूक्ष्म शरीर हें मोक्ष मिळेपर्यंत एकच असतें. ह्या लिंग शरीरांतील तत्त्वे हीं जड व विकारी आहेत म्हणून सूक्ष्म शरीर हें आत्मा नव्हे. ( ३ ) **कारण शरीर**–व्यष्टि–अज्ञानालाच कारणशरीर म्हणतात. हें अनादि व अनिर्वाच्य आहे. 'मी अज्ञानी, मी कांहीं जाणत नाहीं' असें जीवाला अज्ञानाचें म्हणजे कारण शरीराचें ज्ञान होतें व ज्ञाता हा नेहमीं ज्ञेयाहून वेगळा असतो; म्हणून कारण शरीर हा आत्मा नव्हे.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

॥ ॐ ॥

# प्रकरण तिसरें

# प्रश्न व उत्तरें

**प्रश्न १ लाः**—श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या काळीं महाराष्ट्राची परिस्थिति कशी होती ती थोडक्यांत सांगा.

**उत्तरः**—( १ ) श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वेळीं महाराष्ट्रांत यादववंशांतील श्रीरामचंद्र ऊर्फ रामदेव हा देवगिरी येथें राज्य करीत होता. या रामदेवरावाची कारकीर्द सन १२७१ ते १३०९ पर्यंत झाली. ( २ ) श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या वेळीं महाराष्ट्रांत यावनी म्हणजे मुसलमानी सत्तेचा प्रवेश झाला नव्हता व महाराष्ट्रांत सुबत्ता नांदत होती. ( ३ ) या वेळीं बौद्धधर्माचा जवळ जवळ लोप झाला होता; पण जैन, लिंगायत व महानुभाव अथवा मानभाव या तीन अवैदिक पंथांचा बराच प्रसार झालेला होता. त्याचप्रमाणें या वेळीं श्रीरामानुजाचार्यांचा विशिष्टाद्वैतवादी भागवतधर्म, नाथपंथ व वारकरीपंथ असे तीन वैदिक पंथहि प्रमुख होते.

**प्रश्न २ राः**—श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा जीवनवृत्तांत थोडक्यांत सांगा.

**उत्तरः**—श्रीज्ञानेश्वरमहाराजांचे वडील विठ्ठलपंत हे होत. ते पैठणजवळ असलेल्या आपेगांवचे राहणारे व त्या गांवची कुलकर्णीपणाची वृत्ति त्यांच्या घराण्यांत चालत आलेली होती. श्रीक्षेत्र आळंदीचे कुलकर्णी सिधोपंत यांची मुलगी रुक्मिणी हिच्याबरोबर त्यांचा विवाह झाला होता. कांहीं वर्षे संसार करून ते काशीला गेले व तेथें त्यांनीं संन्यास ग्रहण केला. पुढें गुरूच्या आज्ञेमुळें ते आळंदीस परत आले व त्यांनीं पुन्हा गृहस्थाश्रम घेतला व त्यानंतरच त्यांना श्रीनिवृत्ति, श्रीज्ञानदेव, श्रीसोपानदेव व मुक्ताबाई अशीं चार

अपत्यें झालीं. श्रीज्ञानेश्वरमहाराजांचा जन्म, शक ११९३ म्हणजे सन १२७१ मध्यें झाला. संन्यासाश्रमानंतर पुन्हां गृहस्थाश्रमाचा स्वीकार केल्याकारणानें लोकांनीं विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई यांचा बराच छळ केला, व त्यांना वाळीत टाकलें. मुलें मोठीं झाल्यानंतर त्यांचें मौंजीबंधन करण्याचा प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहिला व म्हणून त्यांनीं आळंदीकर ब्रह्मवृंदाकडे आपणास पावन करून घेण्याकरितां धांव घेतली; पण ब्रह्मवृंदांनीं त्यांना पावन करून घेण्यास धर्मग्रंथांत आधार नाहीं असें सांगितलें व त्यांनीं देहांत प्रायश्चित्त घ्यावें असा निर्णय दिला. नंतर विठ्ठलपंत व रुक्मिणीबाई या दोघांनींहि देहत्याग केला. पुढें हीं सर्वमुलें पैठणास गेलीं व तेथील ब्रह्मवृंदाकडून त्यांनीं शुद्धिपत्र मिळविलें. त्या वेळीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं 'ग्यान्या' रेड्याच्या मुखांतून वेद वदविला. पैठणाहून आळंदीस परत येतांना श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं भगवद्गीतेवर 'भावार्थदीपिका' अथवा 'ज्ञानेश्वरी' ही टीका शक १२१२ म्हणजे सन १२९० मध्यें नेवासें येथें लिहिली व तेथील श्रीसच्चिदानंदबाबा हे त्यांचें लेखक बनल. नंतर त्यांनीं 'अनुभवामृत' अथवा 'अमृतानुभव' हा स्वतंत्र ग्रंथ, श्रीगुरुनिवृत्तिनाथ यांच्या सांगण्यावरून लिहिला. पुढें श्रीज्ञानेश्वर महाराज हे आळंदीस आल्यानंतर चांगदेव महाराज, वाघावर बसून व हातांत सर्पाचा चाबूक घेऊन त्यांच्या भेटीस आले. त्याबरोबर श्रीज्ञानेश्वर महाराज ज्या भिंतीवर बसले होते त्या भिंतीला चालण्याची त्यांनीं आज्ञा दिली व तिनेंहि ती मानली. चांगदेवांचा यामुळें गर्व हरण होऊन ते श्रीज्ञानेश्वर महाराजांना शरण आले. त्यांना उपदेश म्हणून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं 'चांगदेवपासष्टी' हा ग्रंथ लिहिला. नंतर ज्ञानेश्वरमहाराज तीर्थयात्रेस निघाले. प्रथमतः पंढरपुरास जाऊन नामदेवरायास त्यांनीं आपल्याबरोबर घेतलें व त्यांच्यासह उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक तीर्थयात्रा केल्या. यात्रा संपवून ते परत पंढरपुरास आले व नंतर श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं तेथें, आपला आळंदीस समाधि घेण्याचा निश्चय जाहीर केला. पुढें पंढरपूरची कार्तिक शुद्ध एकादशीची यात्रा संपल्यावर सर्व संतमंडळीसह श्रीज्ञानेश्वरमहाराज आळंदीस आले व तेथें शक १२१५ सन १२९३, कार्तिक वद्य त्रयोदशी मध्यान्हकाल, गुरुवार, या दिवशीं, श्री-

निवृत्तिनाथ, नामदेवराय सोपानदेव व मुक्ताबाई यांच्या समक्ष त्यांनीं जिवंत समाधि घेतली.

**प्रश्न–३राः**—श्रीज्ञानेश्वरीकालीन समाजस्थितीचें चित्र, १२ व्या अध्या-यांत आलेल्या उल्लेखावरून लिहा.

**उत्तरः**—( १ ) ज्ञानेश्वरमहाराजांच्या वेळचे लोक श्रीमंत, ऐश्वर्यसंपन्न व सुखवस्तु असे असावेत. ( ओ. १० 'श्रीमंते' ओ. १२–सोनियाचिया खाणी, ओ. २५–श्यातुका । ) ( २ ) त्या काळीं मोठ्या प्रकाशाकरितां लोक दिव-ट्यांचा उपयोग करीत असावेत (ओ. ५१–'टेंभा') ( ३ ) चामुंडा–देवीला संतुष्ट करण्याकरितां बकरीं व रेडे यांचे बळी देण्याची चाल रूढ असावी. ( ओ. ५३–प्रहारूनि संकल्प मेंढे. ) ( ४ ) वाटमारेपणाचा धंदा कांहीं निकृष्ट लोक करीत असावेत. ( ओ. ६१–'वाटवधें' ). ( ५ ) पतिमरणानंतर सती जाण्याची पद्धत रूढ असावी (ओ. ६६–भातारेंवीण करावा). ( ६ ) खंडानें शेती लावून देणें किंवा शेतीची लागवड स्वत: करणे हा व्यवसाय त्या काळीं असावा. ( ओ. ८१–कुळवाडी; ओ. २३२–सुक्षेत्रीं पेरणी केली. ) ( ७ ) पाण्यांतून तरून जाण्याकरितां लोक नावांचा उपयोग करीत असावेत (ओ. ९०–नावा). (८) दुसऱ्याला कांसेला लावून नदीच्या पलीकडे घेऊन जाण्या-इतके पोहण्यांत तरबेज लोक त्या काळीं असावेत [ओ. ९१–ध्यानकासे लाविले] [९] पोहण्यास शिकण्याकरितां व पाण्यांत तरंगण्याकरितां लोक सांगडीचा उपयोग करीत असावेत (ओ. ९२–प्रेमाची पेटी). (९) प्रसंगविशेषीं बोल-ण्याची सत्यता पटवून देण्याकरितां त्या काळीं शपथ वाहण्याचा प्रघात असावा ( ओ. ११३–आपुली आण वाहतु असें गा ). ( ११ ) पायाळू माणसाच्या डोळयांत अंजन घातलें असतां त्याला पुरलेलें द्रव्य दिसतें अशी समजूत त्या-काळीं असावी ( ओ. १७९–तत्त्वार्थीचा पायाळु । देखणा जो. ) ( १२ ) समाजांत सोवळें–ओवळें, पंक्तीला घेणें व न घेणें वगैरे आचार पाळले जात होते. ( ओ. २०८ एके पांती ).

**प्रश्न ४ थाः**—ज्ञानेश्वरीचें 'वृत्त व काव्य' ह्यासंबंधीं थोडक्यांत माहिती द्या.

## वृत्त

उत्तरः—ज्ञानेश्वरमहाराजांनीं ज्ञानेश्वरी हा ग्रंथ 'ओवी' छंदांत लिहिलेला आहे (क) प्रत्येक ओवी साधारणतः साडेतीन चरणांची आहे. (ख) शेवटचा अर्धा चरण बहुधा ४ ते ६ अक्षरांचा असतो व अगदीं क्वचित्प्रसंगीं ७ अक्षरांचा असतो. (उदाहरणें:—ओ. १ वर्षतिये; ओ. २–निर्विष होय; ओ. १०–ग्रंथनिरूपणीं; ओ. ५–परिये देसी निजे). (ग) पहिल्या तीन चरणांपैकीं प्रत्येकांत ६ ते १२ पर्यंत अक्षरें असतात. (उदाहरणें:—ओ. १–उदारे प्रसिद्धे; जयजय वो शुद्धे; अनवरत आनंदे; ओ. ४–आधार-शक्तीचिया अंकीं; ओ. २–ते तुझेनि गुरुकृपादृष्टी; ओ. ९–अहो सद्गुरू-चिये कृपादृष्टी; ओ. ६–करिसी मनपवनाचीं खेळणीं). (घ) प्रत्येक चर-णांत ठराविक अक्षरसंख्या नसल्यामुळें ज्ञानेश्वरीचें ओवीवृत्त कंटाळवाणें होत नाहीं, उलट त्यामुळें त्या वृत्ताला वैचित्र्यता आलेली आहे. (ङ) पहिल्या तीन चरणांत प्रत्येक चरणाच्या शेवटीं एकाक्षरी यमक नियमानें आढळतें. (उदाहरणें:—ओ १–'दे' हें अक्षर आहे; ओ. ३–'ली' हें अक्षर आहे व ओ. १०–'र' हें अक्षर आहे.)

## काव्य

(१) ज्ञानेश्वरींत शब्दालंकाराचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. शब्दालंकाराचे जरी पुष्कळ प्रकार असले तरी त्यांत 'श्लेष, अनुप्रास, यमक व चित्र' असे चार मुख्य प्रकार आहेत. ज्ञानेश्वरींत शब्दश्लेषालंकार फार थोडे आहेत, व 'चित्रबंध' रचना त्यांत मुळींच नाहीं; परंतु 'अनुप्रास' व 'यमक' हे शब्दालंकार विपुल आहेत. वाक्यांमध्यें तींच तींच अक्षरें पुन्हां पुन्हां आलीं असतां 'अनुप्रास' होतो. ओवी ११मध्यें (नवरसीं भरवीं सागर। करवीं उचित रत्नांचे आगर। भावार्थाचे गिरिवर। निफजवीं माये–११) 'र' हें अक्षर, ओवी ६३ मध्यें (अहोरात्र वावीं। मवावा वारा–६३) 'व' हें अक्षर व ओवी २४१ मध्यें (धर्मकीर्तिधवळु। अगाध दातृत्वें सरळु–२४१) 'ध' हें अक्षर वारंवार आलें आहे. या तीन ओव्या अनुप्रासाचीं उदाहरणें होत.

वाक्यामध्यें विशिष्ट स्थानीं एका किंवा अनेक अक्षरांची मागल्या स्वरासह आवृत्ति झाली म्हणजे त्याला ' यमक ' म्हणतात. ज्ञानेश्वरींत प्रत्येक ओवीच्या पहिल्या तीन चरणांच्या अंतीं एकाक्षरी ' यमक ' असतें हें वर सांगितलेंच आहे. याशिवाय कांहीं ओव्यांतून दोन दोन अक्षरांची यमकेंहि सांपडतात. ( उदाहरणें:—ओ. ५८-( ' आपुलिया साटोवाटीं । शून्य घेती उटाउठी । तेही मातेंचि किरीटी । पावती गा ।' व ओव्या-८३ व १०३ ). ( २ ) शब्दालंकाराप्रमाणेंच ज्ञानेश्वरींत रूपकें, उपमा, व्यतिरेक, अतिशयोक्ति व दृष्टांत असे साधे अर्थालंकार अनेक आहेत. पण ज्ञानेश्वरमहाराजांचा विशेष भर रूपकें व उपमा ह्यांच्यावर आहे. बाराव्या अध्यायाच्या आरंभींच त्यांनीं गुरुकृपादृष्टीवर माउलीचें व साधकावर बालकाचें रूपक केलेलें आहे. त्याचप्रमाणें ओ. २ मध्यें विषयावर व्यालाचें; ४ मध्यें योगसुखावर सोहळ्याचें; ५ मध्यें हृदयाकाशावर पल्लकाचें; ७ मध्यें सतराव्या जीवन-कलेवर स्तन्याचें; ४६ मध्यें वैराग्यावर महापावकाचें; ५३ मध्यें प्राणशक्ती-वर चामुंडादेवीचें व ९२ मध्यें प्रेमावर पेटीचें अशीं रूपकें केलेलीं आहेत. रूपकापेक्षां उपमांचें आधिक्य ज्ञानेश्वरींत फार आहे. १२ व्या अध्यायाच्या शेवटीं भक्ताचीं लक्षणें सांगतांना ज्ञानेश्वरमहाराजांनीं भक्ताचा एक एक गुण वर्णन करण्याकरितां निरनिराळीं उपमानें योजलेलीं आहेत. या ठिकाणीं भक्त हें एकच उपमेय असून भिन्न भिन्न धर्मांत चैतन्य, वसुधा, प्राण, तोय' अशीं भिन्न भिन्न उपमानें योजलीं असल्यामुळें ह्या ' उपमा ' 'मालोपमा' होतात. ( ओव्या १४४ ते १४८ ). 'उपमा' ह्या अर्थालंकाराचीं उदाहरणें १२ व्या अध्यायांत पुष्कळ आहेत—ओव्या—३५, ३६, १५१, १५६, १९४, १९९, २०४, २०७, २१०, २११ इत्यादि. ज्ञानेश्वरींत 'दृष्टांत'हि आढळतात. ओवी ८५ ( एऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागे । ) हें दृष्टांताचें उदाहरण आहे. ओवी— ( १७३—१७६ ) हें ' व्यतिरेक ' अलंकाराचें उदाहरण आहे. ' व्यतिरेक ' अलंकारांत उपमानाच्या ठिकाणीं असलेला विशिष्ट गुण उपमेयाच्या ठिकाणीं अधिक प्रमाणांत आहे असें दाखविलेलें असतें. काशी, हिमालय व गंगा

ह्यांच्या ठिकाणीं असलेला ‘ पवित्रता ’ हा गुण ‘ उपमेय ’ जो भक्त त्याच्या ठिकाणीं आधिक्यानें दाखविला आहे. भक्ताची पवित्रता ही काशी, हिमालय व गंगा ह्यांच्या पवित्रतेपेक्षां श्रेष्ठ आहे कारण मोक्ष मिळविण्याकरितां भक्ता-जवळ येऊन मरावें लागत नाहीं पण काशी, हिमालय व गंगा ह्या ठिकाणीं मरावें लागतें. ज्ञानेश्वरींतील ओव्यांना शब्दालंकार व अर्थालंकारामुळें जरी शोभा आलेली असली तरी त्यांतील आकर्षकता ही त्यांत योजलेल्या नादमधुर अक्षररचनेमुळें आहे. (३) माधुर्य, ओज आणि प्रसाद हे मुख्यतः काव्याचे तीन गुण आहेत. ज्या गुणामुळें अंतःकरण द्रवतें व आनंदित होतें त्या गुणाला ‘ माधुर्य ’ म्हणतात. या गुणाचा परिपोष वाक्यांत सानुस्वार मृदु वर्ण योजले असतां होतो. अशा प्रकारचीं सानुस्वार मृदु व्यंजनें ज्ञानेश्वरीच्या ओव्यांतून आलेलीं आहेत. ( जसें ओवी ६१ तया महेंद्रादि पदें । करिताति वाटवधें । आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ॥’ व ओ.–१२० व ओ.–२०४) ह्यामुळें ज्ञानेश्वरींत ‘ माधुर्य ’ हा गुण उत्कटतेनें प्रत्ययास येतो. ज्या काव्यांत अंतःकरणास उद्दीपन करून त्याचा विस्तार करणारी अशी जोरदार रचना असते त्यांत ‘ओज’ हा गुण असतो. कठोर व्यंजनांनीं हा गुण पोखला जातो. ज्ञानेश्वरींत ‘ ओज ’ हाहि गुण आहे. ओ. ‘१४–पाखांडाचे दरकुटे । मोडी वाग्वादअव्हांटे । कुतर्कांचीं दुष्टें । सावजें फेडी ॥ व ओ. ४७ ओ. ४८ हीं ‘ ओज ’ गुणाचीं उदाहरणें होत. ) जें काव्य ऐकल्याबरोबर अंतःकरणाला जाऊन भिडतें व ज्याची अर्थप्रतीति सहजगत्या होते अशा काव्यांत ‘प्रसाद’ हा गुण असतो. ‘प्रसाद’ हा गुण ज्ञानेश्वरींत ओतप्रोत भरलेला आहे. (उदा-हरणार्थ–ओव्या १४५ ते १५० ).

तात्पर्य, काव्य या दृष्टीनें ज्ञानेश्वरी हा ग्रंथ अनुपम्य असा आहे. ज्ञानेश्वर-महाराजांनीं महाभारताचें वर्णन ‘ म्हणोनि हा काव्यां रावो । ग्रंथ गुरुवतीचा ठावो । एथूनि रसां झाला आवो । रसाळपणाचा । ’ असें केलें आहे. हेंच वर्णन ज्ञानेश्वरीच्या बाबतींत तंतोतंत जुळतें. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ मऱ्हाठी भाषेंत लिहिलेल्या ग्रंथांमध्यें ‘ काव्यां रावो ’ असल्यामुळें श्रीएकनाथमहाराजांनीं ‘ ज्ञानेश्वरीपाठीं । जो ओवी करील मऱ्हाटी । तेणें अमृताचे ताटीं । जाण

नरोटी ठेविली ।' असें जें म्हटलें आहे त्यांत अतिशयोक्ति मुळींच नाहीं असें म्हणणें प्राप्त होतें. वास्तविक 'शांतरस' म्हणजे 'ब्रह्मरस' हा नीरस वाटणारा रस आहे. पण ज्ञानेश्वरमहाराजांनीं तो रस, आपल्या ज्ञानेश्वरीरूपी काव्यांत योग्य उपमा, दृष्टांत व कर्णमधुर शब्द यांच्यासह इतका ओतप्रोत भरून टाकला आहे कीं जो ज्ञानेश्वरी नित्य वाचील त्याला चित्ताकर्षक जो 'शृंगाररस' तोहि फिक्का वाटूं लागेल यांत मुळींच शंका नाहीं. अशा प्रकारचा रसाळ ग्रंथ लिहून श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं 'मी शृंगाररसावरहि ताण करून दाखवीन' अशी केलेली प्रतिज्ञा सार्थ करून दाखविली आहे असेंच म्हणावें लागते. (' नुसधीचि शांतिकथा । आणिजेल कीर वाक्पथा । जे शृंगाराच्या माथां । पाय ठेविती ॥ ज्ञा. १३-११५५ ).

## विस्तृत निरूपण, ( प्रकरण १ लें ) यांत आलेल्या मुख्य विषयांची प्रश्नोत्तररूपानें सूचि.

( टीपः—उत्तरांतील दिलेले पानांचे आंकडे, हे पहिल्या प्रकरणामधील आहेत. संक्षिप्त चिन्हें–प्र. = प्रश्न. उ. = उत्तर. )

**प्रश्न १ः**—ग्रंथारंभीं नमन करण्यांत ग्रंथकाराचे मुख्यतः हेतु कोणते असतात ? **उत्तरः**—पान १.

**प्रश्न २ः**—ज्ञानेश्वरांनीं गीतेच्या अठरा अध्यायांपैकीं किती अध्यायांच्या आरंभीं आपल्या गुरूंना नमन केलेलें आहे ? **उत्तरः**—पान १.

**प्रश्न ३ः**—वारंवार आपल्या गुरूंना नमन करण्यांत ज्ञानेश्वरांचे मुख्य हेतु कोणते दिसून येतात ? **उत्तरः**—पान २.

**प्रश्न ४ः**—ज्ञानेश्वरांनीं आपल्या नमनांतून गुरूच्या कोणत्या स्वरूपाचें वर्णन केलेलें आहे ? **उत्तरः**—पान २.

**प्रश्न ५ः**—बाराव्या अध्यायाच्या आरंभीं श्रीज्ञानेश्वरमहाराजांना आपल्या गुरूचें नमन माउलीच्याच रूपकानें करावें असें कां वाटलें ? **उत्तरः**—पा. ३व४

प्रश्न ६:—गुरूचें म्हणजे संतांचें पावित्र्य काशी, हिमालय व गंगा या तिहींपेक्षां श्रेष्ठ कसें आहे तें सांगा. उत्तरः—पानें ४ व ५.

प्रश्न ७:—संतांच्या अंगीं एवढी पवित्रता येण्याचें कारण काय ? उत्तरः—पान ६.

प्रश्न ८:—संतांची उदारता ही कल्पतरु, कामधेनु व चिंतामणि ह्या तिहींपेक्षां श्रेष्ठ कशी आहे तें सांगा. उत्तरः—पानें ६ व ७.

प्रश्न ९:—संतांची उदारता ही भगवंतापेक्षांहि अधिक कशी आहे ? उत्तरः—पानें ७ व ८.

प्रश्न १०:—संत साधकावर आनंदाचा वर्षाव करतात म्हणजे काय करतात ? उत्तरः—पान ९.

प्रश्न ११:—विषयांना सर्प असें कां म्हटलें आहे ? व संतांच्या संगतीनें तें विष कसें उतरतें ? उत्तरः—पान १०.

प्रश्न १२:—संत हे साधकाच्या ठिकाणचे ताप व शोक कसे घालवितात ? उत्तरः—पानें १० व ११.

प्रश्न १३:—जन्म देणारी माता ही आपल्या मुलास व श्रीगुरुमाउली ही साधकरूपी बालकास कशी कशी वाढवितात हें तुलनात्मक दृष्टीनें सांगा. उत्तरः—( १ ) आई ही मुलाला आपल्या मांडीवर वाढविते; गुरु हे साधकाला कुंडलिनी शक्तीच्या मांडीवर वाढवितात; म्हणजे त्याची कुंडलिनी सहजगत्या जागृत करून देतात. ( २ ) आई मुलाला झोप येण्याकरितां पाळण्यांत घालून झोके देते; श्रीगुरु साधकाला समाधिरूपी झोप येण्याकरितां अनाहत चक्ररूपी पाळण्यांत घालून झोके देतात. ( ३ ) आई मुलाला लामण दिव्यानें ओवाळते; गुरु हे साधकाला आत्मज्योतीनें ओवाळतात. ( ४ ) आई मुलाला चेंडू, दांडू, खुळखुळा वगैरे खेळणीं देते; श्रीगुरु हे साधकाला मननिरोध व प्राणनिरोध हीं खेळणीं देतात म्हणजे साधकाकडून मनाचा व प्राणांचा निरोध सहजगत्या करवून घेतात. ( ५ ) आई ही मुलाच्या अंगावर बिंदली, सोन्याचा कडदोरा वगैरे दागिने घालते; श्रीगुरु हे आत्मसुखाचा दागिना साधकाच्या अंगावर घालतात. ( ६ ) आई मुलाला स्तनपान देते;

श्रीगुरु हे साधकाला चंद्रामृतरूपी जीवनकलेचें स्तनपान देतात. (७) आई मुलाला झोप येण्याकरितां 'अंगाईगीत' गाते; श्रीगुरु, साधकाला समाधि-रूपी झोप येण्याकरितां अनाहत ध्वनिरूपी 'अंगाईगीत' गातात. (८) आई ही मुलाची समजूत घालण्याकरितां त्याला थोपटते व निजवते; गुरु हे साध-काला उपदेश करून त्याच्या ठिकाणची 'सोऽहं वृत्ति' घालवितात व त्याला निर्विकल्प समाधीची प्राप्ति करून देतात. (९) आई ही मुलाचें कोडकौतुक करूव त्याचे व्यावहारिक लाड पुरविते; श्रीगुरु हे साधकाचे योगसुखरूपी सोहळे पुरवून त्याचे सोऽहंसिद्धीचे लाड पुरवितात. (१०) आई ही मुलाला उदराबाहेर टाकते; श्रीगुरु हे साधकास आपल्या उदरांत घेतात म्हणजे त्याला आपल्या आत्मबोधांत समाविष्ट करतात.

**प्रश्न** १४:—श्रीगुरुप्रसन्नतेखेरीज प्राप्त झालेली विद्या सफल होत नाहीं ह्यासंबंधीं पौराणिक उदाहरण द्या. **उत्तर**:—पान १६.

**प्रश्न** १५:—आपल्या हातून 'सद्ग्रंथ' निर्माण व्हावा एवढ्याकरितां आपल्या ग्रंथांत कोणत्या गोष्टींची मागणी, ज्ञानेश्वरांनीं गुरूजवळ केली आहे तें सांगा. **उत्तर**:—पानें १८ व १९.

**प्रश्न** १६:—भगवंताचें विश्वरूप पाहून अर्जुन भयभीत कां झाला? **उत्तर**:—पान २१.

**प्रश्न** १७:—भगवंताचीं सगुण व निर्गुण हीं स्वरूपें एकच कशीं आहेत हें विशद करून सांगा. **उत्तर**:—पान २२.

**प्रश्न** १८:—अव्यक्ताची प्राप्ति योगानें किंवा ज्ञानानेंच कां होते? **उत्तर**:—पान २२.

**प्रश्न** १९:—भगवंताला जगद्बंधु असें कां म्हटलें आहे? **उत्तर**:—पान २५.

**प्रश्न** २०:—अनन्यता, वर्धमानता व अनवच्छिन्नता हीं भक्तीचीं तीन लक्षणें विशद करून सांगा. **उत्तर**:—पानें २५ ते २७.

**प्रश्न** २१:—भगवंताच्या अव्यक्त स्वरूपाचें वर्णन करा. **उत्तर**:—पानें २९ ते ३३.

प्रश्न २२ः—इंद्रियनिग्रह करण्यांत साधकाला किती दुःख होतें ह्याबद्दल ज्ञानेश्वरांनीं दिलेले दृष्टांत सांगा. उत्तरः—पान ३३.

प्रश्न २३—विषयांच्या बलाढ्यतेचें वर्णन करा. उत्तरः—पानें ३४ व ३५.

प्रश्न २४ः—अव्य–क्तोपासक ज्या योगमार्गानें अव्यक्ताची प्राप्ति करून घेतात त्या योगमार्गांतील उत्तरोत्तर पायऱ्या सांगा. उत्तरः—( १ ) यम, नियम व वैराग्य यांच्या द्वारें वृत्ति अंतर्मुख करणें. ( २ ) गुदद्वाराला मूलबंध देऊन अपानवायु कोंडणें व कुंडलिनी जागृत करणें. ( ३ ) तीनबंधांच्या योगानें ऊर्ध्ववायूचा निरोध करणें. ( ४ ) अपानवायु व ऊर्ध्ववायु यांच्या निरोधानें इडा व पिंगळेचें ऐक्य करून सुषुम्नेचें खालचें द्वार खुलें करणें. ( ५ ) सुषुम्ना मार्गानें कुंडलिनी अनाहतचक्रांत आणणें. ( ६ ) अनाहत-चक्रांतून कुंडलिनी ब्रह्मरंध्रापर्यंत नेणें व वाटेंत आज्ञाचक्राजवळ असणारें चंद्रामृत प्राप्त करून घेणें. ( ७ ) ब्रह्मरंध्रांतून कुंडालिनीचा म्हणजे प्राण-शक्तीचा चिदाकाशांत प्रवेश करविणें व तिचें शिवाशीं म्हणजे ब्रह्माशीं ऐक्य करणें.

प्रश्न २५ः—प्रेय व श्रेय म्हणजे काय ? उत्तरः—पान ४०.

प्रश्न २६ः—योगमार्ग व भक्तिमार्ग यांची तुलना करा ?

उत्तरः—( १ ) योगमार्गांत इंद्रादि देव विघ्नें आणतात व तीं विघ्नें योग्याला स्वतःच निवारण करावीं लागतात; भक्तिमार्गांत विघ्नें आलीं असतां त्यांचें निवारण भगवान् स्वतः करतात. ( २ ) योग्याला योगमार्गांतील कांहीं भूमिका चालून गेल्यानंतर ऋद्धिसिद्धि प्राप्त होतात व त्यांतच तो गुंग होऊन रहाण्याचा संभव असतो; भक्तिमार्गांत तसा प्रसंग येत नाहीं. (३) योग्याला कामक्रोधादिक विकार आंवरून ते तेथल्या तेथेंच जिरवावे लागतात; भक्ताला फक्त त्या विकारांची मोहोर भगवंताकडे लावावी लागते. ( ४ ) योग्याला अव्यक्ताबरोबर शरीर लढवावें लागतें पण भक्ताला सगुण परमात्मा डोळ्यां-समोर दिसत असतो. ( ५ ) योग्याला तहान, भूक वगैरे सर्व मारावीं लाग-तात पण भक्ताला तीं मारावीं लागत नाहींत. ( ६ ) योग्याला वनांत जाऊन थंडी, पाऊस व उन्हांत रहावें लागतें; भक्ताला तसें रहावें लागत नाहीं.

( ७ ) योग्याला इंद्रियांचा निरोध करावा लागतो भक्ताला फक्त तीं भगवंताकडे लावावीं लागतात. ( ८ ) योग्याला सर्व कर्मांचा त्याग करावा लागतो; भक्ताला केवळ तीं भगवंताला अर्पण करावीं लागतात. ( ९ ) योगमार्ग हा सतीच्या वाणापेक्षां कठिण आहे. सतीला निदान नवऱ्याचें प्रेत तरी समोर दिसत असतें व तिला एकदांच अग्नींत प्रवेश करावा लागतो; परंतु योग्याला अव्यक्त ब्रह्म दिसत नाहीं व रोज त्याला अग्निप्रवेशाइतके दुःसह कष्ट सोसावे लागतात. ह्याच्या उलट भक्ताला कोणतेच कष्ट पडत नाहींत. ( १० ) इतके कष्ट सहन करूनहि योग्याला जें फल प्राप्त होतें तेंच फल कष्ट न करतां भक्तालाहि प्राप्त होतें; म्हणून सुखकर व सोपा या दृष्टीनें भक्तिमार्ग हा योगमार्गापेक्षां श्रेष्ठ ठरतो.

प्रश्न २७:—व्यापक परमात्मा लहान हृदयांत कसा राहूं शकतो ?

उत्तरः—पानें ४४ व ४५.

प्रश्न२ ८:—ऐहिक व पारत्रिक भोग व मोक्ष यांना वापुर्डी कुळें असें कां म्हटलें ? उत्तरः—पानें ४५ ते ४७.

प्रश्न २९:—भक्त हे भगवंताशीं किती अनन्य असतात हें दृष्टांत देऊन सांगा. उत्तरः—पान ४७.

प्रश्न ३०:—संसारसागराची व्याप्ति व त्याचें दुर्लंघ्यत्व सांगा.

उत्तरः—पानें ५० व ५१.

प्रश्न ३१:—भगवत्प्राप्तीचे जे अनेक मार्ग आहेत त्यांत भगवन्नाम हा मार्ग सर्वांत सोपा कसा आहे ? उत्तरः—पानें ५२ व ५३.

प्रश्न ३२:—भगवंत हे अनन्य भक्ताचें सर्व काम करतात म्हणजे काय करतात तें सांगा. उत्तरः—( १ ) भगवंत हे प्रसंगविशेषीं भक्तांचीं प्रापंचिक संकटें जरी निवारण करीत असले तरी ते मुख्यतः भक्तांना संसारसागरांतून तारून नेतात. (२) त्यांना तारून नेण्याकरितां भगवंतांनीं अवतार घेतले व आपणास सहस्र नांवें ठेवून घेतलीं, ( ३ ) हीं नांवें ह्याच कोणी नौका भक्तांकरितां तयार केल्या व ह्या नावांच्या आश्रयानें भगवंतांनीं आजपर्यंत अनेक परिग्रही भक्तांना व पशुपक्षादिकांनाहि तारून नेलें. ( ४ ) जे

अपरिग्रही भक्त आहेत त्यांच्याकरितां ध्यानमार्ग निर्माण केला व (५) ज्यांना भगवत्सेवेची आवड आहे त्यांच्याकरितां प्रेमरूपी पेटी निर्माण करून ठेवली.

**प्रश्न ३३**:—उपासनाकांडाचा उपसंहार करतांना भगवंतांनीं अर्जुनास उत्तरोत्तर सोपे असे जे भगवत्प्राप्तीचे चार मार्ग सांगितले आहेत त्यांचा अनुवाद करा. **उत्तर**:—(१) बुद्धीच्या निश्चयासह मन हें भगवंताचे ठिकाणीं टेवणें. (२) तें शक्य नसल्यास चित्त विषयभोगांतून हळूहळू काढून भगवंताचे ठिकाणीं तें स्थिर करण्याचा दररोज नियमानें अभ्यास करणें. ( ३ ) हा अभ्यास करणेंहि कठिण वाटत असल्यास संसाराचा त्याग न करतां केवळ स्वकर्म हें अहंकार व फलेच्छा टाकून ईश्वरार्पण बुद्धीनें करणें. ( ४ ) अशा हतवटीनें कर्म करणेंहि अवघड वाटत असल्यास कर्माचें कर्तृत्व व फलास्वाद स्वतःकडे न घेतां किंवा भगवंतालाहि अर्पण न करतां ते शून्यांत व्यर्थ जाऊं देणें. असें करण्यांत कर्म हें भगवंताला सहजच अर्पण होत असतें.

**प्रश्न ३४**:—यथासांग कर्म करून तें आकाशांत दवडणें अशाप्रकारचा योग, हा कर्म भगवंताला अर्पण करण्यापेक्षां श्रेष्ठ कसा आहे ते सांगा. **उत्तर**:—पानें ६९ व ७०.

**प्रश्न ३५**:—शांति म्हणजे ब्रह्मस्थिति प्राप्त करून घेण्याच्या मार्गांतील जे निरनिराळे टप्पे भगवंतांनीं सांगितले आहेत त्यांचा अनुवाद करा.

**उत्तर**:—पान ७१.

**प्रश्न ३६**:—योगी, भक्त व ज्ञानी हे तिन्ही शब्द एकच स्थितिवाचक कसे आहेत तें सांगा. **उत्तर**:—पान ८१.

**प्रश्न ३७**:—संतसंगति ही 'दृष्टफलसूचक' व 'अदृष्टफलसूचक' कशी आहे तें सांगा. **उत्तर**:—पान ९१.

**प्रश्न ३८**:—ब्रह्मस्थिति प्राप्त झाल्यानंतरहि भक्त हा भक्ति कां करतो ? व अद्वैतांत भक्ति होणें संभवनीय कसें आहे तें सांगा. **उत्तर**:—पानें ९८ ते १००

**प्रश्न ३९**:—अंतःपरिग्रह व बाह्य परिग्रह म्हणजे काय ? **उत्तर**:— पानें १०७ व १०८.

**प्रश्न ४०:**—भक्त हा बोलूनहि मौनी कसा ठरतो? **उत्तर:**—पानें १०९-१११.

**प्रश्न ४१:**—ज्ञानी भक्ताचीं कांहीं ठळक लक्षणें सांगा.

**उत्तर:**—( १ ) आपपर म्हणजे दुजाभाव नसणें ( २ ) स्वत: सुखदुःखसमान असूनहि दुसऱ्याविषयीं दया असणें. ( ३ ) सहनशीलता असणें. (४) आत्मतृप्त असणें. ( ५ ) निरपेक्ष असणें. ( ६ ) शत्रुमित्र व मानापमान ह्याबद्दल समबुद्धि असणें. ( ७ ) कशाबद्दलहि शोक न करणें. (८) अंतर्बाह्य शुचि असणें. ( ९ ) सुखदुःख शीतोष्ण इत्यादि द्वंद्वातीत असणें. (१०) निर्भय असणें.

**प्रश्न ४२:**—ज्ञानीभक्त भगवंताला किती प्रिय असतो ते सांगा.

**उत्तर:**—पान. ११७ ते ११८.

---

॥ ॐ ॥

# प्रकरण चवथें

## श्रीज्ञानेश्वरीचे बाराव्या अध्यायांतील व्याकरण व श्रीज्ञानेश्वरींतील नामांची व धातूंची रूपावलि.

प्रा. पारसनीस व मोडक यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'श्रीज्ञानेश्वरी–सोळावा अध्याय' या पुस्तकांत ( पृष्ठ ३४ ते ५७ ) श्रीज्ञानेश्वरीच्या व्याकरणाची चर्चा केली आहे. त्यांत शब्दांची व्युत्पत्ति, विभक्ति प्रत्यय, विभक्ति प्रत्यय लावण्यापूर्वी शब्दांचीं 'सामान्य रूपें' कशीं बनतात व धातु व आख्यात यांविषयीं महत्त्वाची माहिती दिलेली आहे. ही व्याकरणाची चर्चा ज्यांचा प्रथमतः व्याकरणाचा अभ्यास चांगला झालेला आहे व व्याकरणांतील पारिभाषिक शब्दांचा अर्थ ज्यांना चांगला समजतो अशांनाच गम्य होणारी आहे. परंतु अलीकडे शाळेंतील व विश्वविद्यालयांतील अभ्यासक्रमांतून व्याकरणाचा जवळजवळ संपूर्ण लोप झालेला असल्यामुळें ही चर्चा हल्लींच्या शाळेंतील व बी. ए. मधील विद्यार्थ्यांसहि समजणें कठीण जाईल असें वाटतें. अलीकडे शाळांतून व्याकरणाचें शिक्षण हें मुलांना वाक्यांतून आलेल्या शब्दांचीं व क्रियापदांचीं रूपें कोणत्या विभक्तीचीं व काळांचीं आहेत हें ओळखण्यापुरतेंच दिलें जातें. अशीं वाक्यांतील शब्दांचीं विभक्तिरूपें व क्रियापदांचीं रूपें समजलीं असतां नामांचा क्रियापदाशीं किंवा अन्य शब्दाशीं काय संबंध आहे व क्रियापदांचा अर्थ काय आहे हें समजून येतें; म्हणून नामांचीं व धातूंचीं रूपें समजणें अत्यंत आवश्यक आहे. श्रीज्ञानेश्वरींतील बाराव्या अध्यायांतील नामांचीं व धातूंचीं रूपें सुलभ रीतीनें वाचकांस ओळखूं येण्याकरितां गुरुवर्य रा. रा. गोविंद कृष्ण मोडक, सेवा-

निवृत्त शिक्षक, न्यू. इं. स्कूल, पुणें, यांच्या मार्गदर्शनानें आम्हीं श्रीज्ञानेश्वरींतील नामांची व धातूंची रूपावली तयार केलेली खालीं देत आहोंत—

## शब्दविचार

शब्दांचे मुख्यतः दोन भेद आहेत. ज्या शब्दांचा वाक्यांत उपयोग करतांना त्यांचें रूप बदलतें अशा शब्दांना **विकारी** अथवा **सव्यय** शब्द म्हणतात व ज्यांचें रूप बदलत नाहीं त्यांना **अविकारी** अथवा **अव्यय** शब्द म्हणतात. सव्यय शब्दांच्या चार जाती आहेत.—नाम, सर्वनाम, विशेषण व धातु. त्याचप्रमाणें अव्यय शब्दांच्याहि चार जाती आहेत—त्या क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी व केवलप्रयोगी. वरील आठ जातीं- पैकीं नाम, सर्वनाम व विशेषण यांना लिंग, वचन विभक्ति हे विकार होतात व धातूंना आख्यात, लिंग, पुरुष व वचन हे विकार होतात. मराठी भाषेंत शब्दांचीं लिंगें तीन आहेत—पुल्लिंग, स्त्रीलिंग व नपुंसकलिंग व वचनें दोन आहेत—एकवचन व अनेकवचन. त्याचप्रमाणें विभक्ति (संबोधनासह) आठ आहेत व आख्यातें ( म्ह. तीन काळ, तीन अर्थ व अनियमित रूपें अथवा पद्यरूपें अशीं ) सात आहेत.

## नामविचार

वस्तूच्या नांवाला नाम म्हणतात. ज्ञानेश्वरींत **पुल्लिंगी** अ—कारान्त (राम); **आ-कारान्त** ( वारा ); इ—कारान्त ( कवि ); ई—कारान्त ( योगी ); **उ—कारान्त** ( तरु ) व ऊ—कारान्त ( विंचू ) असे मुख्यतः सहा प्रकारचे शब्द येतात. हे शब्द खालीलप्रमाणें चालतात:—

| पुल्लिंगी अ—कारान्त शब्द—राम. | | | पुल्लिंगी आ—कारान्त शब्द—वारा. | |
|---|---|---|---|---|
| विभक्ति— | ए. व. | अ. व. | ए. व. | अ. व. |
| प्रथमा— | राम / रामु | राम | वारा | वारे |
| द्वितीया— | नाहीं | | नाहीं | |
| तृतीया— | रामें | रामीं | वारेनि / वारेन | वारीं |

